# विनोबांची भारत-यात्रा

[ सेवाग्राम ते सेवाग्राम ]

•

लेखिका

निर्मला देशपांडे



परंधाम प्रकाशन, पवनार

प्रकाशक :
भाऊ पानसे, परधाम प्रकाशन
पो पवनार (वर्धा)




६ एप्रिल १९६४
प्रति ७,०००
किंमत १.५०



मुद्रक
भाऊ पानसे, परधाम मुद्रणालय
पो पवनार (वर्धा)

## अनुक्रमणिका

# प्रस्तावना

इ. स. १९५१ सालापूर्वी विनोबाचे नाव भारतातसुद्धा फारसे ऐकू जात नसे. व्यक्तिगत सत्याग्रहाचे वेळी गांधीजीचे पहिले सत्याग्रही म्हणून ते क्षणभर भारतीय राजकारणात चमकले तेवढेंच. त्यानंतर पुन्हा ते पवनार येथील त्याचे आश्रमात आपल्या नेहमीच्या कार्यक्रमात गढलेले होते. पण ७ मार्च १९५१ ला जेव्हा त्यानी प्रथम आपल्या पदयात्रेला सुरुवात केली तेव्हापासून भारतात च काय पण अखिल जगात अनेकाच्या तोंडी आज विनोबाचे नाव झाले आहे. ज्या पदयात्रेमुळें हें परिवर्तन घडून आले त्या १३ वर्षांच्या पदयात्रेचा इतिहास ह्या पुस्तकात ग्रथित केला आहे.

पुस्तकाच्या लेखिकेला असा इतिहास लिहिण्याचा असामान्य अधिकार आहे. ह्या पदयात्रेंतील बरीच वर्षे लेखिकेचे कार्यच मुळी विनोबाची भाषणे लेखांकित करण्याचे असल्यामुळें त्याचे विचार ऐकण्याची, त्यावर मनन करण्याची व ते आत्मसात् करून घेण्याची अत्यंत आकर्षक सधि तिला लाभली होती. याशिवाय अहिंसेवर अपार श्रद्धा व विनोबावर अपार निष्ठा हे दोन्ही गुण प्रकर्षाने लेखिकेत असल्यामुळें व 'साहित्याचे' बाळकडू मातापित्यापासून च तिला मिळाल्यामुळें एकदर लिखाण फारच उठावदार झाले आहे. वास्तविक पदयात्रा इतक्या ठरीव साच्यातून होत असते की तीत विविधतेला अवकाश बरा च कमी असायचा. नेमल्यावेळी निघायचे, नेमल्यावेळीं पूर्वनियोजित स्थळी पोहोचावयाचे, व ठराविक भाषणे व्हावयाची. पण ह्या पदयात्रेच्या वर्णनात इतकी विविधता व असा जिवतपणा आलेला आहे की एकदा हाती घेतलेले पुस्तक पूर्ण केल्या-शिवाय सोडता येणार नाही. हा प्रस्तावना लेखकाचा अनुभव अनेक जणाना आल्याशिवाय राहणार नाही

'जांकी रही भावना जैसी । प्रभुमूरत देखी तिन तैसी'

या तुलसीदासाच्या उक्तीप्रमाणे विनोबाचे या पदयात्रेद्वारा विकसित

होणारे व्यक्तित्व त्याच्या एका नितांत भक्ताला जसे दिसून आले तसे निर्मलाताईंनी यात वर्णन केले आहे.

विनोबाची पदयात्रा अहिंसेचे श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याकरता असेल. विनोबासारख्या दुर्दम्य इच्छाशक्तीच्या व अतुलनीय विचारशक्तीच्या व्यक्तीला कोणत्याहि घटनेचा उपयोग आपल्या आवडत्या प्रमेयाच्या सिद्धयर्थ वापरता येतो. म्हणजे कोरापुटच्या पदयात्रेंत कुणी आजारी न पडल्यामुळें जसे 'देवाचे काम करणाऱ्याचे रक्षण देवच करतो' असे म्हणता येते, त्याचप्रमाणे जर कदाचित् कुणी दगावला असता व तर एक भक्त देवाच्या घरीं गेला' असे म्हणून त्याच देवाचे अस्तित्व सिद्ध करता आले असते पण जे 'भक्त' नाहीत व ज्याची अहिंसेवर तात्त्विक श्रद्धा नाही अशानासुद्धा या ग्रामदानआंदोलनाच्या इतिहासातून 'लोकशाही' शक्तिशाली बनविण्याचा मार्ग दिसून येईल.

आज देशापुढें खरा प्रश्न हाच आहे. काय केले असता लोकशाही प्रभावी होऊ शकेल ? आजची पारंपरिक लोकशाही दुबळी दिसते. हुकुमशाही राष्ट्रें जास्त शक्तिशाली दिसतात. वास्तविक उलटें असावयाला पाहिजे. कारण हुकुमशाही राष्ट्रात लोकशक्ति प्रगट होण्याची संधि कमी जनतेला हुकुमशाहीच्या दडपणाखाली कासावीस झाल्याची भावना नेहमी असावयाची याच्या उलट लोकशाहीत लोकांची संपूर्ण जनशक्ति प्रगट होण्याचा संभव आणि आजवर दोन्ही पद्धतीत एक प्रकारची अघोषित लढाई च सुरू.आहे या लढाईत आपण यशस्वी कसे होणार ? आमची सर्व भिस्त कायद्यावर दिसते त्याकरता आमची भिस्त पक्षावर व त्यामार्फत मिळणाऱ्या विधानसभा व संसदेच्या तिकिटावर आहे पण प्रत्यक्षात असें दिसते की कायदे होऊन सुद्धा प्रभावी जनमताशिवाय त्या कायद्याची अमलबजावणी होत नाही निरनिराळ्या प्रांतात कुळसंरक्षणाचे जे अनेक कायदे झाले, त्यात कुळांनी राजिनामे देऊन आपले हक्क स्वखुशीनें सोडण्याची असंख्य उदाहरणे आहेत असल्या तऱ्हेनें मिळालेले कायम वहितीचे हक्क आम्हाला नकोत असें ती विचारी कुळेंच म्हणतात. मग कायदा काय करणार ? लोकशाहीत जनमत अगाऊ बदललें पाहिजे,

व मग कायदा व्हावयास हवा. Law follows public opinion in a democracy व हुकुमशाहीत कायद्यानें लोकमत बनविण्याचा प्रयत्न होतो. in a totalitarian state public opinion follows the Law. आपल्या देशात लोकशाही कायम ठेवून केवळ कायद्यानें समाज-परिवर्तनाचा जो प्रयत्न सुरू आहे तो म्हणून च असफल ठरणार. म्हणून आधी लोकमत बदलवून मग जर आपण कायद्याची कास धरण्याचा प्रयत्न केला तर च आपण सफल होऊ. 'ग्रामदान' आंदोलन हे असे करण्याचा एक प्रयत्न आहे. म्हणून लोकशाहीवर श्रद्धा ठेवणाऱ्या सर्व व्यक्तींनी व राष्ट्रांनी या दृष्टिकोनातून ग्रामदान आंदोलनाकडे पहावयाला हवे.

शेवटी खऱ्या लोकशाहीचा मार्ग व आदर्श अहिंसेचा मार्ग ही दोन्ही एकच आहेत. केवळ बहुमताच्या भरवशावर चालणाऱ्या लोकशाहीत संघर्ष अटळ आहे या बाबत स्फल लोकशाही राष्ट्रांचे म्हणजे इंग्लंड अमेरिका इत्यादि देशांचे जें उदाहरण देण्यात येते ते पूर्ण विचारांती अयोग्य दिसते. कारण या देशांत जी लोकशाहीची वाढ झाली ती शोषणाच्या आधारावर झाली औद्योगीकरणात प्राथम्य मिळाल्यामुळें अतोनात उत्पादनवाढ व जागतिक बाजार-पेठांवर एकाधिकारामुळें आधारित असलेलें शोषण या दोन कारणामुळें सध्याच्या लोकशाही राष्ट्रांत हा अंतर्गत संघर्ष आजपर्यंत दिसला नाही व अजून हि दिसत नाही. अजून हि या राष्ट्रांचे शोषण सुरूच आहे व या दृष्टीने विचार केल्यास तथाकथित साम्यवादी राष्ट्रें व लोकशाही राष्ट्रें यात काहीच फरक दिसत नाही. आजच्या समाजवादालाहि इतर राष्ट्रांचे शोषण करणे गैर दिसत नाही. व्यापाराकरता, कच्च्या मालाकरता, परस्परांत चढाओढ ही दोन्ही पद्धतीच्या राष्ट्रांत सारखी च सुरू आहे इतर राष्ट्रांच्या शोषणावर आजच्या औद्योगीकरणाला वाहिलेल्या राष्ट्रांची अंतर्गत लोकशाही टिकून आहे त्या शोषणाचे मार्ग बंद झाल्यावर विकेंद्रित अर्थव्यवस्थेची कास सर्व जगाला घेणे भाग पडेल व तेव्हाच व्यक्ति व समाज यांचे जे अन्योन्य संबंध सर्वोदयात अभिप्रेत आहेत त्या आशयाची समाज-व्यवस्था सर्व जगात नांदावयाला लागेल व्यक्तीचे स्वातंत्र्य इतर कुणाहि व्यक्तीच्या शोषणा-

वर आधारित नसावे ही कल्पना खऱ्या लोकशाहीत हि रुजू असली पाहिजे. अहिंसेची हि तीच भूमिका आहे व अशाच समाजरचनेचा मार्ग सर्वोदयाला चोखाळावयाचा आहे. हे अपरिग्रहीवृत्तिशिवाय अशक्य आहे. खरी लोकशाही व अपरिग्रही वृत्ति यांत किती निकटचा संबध आहे हे यामुळें दिसून येईल. तसाच संबध लोकशाही व शासनविहीनतेचा आहे. ग्रामसभेमध्यें महत्वाच्या प्रश्नांवर सर्व सम्मतीचा आग्रह याचमुळें आहे. शासनविहीनतेचा सोपा अर्थ असा करता येईल कीं कुणाहि व्यक्तीला बहुमताच्या भरवशावर आपण दाबल्या गेलो ही भावना ज्या समाजरचनेंत राहत नाही अशी समाज-रचना खऱ्या लोकशाहीत सुद्धा हें च अभिप्रेत आहे. लोकशाही म्हणजे 'tyranny of the mejority' 'बहुसंख्याकांचा जाच' असे व्हावयाला नको. दुसऱ्याचे तोंड बंद केले म्हणजे आपण त्याचे मतपरिवर्तन केले असे होत नाही. ( you connot convert a man by silencing him) त्याच्या विचारांना चालना देऊन च ते शक्य आहे. म्हणून च लोकशाही व सर्व-सम्मति यांचा निकटचा संबध आहे.

तसाच खऱ्या लोकशाहीचा व आंतरराष्ट्रीयतेचा हि आहे. 'जयजगत्' ही केवळ घोषणा नव्हे इतरांचे शोषण करून तुम्ही आपल्या पोळीवर तूप ओढू नका असा अर्थ, त्यात अभिप्रेत आहे आजच्या राष्ट्रीयतेच्या युगातून आंतरराष्ट्रीय युगात प्रवेश केल्याशिवाय हे शक्य नाही व आंतरराष्ट्रीयता विकेन्द्रित अर्थव्यवस्थेशिवाय शक्य दिसत नाही जगाच्या बाजारपेठा-करता व जगातील कच्च्या मालाकरता जी आज जागतिक चढाओढ दिसते ती सर्व राष्ट्रीयतेच्या संकुचित कल्पनेवर आधारलेली आहे आणि जागतिक लढाईचे बीज याच सर्व राष्ट्रांच्या पारस्परिक स्पर्धेत आहे ही स्पर्धा विकेंद्रित अर्थव्यवस्थेशिवाय मिटणं शक्य नाही, म्हणून ग्रामोद्योगाचा आग्रह

अपरिग्रही-वृत्ति, सर्व सम्मती, विकेंद्रित लोकशाही व ग्रामोद्योग ही अशी खऱ्या लोकशाहीची पायाभूत तत्वे दिसतात तींच सर्वोदयाची आहेत तीच अहिंसेवर आधारलेल्या समाजरचनेची हि आहेत वास्तविक पाहता

लोकशाही व समाजवाद हे परस्पर एकमेकात समावेश होणारे असे शब्द आहेत. म्हणून च शांततेच्या मार्गाने येणारा लोकशाही समाजवाद हाच सर्वोदय होय, ही विनोबाची शिकवण आहे. एक पाश्चात्य विचारावर व इतिहासावर आधारलेला शब्द व दुसरा भारताच्या इतिहासावर, संस्कृतीवर व विचारावर आधारलेला शब्द हा च तो फरक.

सर्वेऽपि सुखिनः सन्तु

अर्थातच आधुनिक विज्ञानाचा त्यात त्याग नाही. आधुनिक विज्ञानाशिवाय जगाचे कल्याण च होणे शक्य नाही. केवळ ते विज्ञान शोषणाचे व शासनाचे साधन बनू नये. आपण सर्व एक आहोत या आत्मज्ञानी बुद्धिशिवाय ते शक्य दिसत नाही.

हें सर्व अश्रद्धावान व केवळ विचाराला वाहिलेल्या वाचकाना सुद्धा या पुस्तकात दिसेल व साहित्याच्या ललितकलेत ते विचार अत्यंत बेमालूम बसविल्यामुळें ज्याना ते विचार आज कडू औषधाप्रमाणे अग्राह्य वाटतात त्यानासुद्धा ते साखरेच्या आवरणामुळें गोड झालेल्या औषधाप्रमाणे हळू-हळू ग्राह्य होतील. मग श्रद्धावान् व निष्ठावान् लोकाबद्दल प्रश्नच नाही. त्याना सर्व च यात गोड दिसणार. मराठी वाङ्मयाची व सर्वोदय विचाराची एकत्र सेवा दोन नळीच्या एका बंदुकीप्रमाणे कुमारी निर्मलाताईने या पुस्तकाद्वारे केली आहे. हे काम महाराष्ट्र सर्वोदय-मंडळाच्या आग्रहा-वरून तिने अंगिकारिले म्हणून ही प्रस्तावना लिहिणें मला टाळता आले नाही. एरव्ही हे कार्य पत्करून या रसभरित पुस्तकाला नि.स्सार प्रस्तावना लिहिण्याचा प्रयत्न मी टाळला असता.

रा. कृ. पाटील

# अशांति शमन : १ :

'चरैवेति, चरैवेति।
कलिः शयानो भवति, सञ्जिहानस्तु द्वापरः।
उत्तिष्ठन् त्रेता भवति, कृतम् संपद्यते चरन्'

'संचार कर संचार कर' वेद आदेश देतात. कारण 'झोपणारा कलियुगात राहतो, बसणारा द्वापर युगात, उठून उभा राहणारा त्रेता युगात नी चालणारा सत्य युगात राहतो.' युग, माणसाचे जीवन घडवीत नाही तर माणूस युग निर्माण करतो. तुम्हाला सत्ययुगात रहायचे असेल तर सतत संचार करा. बुद्धदेवानी आपल्या शिष्याना सांगितले की 'चरथ भिक्खवे चारिकम् बहुजन हिताय बहुजन सुखाय'. भिक्षूनो सर्व लोकाचे हित व्हावें, कल्याण व्हावें म्हणून तुम्ही संचार करा. चरणचक्राबरोबरच धर्मचक्र फिरूं लागेल. गीतेत भक्ताचें लक्षण सांगितले आहे की तो 'अनिकेत. स्थिरमतिः' असतो, त्याची बुद्धि स्थिर नी पाय फिरते असतात. ज्ञानदेव म्हणतात की ज्ञानी 'विचरे विश्व होऊनी, विश्वामाजी।'

विनोबाना पदयात्रेचे लहानपणापासून वेड होतें. बडोद्याला शाळेंत नी कॉलेजात शिकताना ते सोबत्याना घेऊन रोज पाच दहा मैल फिरून यायचे त्याना अध्यात्माची ओढ होती. हिमालयात जावें, तपस्या करावी, शांति मिळवावी असे फार वाटे. त्याचबरोबर क्रांतीचे हि आकर्षण होते. देशाच्या स्वातंत्र्याकरतां प्राणाची बाजी लावणाऱ्या बंगालच्या क्रांतिकारकाकडे हि त्याचे मन धाव घ्यायचे १९१६ साली ते घर सोडून निघाले. काशीला पोहोचले

आणि हिमालयाची शांति की बंगालची क्रांति असे द्वंद्व त्यांच्या मनात सुरू झाले काशीला संस्कृतचे अध्ययन करीत असताना त्यांनी गांधीजींच्या एका भाषणाचा वृत्तांत वाचला, गांधीजींशी पत्र-व्यवहार सुरू केला आणि योजलेल्या दोन्ही वाटा सोडून तिसरीच, साबरमती आश्रमाची वाट धरली ते नेहमी सांगतात की 'गांधीजींमध्यें मला हिमालयाची शांति आणि बंगालची क्रांति यांचा सुंदर संगम आढळला तेव्हांपासून शांतिमय क्रांतीच्या कार्याला मी माझें जीवन वाहिले'

गांधीजींच्या साबरमतीच्या आश्रमात व पुढें वर्ध्याला विनोबांची जीवन-साधना सुरू झाली ज्ञानभक्तिकर्मांची त्रिवेणीच जणू त्यांच्या जीवनात प्रवाहित झाली शेती, सूतकताई, विणाई, भंगीकाम, नई तालीम, इत्यादि अनेकविध प्रकारच्या कर्मयोगात ते एकाग्र होते. 'इहलोकी कर्मे करीत करीतच शभर वर्षे जगण्याची इच्छा धरावी' ही ईशावास्य उपनिषदाच्या ऋषीची आज्ञा त्यांनी ऐकली होती 'कर्मीतचि तुझा भाग तो फळात नसो कधी' ही गीतेची वाणी त्यांच्या मुखी होती ज्ञानदेवाच्या नेवासे गावी बोलताना विनोबा म्हणाले "माझें जीवन म्हणजे एक दगड आहे शंकराचार्यांनी त्यावर वेदांताचे घण मारून त्याला मजबूत केले गांधीजींनी त्यावर सुंदर कारागिरी केली पण त्या दगडाला पाझर फोडण्याचे काम ज्ञानदेवानी केले"

चित्त भगवती ठेवून विनोबांची 'एकांत–लोकांत–साधना' बत्तीस वर्षे अखंड चालली साने गुरुजींनी एकदा त्यांना आर्जवून म्हटले होतें की 'तुम्ही महाराष्ट्रात हिंडा' विनोबांनी उत्तर दिलें 'माझ्या पायाला चक्र आहे मी एकदा हिंडायला लागलो की मला कोणी बसवू शकणार नाही" १९५१ साली तें चक्र सुरू झाले आणि सूर्याला जशी सुट्टी माहीत नाही, गंगेला विसावा माहीत नाही, त्याच नियमिततेनें त्यांची अखंड पदयात्रा चालते आहे. गेल्या तेरा वर्षांत ते सुमारे त्रेचाळीस हजार मैल चालले म्हणजे जवळजवळ दोन पृथ्वी-प्रदक्षिणाच्या लांबीची यात्रा झाली

* * * *

पहाटेची अडीच–तीनची वेळ घनदाट अंधार, नीरव शांति सगळें जग झोपलेले पण विनोबा जागे झाले आहेत वेदमंत्र *गुणगुणताहेत*, पाहता-

पाहता ध्यान लागले प्रार्थनेची घटा झाली ईशावास्य उपनिषदाच्या मंत्राचा पाठ झाला आणि चारच्या ठोक्याला विनोबा चालूं लागले बारा पधरा मैलाचा टप्पा गाठायचा आहे ताशी चार साडे चार मैलाची गति झपझप पावले पडताहेत सोबतच्या लोकाना मधून मधून धावावें लागते आहे वाटेत आसपासच्या खेड्यातले लोक दर्शनाकरता धावून येताहेत विनोबा थाबले सुख-दु खाची विचारपूस झाली स्वराज्य आले परकीय सत्ता समाप्त झाली भारतीय लोक 'माणूस' बनले गुलामाची गणना माणसात होत नसते शास्त्रकार गुलामाला कुठलीच आज्ञा करीत नाहीत कारण गुलामाला धर्म सुद्धा नसतो पण स्वतन्त्र झाल्यानतर आम्ही आता आपले जीवन घडवू शकता, आमचे सुखदु ख आमच्या हातीं आहे आमचा उद्धार आम्हाला करायचा आहे

पण कसा ? कोणत्या मार्गानें ? दारिद्र्य, उपासमार, शोषण, विषमता, आळस, अज्ञान ! अनेक शत्रूचा एकसाथ मुकाबला करायचा आहे विनोबा पुन्हा चालू लागले चरणचक्राबरोबरच चितनचक्रहि फिरू लागले ब्रिटिश साम्राज्यासारख्या बाहेरच्या बलाढ्य शत्रूशी सामना करायचे सामर्थ्य अहिंसेत आहे, हे सिद्ध झाले होतें पण आतल्या आपल्याच अतरातल्या शत्रूशी अहिंसा सामना करू शकेल का ? दारिद्र्य, विषमता, शोषण नाहीसे करण्याची शक्ति आहे का अहिंसेत ? तुमचे भव्य दिव्य वेदात-दर्शन, तुमची भक्ति, तुमची आध्यात्मिक शक्ति, आजचे प्रश्न सोडवण्यात होईल का यशस्वी ?

विनोबाची पावले पुढे पडत होती विचार कितीतरी पुढें धाव घेत होते आकाशाच्या सान्निध्यात त्याना नवेनवे विचार स्फुरतात आकाश त्याच्याशी बोलतें सुख-दु खाची त्याची व्याख्या मोठी मजेदार आहे ते म्हणतात 'ख म्हणजे आकाश जिथें आकाश सुलभ आहे, सहज विपुल आकाश मिळतें तें सुख आणि जिथें आकाश दुर्लभ आहे, तें दु ख' पचमहाभूतापैकीं ते सर्वात अधिक आकाशाचे सेवन करतात त्याचा दही मधाचा अगदी अल्प आहार पाहून डॉक्टर त्याना विचारतात 'इतके कमी खाऊन तुम्ही जगताच कसे ?' विनोबा हसतात 'मी भरपूर आकाश खातो त्यातून माझ्या शरीरालाहि पोषण मिळतें नी मन-बुद्धीलाहि' !

पदयात्रेचा आरभहि अकल्पितपणें झाला गाधीजीच्या निर्याणानतर

सेवाग्रामला गांधी-भक्तांचा मेळावा जमला होता वियोगाच्या आवेगात मति स्तंभित व बुद्धि कुंठित झाली होती 'पुढें काय' या प्रश्नाचे उत्तर कुणाला सापडत नव्हतें विनोबानी विचाराला चालना दिली "अहिंसा ही गांधीजींची 'बापकी इस्टेट' नाही आता अहिंसेचे प्रयोग आपल्याला करायचे आहेत. . महात्म्याचा विचार अमर आहे " त्याच बैठकीत 'सर्वोदय समाजा' च्या कल्पनेचा जन्म झाला वर्षांतून एकदा सर्वोदय-समेलन घ्यायचे, तिथें सर्वांनी जमायचे, चर्चा करायची, मार्ग शोधायचा, असे ठरले १९५१ चे समेलन हैदराबाद जवळ शिवरामपल्ली येथें व्हायचे ठरले होते विनोबा समेलनाला हजर राहणार नव्हते आधल्या वर्षीच्या समेलनाला हि ते हजर नव्हते स्नेही मडळींनी गळ घातली आणि शेवटी निक्षून सांगितले—'तुम्ही येणार नसाल तर समेलन होणार नाही, विनोबानी क्षणभर विचार केला, म्हणाले "ठीक आहे मी येईन समेलनाला, पण पायी चालत येईन!"

पायी चालत! वर्ध्याहून हैदराबादला पायी जाणार! सगळ्यांना आश्चर्याचा धक्का बसला जुन्या काळात गतिवान् वाहनें नव्हती तेव्हा लोक पायी यात्रा करीत असत बुद्धदेव, महावीरस्वामींनी अखंड विहार केला. शंकराचार्यांनी दोनदा भारताची प्रदक्षिणा केली कबीरदास, गुरु नानक, एकनाथ महाराज यांनी हि पायी यात्रा केली पण या विसाव्या शतकात, मोटारी, आगगाड्या नी विमानांच्या युगात पायी यात्रा? विनोबांचे मन वळवण्याचा पुष्कळ प्रयत्न झाला पण विनोबांचा संकल्प म्हणजे दगडावरची रेघ. 'जनतेच्या साधनांनी, जनतेकडे गेलें म्हणजे जनतेच्या हृदयाचा ठाव घेता येतो आध्यात्मिक दृष्टीने पदयात्रेचे विशेष महत्त्व आहे आणि अहिंसेचे शोध करायचे असतील तर सर्वोत्तम साधन आहे, पदयात्रा' हे आतले चिंतन. आणि बाहेर मात्र ते काहीच न बोलता, ७ मार्च १९५१ ला हैदराबादच्या दिशेनें चालू लागले

शिवरामपल्लीच्या समेलनात तेलंगणातील परिस्थितीची माहिती कळली सारा तेलंगणा पेटला आहे हिंसेचे थैमान चालले आहे कम्युनिस्ट लोक जमीनवाल्यांना लुटतात, त्यांचे खून करतात, त्यांच्या जमिनी हिसकावून घेतात व गरीबांना वाटतात या अत्याचारांना आळा घालण्याकरतां सरकारनें तेथें सेना पाठवली आहे! सरकार दरसाल पांच कोटी रुपयांचा खर्च करीत

आहे विनोबांनी विचार केला की परिस्थिति प्रत्यक्षच पहावी म्हणजे खरें काय तें कळेल प्रथम त्यांनी हैदराबाद जेलमध्ये जाऊन कम्युनिस्ट कैद्यांची भेट घेतली व त्यांचे म्हणणें ऐकून घेतले पूर्वीच्या हैदराबाद राज्यातील तेलगु भाषा बोलणाऱ्या प्रदेशाला तेलंगाणा म्हणतात त्यातील नलगोंडा व वरंगळ या दोन जिल्ह्यात परिस्थिति विशेष बिकट होती त्या भागात प्रवेश करताना सरकारनें व स्नेह्यांनी सोबत सशस्त्र शिपाई राहू द्या म्हणून आग्रह केला जिथें दिवसाढवळ्या खून पडतात तिथें विनोबा एकटे गेले विनोबांनी साफ नकार देत म्हटले 'मी शांति सैनिक या नात्यानें तेथें जात आहे माझें रक्षण ईश्वर करील ईश्वरभक्ताला कसलेच भय नसतें'

तेलगाणात विनोबाना काय दिसले? पडलेले, अर्धवट जळलेले भयाण वाडे, भग्नलेली मनें, भेदरलेले, धावरलेले भकास चेहरे ते वाडे आकाशातून पडणाऱ्या पावसामुळें पडले नव्हते, की विजेमुळें जळलें नव्हते, तर तिथेंच राहणाऱ्या माणसांनी पाडले, जाळले होते माणसाच्या पोटात भडकलेल्या भुकेच्या ज्वालात सारें काही भस्मसात होऊ पाहत होते शेतावर दिवसरात्र राबणाऱ्या मजुराला पोटभर अन्न नी अंगभर वस्त्र मिळत नव्हते त्याची स्वत ची इंच भर देखील जमीन नव्हती आणि जे कधी हातो नांगरहि धरीत नसत ते जमीनीचे मालक म्हणवीत होत कम्युनिस्टांनी भूमिहीन गरीबांना म्हटले 'तुम्ही किती दिवस असेच सहन करणार? लुटा ही धान्याची कोठारे कोणी अडवील तर उडवा त्याची डोकी आपण क्रांति करू या' जाळपोळ, लुटालूट, कत्तली या नित्याच्या गोष्टी झाल्या होत्या रात्रीच्या वेळी शेजारच्या झाडीत लपून बसलेले कम्युनिस्ट लुटायला येत, तर दिवसा कम्युनिस्टांचा निपात करायला आलेले सरकारचे सैनिक सतावीत लोक त्रस्त, भयग्रस्त होऊन गेले होते

तेलगणात भडकलेल्या अशांतीच्या आगीचे प्रमुख कारण होतें— भूमिसमस्या! जमिनीचा प्रश्न सुटल्याशिवाय, कसणाऱ्याला जमीन मिळाल्या-शिवाय, अशांतीची आग विझणार नाही, हे विनोबांच्या चटकन् लक्षात आले. शेतावर राबणाऱ्या प्रत्येक भूमिहीनाला जमीन मिळाली पाहिजे, असे त्यांना अनेक वर्षांपासून वाटत होतें देशाच्या फाळणीनंतर दिल्लीजवळ निर्वासितांच्या छावण्यात काम करताना विनोबांना याची तीव्रतेनें जाणीव झाली होती.

पाकिस्तानातून आलेल्या निर्वासितापैकी जे भूमिहीन होते त्याना इकडे आल्यावर जमीन मिळाली नव्हती सरकारनें दिलेले आश्वासन पाळले नव्हतें, याची त्याना खत होती भूमिहीनाना जमीन मिळवून देण्याचा अहिंसक मार्ग कोणता, यावर ते तेव्हापासूनच विचार करू लागले होते

१८ एप्रिल १९५१ रोजी त्याचा मुक्काम नल्गोंडा जिल्ह्यातील पोचमपल्ली या गावी होता गावच्या काही हरिजनानी आपल्या जीवनाची शोककथा त्याना सागितली 'आमच्या जवळ जमीन नाही, दुसरा कुठलाहि धदा नाही आम्ही पोट कस भरायच ? . आम्हाला थोडीशी जमीन मिळाली तर मेहनत करू नी चार घास आनदानें खाऊ '

'किती जमीन हवी ? '

'ऐंशी एकर आम्ही ऐंशी लोक आहोंत '

'तुम्हाला जमीन मिळाली तर सारे मिळून सहकारी शेती कराल ?'

'होय करू '

'ठीक आहे तरी लिहून द्या तुमचा अर्ज मी सरकारकडे पाठवीन '

गावातले एक सुखवस्तु शेतकरी श्री रामचद्र रेड्डी जवळच बसले होते ते एकदम म्हणाले 'मी देतो शभर एकर जमीन' सगळ्याना आनद नी आश्चर्याचा धक्का बसला

सध्याकाळी नेहमीप्रमाणें जाहीर सभा झाली विनोबानी दात्याचे अभिनदन केले गावकऱ्याना हिताच्या चार गोष्टी सागितल्या

रात्र झाली, सगळे आनदात झोपी गेले, पण विनोबाना झोप येईना बिछान्याला पाठ लागताच नेहमी 'ब्रह्मलोकी' जाणारे विनोबा कितीतरी तास जागेच होते अतरात विचारमथन चालले होतें 'काय घडले आज ? एकानें जमीन मागितली नी दुसऱ्यानें दिली आजवर असे कधी घडले आहे का ? मठ मदिर मशीदीकरता दान देणारे पुष्कळ असतात पण भूमिहीनाचा जमीनीवर अधिकार आहे, असे म्हणून कधी कुणी दान मागितलें नाही की दिले नाही अशा रीतीनें दान मागून भारतातल्या सर्व भूमिहीनाना जमीन देता येईल का ?' विचार मालिकेतला पुढचा मणि ओघळून खाली पडला विनोबाच्या जीवनात ईश्वराचे पहिले स्थान तर गणिताचे दुसरें गणिती डोक्यानें क्षणात हिशोब केला भारतात सुमारें पाच कोटी भूमिहीन लोक

आहेत. प्रत्येकी निदान एक एकर जमीन द्यायची म्हटली तरी पाच कोटी एकर जमीन मिळायला पाहिजे.'........छे! शक्य नाही! पाच कोटी एकर जमीन मिळणे शक्य नाही! माणसाला जीवापेक्षा देखील जमीन प्रिय असते जमिनीकरता अगदी सख्खे भाऊ देखील भांडतात. जमिनीकरताच ना महाभारत युद्ध झालें! दुर्योधनानें फक्त पांच गावें दिली असती तर सहार टळला असता पण सुईच्या अग्रावर मावेल एवढी जमीन सुद्धा द्यायला तो तयार झाला नाही. अशी ही प्यारी जमीन माझ्यासारखा क्षुद्र माणूस मागणार कसा नी त्याला देणार कोण! नाही, मी हे काम करू शकणार नाही'..... बुद्धीनें निर्णय दिला. प्रथम-दानाची ती घटना इतिहास प्रवाहात तेव्हाच लुप्त झाली असती. पण चार दोन क्षणातच अंतरंगातून एक आवाज उमटला, "तुला हे काम केलेच पाहिजे तुझी अहिंसेवर श्रद्धा आहे ना? हा अहिंसेच्या कसोटीचा क्षण आहे भूमिसमस्या अहिंसक मार्गानें सुटणार नाही तर अहिंसेला आपला पराभव कबूल करावा लागेल आणि हिंसेकरता मैदान मोकळें करुन द्यावें लागेल. अशा वेळी पण तू चूप बसणार? तुझ्या अहिंसेत दम नसेल तर तुझा अहिंसेचा दावा तुला सोडावा लागेल अन् हिंसेचा मार्ग ध्यावा लागेल. बोल! अशावेळी तू स्वस्थ बसणार!'... .विनोबाना स्वस्थ बसणे शक्य नव्हतें. अहिंसेच्या उपासनेंत त्यानी आपले जीवन अर्पण केले होतें. अहिंसेवर त्याची असीम श्रद्धा होती अहिंसेत जगतले यच्चयावत् प्रश्न सोडवण्याची शक्ति आहे, ही त्याची अढळ निष्ठा होती ते म्हणतात 'मी तुच्छ जीव, दुबळा, शक्तिहीन! पण माझ्या शक्तीनें का काम होणार होते? ज्यानें मला आदेश दिला त्या परमेश्वरावर पूर्ण भरोसा ठेवून मी निर्णय घेतला. देवाचें काम अपूर्ण नसते, हे मला माहीत होतें. तो जेव्हा बाळाच्या पोटात भूक निर्माण करतो, त्याआधीच आईला दूध देऊन ठेवतो जो मला दान मागायची प्रेरणा देत आहे, तोच इतराना दान देण्याची प्रेरणा देईल.'

ईश्वरावर विश्वास सोडून विनोबानी दुसऱ्या दिवशी भूदान मागितलें आणि त्याना मिळाले. तेलगणातल्या दोन महीन्याच्या यात्रेंत त्याना बारा हजार एकर जमीनीचे दान मिळाले 'हवा पाणी आणि सूर्य-प्रकाश याप्रमाणें जमीन देखील ईश्वराची देणगी आहे आणि म्हणून ती सर्वांसाठी आहे. जमिनीचा मालक माणूस होऊ शकत नाही. ईश्वरच तिचा खरा मालक आहे

जमीन ही आपली आई आहे नी आपण सारी तिची लेकरें आहोत वेदात म्हटले आहे 'माता भूमि पुत्रोऽहम् पृथिव्या ।' 'तुम्ही पाच भाऊ असाल तर मी—सहावा मी दरिद्रनारायणाचा प्रतिनिधि आहे गरीबाच्या वतीने त्याचा न्याय्य हक्क मागतो आहे दान म्हणजे भिक्षा नव्हे शकराचार्य म्हणतात—'दान सविभाग ' दान म्हणजे समविभाजन कालपुरुष समविभाजनाची मागणी करीत आहे देशावर सकट आलें म्हणजे यज्ञ करण्याची पद्धत आहे आजच्या सकटातून मुक्त होण्याकरता भूदान यज्ञात जमीन अर्पण करा' लोकाना हे विचार पटत नी ते दान देत कम्युनिस्टाच्या भीतीनें शहरात पळून गलेल्या जमीनवाल्याना ते सागत 'भूमिहीन तुमचे भाऊ आहेत त्याना जमीन देऊन त्याची दु खें दूर करणे हे तुमचे काम आहे तुम्ही त्याना प्रेमाने आपलेसें कराल तर तुम्हाला भीतीनें पळून जावे लागणार नाही' कम्युनिस्टाना ते म्हणत 'असे रात्री बेरात्री येऊन काय लुटता ? माझ्यासारखे दिवसाढवळ्या प्रेमानें लुटायला शिका' सरकारच्या सैनिकाना सागत 'कम्युनिस्ट काही वाघविघ नाहीत बदुकीनें वाघाची शिकार करता येते पण कम्युनिस्ट तर चितनशूर आहेत त्याच्या जवळ एक विचार आहे विचाराचा मुकाबला विचारानेंच होऊ शकतो' गरीबाना म्हणत 'कत्तलीनें कधी कुणाच भल झाल आहे का ? अहिंसेचा अवलब करून आपला न्याय्य हक्क मिळवा'

भूमिसमस्या एक जागतिक समस्या आहे, याची ते वारवार जाणीव करून देत 'अणुबाँबच्या या युगात माणसासमोर दोनच पर्याय आहेत टोटल वॉर किंवा अहिंसा अहिंसेची, प्रेमाची शक्ति प्रकट झाली नाही, तर विश्वयुद्ध अटळ आहे' भूदानाच्या वर्षावानें अहिंसेच्या पाण्यानें तेलगणातील अशातीची आग हळूहळू विझू लागली भारताचे पतप्रधान प नेहरू पार्लमेंटमध्यें म्हणाले 'आमची शक्तिशाली सेना जे काम करू शकली नाही, तें एका अस्थिपजर दिसणाऱ्या माणसानें सहज करून दाखवले ! बुद्धदेवानी अडीच हजार वर्षांपूर्वीच सांगितले होतें की वैरानी वैराचा नाश होत नाही

निर्वैरतेनेंच वैर नाहीसें होतें, हा सनातन धर्म आहे

न हि वेरेण वेरानि सम्मतीध कुदाचनम्
अवेरेन च सम्मंति एस धम्मो सनन्तनो

* * *

# ध्यानाकर्षण, निष्ठानिर्माण : २ :

तेलंगणाची यात्रा आटोपून विनोबा पवनारच्या आपल्या परधाम आश्रमात परतले. आश्रमवासीयांसमोर प्रकट चिंतन करीत ते म्हणाले "जगात अंतिम संघर्ष साम्यवाद आणि सर्वोदय या दोन विचारांत होणार आहे. ... यात्रेतल्या अनुभवांनी माझे हृदय भरून आले आहे. मानवाच्या हृदयातील चांगुलपणावर विश्वास ठेवून मी तेथें गेलो, आणि प्रभूनें त्याचीच प्रतीति घडवली. मी जर मानलें असतें की माणूस वाईट आहे तर मला तसाच अनुभव आला असता. कल्पवृक्षाखाली बसून जशी कल्पना करावी तसें फळ मिळतें."

त्याचवेळी भारताची पहिली पंचवार्षिक योजना तयार होत होती. त्यावर चर्चा करण्याकरता म्हणून पं. नेहरूंनी विनोबांना तातडीने दिल्लीला येण्यासंबंधी आग्रहाचे पत्र पाठविले. विनोबांनी उत्तर दिले 'मी अगदी तावडतोब निघतो आहे, पण पायी!' १२ सप्टेंबरला दिल्लीच्या दिशेने कूच केले. 'तेलंगणात कम्युनिस्टांच्या दडग्याला घाबरलेल्या लोकांनी तुम्हाला जमीन दिली. दुसरीकडे कोण देणार?' मत्सराच्याची सरबत्ती सतत चालू होती. पण पवनार ते दिल्ली या आठशें मैलांच्या यात्रेत, भूदान मिळाले नाही, असा दिवस विरळा. या प्रदेशावर गेली तीन-चारशें वर्षे मुघलांचीहि राजाची सत्ता असली तरी जनतेच्या हृदयावर तुलसीरामायणाची च सत्ता चालते. त्यामुळें 'सबै भूमि गोपालकी' हे तुलसी-वचन जनतेच्या हृदयाचा ठाव घेत असे. 'भूमिसमस्या सोडविण्याचे तीन मार्ग आहेत. कत्तल,

कायदा नी करुणा यरतरीच्या मार्गानें हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न रशियानें व चीननें केला पण हिंसेतून प्रतिहिंसेचें दुष्टचक्र सुरु होतें परशुरामानें हाती शस्त्र घेऊन नि क्षत्रिय पृथ्वी करण्याचे एकवीस वेळा प्रयोग केले पण ते अयशस्वीच झाले कायद्याच्या मार्गानें भूमिवाटप कराल तर त्यातून असख्य प्रश्न नी भाडणे निर्माण होतात करुणेच्या मार्गानें जमीनीबरोबर प्रेमहि वाटले जातें, हृदयें जुळतात करुणेचा मार्ग हा भारतीय सस्कृतीचा मार्ग आहे

सातपुडा, विंध्याचलाच्या रागा ओलाडीत विनोबा पुढें चालले होते. वाटेंत नर्मदा आली शकराचार्यांचे गुरु गोविंदपाद नर्मदातीरी राहत, शकराचार्यांना तिथेंच ज्ञान प्राप्त झालें त्याच्या नर्मदाष्टकात 'गतम् तदैव मे भयम् त्वदबु वीक्षीतम् यदा' या उल्लेख आहे शकराचार्यांची विचारावर श्रद्धा एखाद्या मदमतीनें त्याना विचारले की तुम्ही पन्नासदा कुणाला विचार समजावून सागितला तरी हि त्याला समजला नाही तर काय कराल ? " प्रश्नकर्त्याला वाटले ते आता तरी शस्त्राला मजूरी देतील. पण ते शातपणे उद्गारले 'मी एक्कावन वेळा विचार समजावून सागेन' विनोबाची हीच निष्ठा आहे ते मानतात की विचाराइतके प्रभावी शस्त्र जगात दुसरें कुठलेच नाही 'मी भिक्षा मागायला आलो नसून तुम्हाला विचाराची दीक्षा द्यायला आला आहे जमीनीची व्यक्तिगत मालकी हे पाप आहे, अधर्म, अन्याय आहे आजच्या, चुकीच्या जीवनमूल्यावर आधारित समाजव्यवस्थेंत आमूलाग्र परिवर्तन म्हणजे क्राति करणें, हे आमचें उद्दिष्ट आहे. क्राति प्रथम हृदयात होते आणि मग समाजात हृदयपरिवर्तन, जीवनपरिवर्तन आणि समाजपरिवर्तन ही क्रातीची त्रिविध प्रक्रिया आहे '

जिथें जिथें विनोबा जात तिथें तिथें क्रातीची हाक देत नी जनता त्याला प्रतिसाद देई. पहाटेंची वेळ विनोबा वाचत बसले आहेत एक गृहस्थ भक्तिभावानें प्रणाम करतात 'आज लवकर उठून स्नानसध्या आटोपून आपल्याला दान द्यायला आलो आहे " त्याच्या हाती पचवीस एकराचें दानपत्र आहे 'जमीन किती आहे तुमच्याजवळ' विनोबा विचारतात 'सहाशे एकर' 'अन् भाऊ किती ? ' 'दोन', 'तर मी तुमचा तिसरा भाऊ माझा हिस्सा मला द्या' . दात्यानें दुसरें दानपत्र मागितले अन् दोनशे एकराच्या

दानावर सही केली

कुठल्याशा एका गावात दिवस मावळून गेला तरी कुणीच दान दिलें नव्हतें एका गरीब तेल्याला राहवले नाही त्याच्याजवळ असलेल्या तुटपुंज्या जमीनीतील एक हिश्याचे दान देण्याकरता तो पुढें आला तू काय देणार ? तुझ्याजवळ तर कमी जमीन आहे ' 'माझ्यापेक्षा हि जो गरीब आहे, भूमिहीन आहे, त्याच्याकरता देतो आहें मी जमीन' विनोबा नेहमी सागत "कुराणात मजेदार गोष्ट आली आहे स्वर्ग (जन्नत), नर्क (दोजख) या दोहोमध्यें एक तिसरी अवस्था आहे 'बरज़ख' पाप करणारा नर्कांत जाईल, पुण्य करणारा स्वर्गांत, नी ज्याचे पापपुण्य समान आहे तो बरज़ख मध्यें जाईल तेथें जाणाऱ्याचा एक डोळा हसरा नी एक रडका राहील. जो डोळा नर्काकडे पाहील तो हसेल, तो विचार करील की नर्कापेक्षा तर माझी स्थिति चागली आहे जो स्वर्गाकडे पाहील त्याला वाटेल की स्वर्गात किती चैन आहे, मला काहीच मिळत नाही अन् तो रडेल आपण सारे बरजखमध्यें असतो आपल्याहून जे श्रीमत आहेत त्याच्याकडे पाहू तर मनात मत्सर द्वेष दु ख निर्माण होईल नी आपल्याहून हि जे गरीब आहेत त्याच्याकडे पाहू तर मनात करुणा, दया निर्माण होईल म्हणून नेहमी खाली पहावे.

मध्यप्रदेशातल्या सागर या शहरी गाधी-जयतीच्या जाहीर सभेंत बोलताना विनोबानी पाच कोटी एकर जमीनीची मागणी जनतेपुढें ठेवीत म्हटले की 'देशात पाच कोटी भूमिहीन आहेत लागवडीखालची जमीन तीस कोटी एकर आहे त्या जमीनीचा सहावा हिस्सा मला हवा आहे राजाला सहावा हिस्सा देण्याचा आपला जुना प्रघात आहे आजचा राजा आहे—गरीब जनता, दरिद्रनारायण त्याच्याकरता पाच कोटी एकर जमीनीचे दान द्या भारतीय सस्कृतीच्या गर्भांतून प्रकटलेली ही क्रातीची अभिनव भारतीय पद्धति आहे '

मथुरा कृष्णलीलेच्या अगणित स्मृतीनी अभिमत्रित झालेली नगरी. कृष्ण याच परिसरात खेळला, वागडला गवळ्याच्या पोराना जमवून तो दहीदूध वाटत असे नी 'वाटून खा' हा सदेश देत असे तो गाई चरायला नेई, त्याची सेवा करी नी सगळी कामें समान योग्यतेची आहेत, शरीरश्रम प्रत्येकानें करावा हे न बोलता सागे गावचे गोकुळ कसे करायचे हे त्याने स्वयेंच शिकवलें इन्द्रानें रागावून पावसाचा मारा सुरु केला तेव्हा गोकुळातल्या

सर्व लोकाना जमवून त्यानें गोवर्धन पर्वत उचलला नी सर्वांचे रक्षण केले तुम्ही सर्वजण, लहान थोर, स्त्री पुरुष सारे आपापल्या लाठ्या लावा असे सागून मग त्यानें आपली करगळी लावली नी गोवर्धन वर उचलला गेला सगळी माणसे मिळून सहकार्याने काम करतात तेव्हा देव त्याना मदत करतो, हे त्यानें धडा घालून शिकविले कृष्णाच्या नगरीत विनोबाना गीतेतल्या साम्ययोगाचे स्मरण झाले "गीता सागते 'स्वे स्वे कर्मण्यभिरत ससिद्धिम् लभते नर ' 'आपुल्या आपुल्या कर्मी दक्ष तो मोक्ष मेळवी,' मोक्षाचा अधिकार सर्वांना आहे आपापले कर्म, मग तें ब्राह्मणाचे असो की भग्याचे असो, निष्काम बुद्धीनें व ईश्वरार्पण वृत्तीने करणारा मोक्ष मिळवतो शरीरश्रम करणे नीच काम आहे अशी चुकोची धारणा रूढ झाल्यामुळेच भारत गुलाम बनला श्रमप्रतिष्ठा गेली, उच्चनीचता, स्पृश्यास्पृश्यता आली, नाना भेदभावानी समाज पोखरून निघाला आणि इग्रजाना मोकळे रान मिळाले आपल्याला साम्ययोगाची स्थापना करायची आहे आर्थिक, सामाजिक, राजकीय, धार्मिक समानता आणायची आहे कामाची किंमत पैशानें करणे चूक आहे बौद्धिक व शारीरिक श्रमाच्या कामाचे मूल्य समान मानले पाहिजे राष्ट्रपतीच्या आणि भग्याच्या पगारात फरक कशाला करायचा? दोन्ही कामाची समाजाला गरज आहे प्रत्येकानें आपापल्या शक्तिनुसार समाजाची सेवा करावी व आपापल्या गरजेप्रमाणें समाजाकडून वेतन घ्यावें आम्हाला हाताच्या पाच बोटासारखी समता हवी आहे अगदी गणिति समता नको पाच बोटें कापून एकसारखी करणें हास्यास्पद ठरेल पाच बोटात अतर आहे, पण अगदीच थोडे, एक बोट एक इच, नी दुसरें एक फूट असे नाही पाच बोटें सहकार्यानें काम करतात म्हणून असख्य कामें करू शकतात प्रत्येक बोटाची स्वतत्र शक्ति नी योग्यताहि आहे तिचा विकास होतो असेच समाजात व्हावें "

दोन महिन्याची यात्रा करून विनोबा दिल्लीला पोहोचले आणि राजघाटावर गाधीजीच्या समाधीजवळ एका नवीन तयार केलेल्या सुदर झापडीत अकरा दिवस राहून पुढें उत्तर प्रदेशाच्या यात्रेवर निघाले दिल्लीतल्या वास्तव्यात सर्व क्षेत्रातील अनेक लोकाशी भेटीगाठी झाल्या प्लॅनिंग कमिशनच्या सभासदाशी दोन दिवस मनमोकळी चर्चा झाली विनोबानी

स्पष्ट सांगितले की सर्वांना काम आणि भाकरी देणें हे नॅशनल प्लॅनिंग (राष्ट्रीय आयोजन) चे पॉस्चुलेट (गृहीततत्त्व) आहे माझा ग्रामोद्योगाबाबत काहीच आग्रह नाही पण मी तुम्हाला एवढाच प्रश्न विचारतो कीं मोठ्या यंत्रोद्योगाद्वारें तुम्ही आज सर्वांना काम देऊ शकता का? आमचा चर्खा, आज या क्षणाला सर्वांना काम देऊ शकतो आज तुम्ही चर्ख्याला उत्तेजन द्या उद्या जर तुम्ही दुसऱ्या कोणत्या उद्योगाद्वारे काम देऊ शकाल तर हा चर्खा तुमचे पाणी तापवण्याचे काम करील' पंतप्रधानांनीं अन्नधान्याच्या बाबतीत दोन वर्षांत देश स्वावलंबी करण्याचा संकल्प केला पण तो पार पडला नाही यावद्दल विनोबा कठोर शब्दांत म्हणाले 'तर मग त्यानी राजीनामा द्यायला हवा "रघुकुल रीति सदा चलि आई। प्राण जाई अरु वचन न जाई" . . दिल्लीच्या नागरिकाना विनोबानी सांगितले 'जिथे त्याग-तपस्या आहे, तिथे शक्ति आहे स्वराज्यपूर्वी शक्तीचे अधिष्ठान राजकारणात होतें आता ते सामाजिक व आर्थिक क्षेत्रात आहे . . . कायदा सर्वांत शेवटी येतो आधी कायद्याकरता अनुकूल वातावरण निर्माण करायला हवें स्वातंत्र्यानंतर कॉंग्रेसची संघटना विसर्जित करून लोकसेवक संघ स्थापन करण्याचा गांधीजींचा सल्ला कॉंग्रेसनें मान्य केला असता तर संस्थेचे व देशाचे भले झाले असते "

एक माणूस भूमिसमस्या सोडविण्याच्या उद्देशानें दान मागतो नी शेंकडो लोक त्याला दान देतात, ही घटना म्हणजे एक चमत्कारच होय असे जगाला वाटलें पवनार ते दिल्लीच्या यात्रेत अठरा हजार एकर जमीन मिळाली तेलंगणाच्या यात्रेत रोजची सरासरी दोनशे एकर जमीन मिळाली तर या यात्रेंत रोजची तीनशे एकर-मिळाली ज्या भागात कम्युनिस्टांचे कामच काय पण नाव देखील लोकाना माहीत नव्हतें तेथें अधिक जमीन मिळालेली पाहून लोकांचे ध्यान या अभिनव कार्याकडे आकर्षिले गेले.

अगणित साधु-संतांच्या, ज्ञानी-मुनींच्या चरण-धूळीनें ही भरतभूमि पुनीत झाली आहे. त्यातहि काहीं प्रदेश विशेषच भाग्यवान उत्तर प्रदेशाच्या डोक्यावर 'पृथिवीचा मानदंड' हिमालयाचे छत्र आहे बद्रीनाथ-केदारनाथ गंगोत्री-जम्नोत्री, हरिद्वार अशी कितीतरी तीर्थक्षेत्रें हिमालयाच्या कुशीत लपली आहेत गांधीजी म्हणत 'हिमालय हा तपस्येचा पहाड आहे त्याची

उची म्हणजे मानवी तपस्येची उची आहे अमेरिकन लेखक व्हिन्सेन्ट शीन म्हणतो, 'भारतीय लोकात अध्यात्म्याची ओढ अधिक का, याचे उत्तर हिमालय देतो' अवनी-अवराला हिमसूत्राने जोडणारा, जीव आणि शिवाला ज्ञानसूत्राने जोडणारा, सत्य आणि स्वप्नाला काव्यसूत्राने जोडणारा नगाधिराज हिमालय माणसाला सतत हाक मारीत असतो पीडित पामराना पावन करायला, तो 'देवतात्मा' गगा-यमुनेला पाठवतो गगा-यमुनेचे जीवनदायी जल उत्तर प्रदेशाची भूमि समृद्ध बनवते काशी, प्रयाग, अयोध्या, मथुरा या साऱ्या नावाचे आज हि भारतीय मनाला आकर्षण आहे राम आणि कृष्णाच्या या भूमीत विनोबाच्या हाकेला जनमनाने प्रतिसाद दिला तर त्यात नवल ते काय ?

देवाने दिवस दिला आहे काम करण्याकरता नी रात्र ध्यान व विश्राम करण्याकरता असे विनोबाचे मत शहरात रात्री होणारा दिव्याचा झगझगाट पाहून ते म्हणतात 'तुम्ही अधाराला देखील आग लावता' रात्रीचा पहिला प्रहर सपण्यापूर्वी च विनोबा यात्रीदलात शाति पसरते रामचरण नावाचा एक आधळा माणूस दूरवरच्या खेड्यातून बैलगाडीचा प्रवास करीत विनोबाच्या मुक्कामी पोहोचला तेव्हा सारे झापी गेले होते त्याने कुणाला तरी उठवले. "सत बाबाला दान देण्याकरता म्हणून मी मुद्दाम इतक्या दुरून आलो त्याना उठवू नका, त्रास होईल माझे दानपत्र तेवढे त्याना द्या!" तो दान देऊन निघून गेला दुसऱ्या दिवशी ही गोष्ट विनोबाना कळली तेव्हा ते सद्गदित झाले "त्याने मला प्रभु रामाच्या चरणाचे दर्शन घडविले . . तो आधळा नव्हता, देवच होता त्याला कुणी सागितले दान द्यायला? कुणी दिली प्रेरणा? त्याला डोळ्याविना दर्शन कसे झाले? . . हे देवाचे काम आहे तोच आपल्याकडून करवून घेत आहे आपल्याला फक्त निमित्तमात्र बनायचे आहे"

१९५२ च्या एप्रिलमध्ये वाराणसीजवळच्या सेवापुरी आश्रमात सर्वोदय-समेलन झाले एक वर्षाची पदयात्रा करून विनोबा तेथे पोहोचले तेव्हा नव्वद हजार जमीनीची दानपत्रे त्याच्या हाती होती तेवढ्यात काशी-नरेश भेटायला आले नी त्यानी दहा हजार एकराचे दान अर्पण केले तरी हि लाखाला दहा पाच एकर कमी पडत होते समेलन सुरू होण्याच्या काही तास

आधी विनोबांच्या जन्मग्रामाहून, कुलाबा जिल्ह्यातील गागोद्याहून एक तार आली विनोबांच्या चुलत भावांनी एक छोटेसे दान पाठवले अन् संमेलनात एक लाख एकराची घोषणा झाली !

संमेलनात अखिल भारतीय सर्वसेवासंघाने भूदानयज्ञाचे काम उचलण्याचा ठराव केला आणि दोन वर्षांत सबंध देशभर पंचवीस लाख एकर जमीन प्राप्त करण्याचा संकल्प केला आजवर विनोबा एकाकी होते आता 'एकाकी पाऊलां मागुनि लक्षावधि' चालणार होते जमीन मागण्याचे काम हे विनोबांसारख्या संतालाच शक्य आहे असा सर्वांचा समज होता भूदान हे अहिंसक क्रांतीचे अभिनव तंत्र आहे, याची जाणीव अजून देशाला व्हायची होती गांधीजींच्या पार्थिव देहाबरोबर त्यांचे तत्वज्ञान हि भस्मसात् झाले, असे अनेकांना वाटे. गांधीप्रणीत विधायक कार्य देशभर करणारे शेकडो कार्यकर्ते आपापली कामें चालवीत होते पण निर्जीव पुतळ्याप्रमाणे त्यांच्या कामांत प्राण उरला नव्हता त्यांच्या चरख्यातून सूत निघे पण जगाला अहिंसेची दीक्षा देणारा क्रांतिविचार निघत नसे 'अणुयुगात जगासमोर आ वासून उभे असलेले प्रश्न अहिंसेनेंच सोडवता येतील गांधींचा देश हें काम नाही करणार तर कोण करील ? याची आच उरली नव्हती पण विनोबांच्या यात्रेमुळें जणू प्राण-संचार झाला सर्वोदय हे स्वप्न नसून सत्य आहे गांधींच्या देशाकडून जगाच्या फार अपेक्षा आहेत याची जाणीव झाली एक विधायक कार्यकर्ते भजन गात 'गौतम ऋषिकी नारी अहिल्या पत्थरसे तुम तार्‍यो राम' आम्ही दगडासारखे निष्प्राण बनलो होतो विनोबांनी आमच्यात प्राण ओतून आमचा जणु अहिल्योद्धार केला लहानथोर कार्यकर्ते भीत भीत लोकांना भूदान मागू लागले अन् जनताजनार्दन त्यांना भूदानच नव्हे तर श्रद्धेचे हि दान देऊ लागला गंगा-यमुनेच्या राम-कृष्णांच्या काशी प्रयागच्या भूमीनें कार्यकर्त्यांत निष्ठा निर्माण केली

विचारभेद, मतभेद असले तरी गरीबांच्या कल्याणाच्या, राष्ट्रनिर्माणाच्या कामात सर्व पक्षांनी एकत्र यावें असे विनोबा नेहमी आवाहन करीत 'राजकीय पक्षांची शक्ति आपापसात भांडण्यात खर्च होते त्यामुळे शक्तींची बेरीज न होता वजाबाकी होते आणि देशाला अगदीच अल्प शक्तीचा लाभ मिळतो भूदानाचे कार्य हे 'सर्वेषाम् अविरोधेन ब्रह्मकर्म समारभे' असे कार्य

आहे हे कार्य भारतीय संस्कृतीला अनुकूल असे कार्य आहे, यात सामाजिक व आर्थिक क्रांतीचे बीज आहे आणि या कार्याने विश्वशांति स्थापन करण्यास मदत होणार आहे तेव्हा यात सर्वांनी सहकार्य करावें " विनोबाना भेटायला येणाऱ्या मंडळीत नाना पक्षाचे लोक असत 'मी . पक्षातर्फे आपल्याला हार घालतो आहे ' विनोबाना ते आवडायचे नाही "मी तुमचे लेबल जाणत नाही मी तुमच्याकडे फक्त माणूस या नात्याने पाहतो. आपण सर्वांनी एकमेकाना माणूस म्हणूनच ओळखावें "

विनोबाचे सारें काही विलक्षणच मीराबाई म्हणते ना, 'उलट भई मेरे नयननकी ' लोक गतकाळातील गोष्टी सांगून सुस्कारा टाकीत म्हणत 'गेले ते दिवस'! आता जिकडे पहावें तिकडें भ्रष्टाचार, लाचलुचपत, स्वार्थ याचा नंगा नाच चाललेला दिसतो विनोबाना हे पटत नाही ते महाभारतातील गोष्ट सांगतात 'द्यूत संपला, पांडव हरले, द्रौपदीला पणाला लावले होतें त्यातहि ते हरले दु शासनानें द्रौपदीची वेणी खेचून तिला भर सभेंत ओढत आणले द्रौपदीने सर्वांना सवाल केला 'स्त्री जड संपत्ति आहे का पणाला लावायला ? " सभेंत भीष्म द्रोण विदुरासारखे महाज्ञानी बसले होते पण मूग गिळून स्वस्थ बसले कोणीहि उत्तर देऊ शकले नाही आणि आज ? आजचा छोटासा शाळकरी पोरगा देखील सांगेल की स्त्री काही जड वस्तु नाही, ती माणूस आहे तिला पणाला लावणें चूक आहे मग सांगा बर, माणसाची प्रगति होते आहे की अधोगति ? पूर्वीच्या काळी मोठमोठ्या राजाना कितीतरी राण्या असत अन् त्याची लाज धाटणें तर दूरच राहिले, त्यात प्रतिष्ठा मानली जाई आणि आज, एखाद्याला दोन बायका असल्या तर तो विचारा खाली मान घालून स्पष्टीकरण देऊ लागतो पहा केवढा फरक झाला आहे ! याचा अर्थ असा की कामनियमन पुष्कळ झाले आहे आता अर्थनियमन करायचे आहे काही दिवसानी असे होईल की आपल्या जवळ जास्त जमीन आहे, हे सांगायची माणसाला लाज वाटेल

जौनपुरला तेथील राजेसाहेब प्रमुख यजमान होते ते जनसंघाचे एक नेते मानले जात त्यानी स्वत भूदान दिले व आपल्या सहकाऱ्याना ह्या कामात सहकार्य करण्यास सांगितले त्याना वर्णाश्रम धर्माची नवीनच व्याख्या ऐकायला मिळाली 'वर्णव्यवस्था म्हणजे वर्गहीन, स्पर्धा रहित–

समाजरचना.' ..... उत्तर प्रदेशात आर. एस्. एस्. च्या कार्यकर्त्यांचेहि पुष्कळ सहकार्य मिळत असे. त्यांच्या प्रांतभरच्या कार्यकर्त्यांच्या मेळाव्यात विनोबा म्हणाले 'हिंदू धर्म समुद्रासारखा व्यापक नी विशाल आहे. संकुचित विचार त्याला सहन होत नाही. समुद्र सर्व नद्यांचा स्वीकार करतो. आपल्याला सर्वांकडे प्रेम व सहानुभूतीच्या वृत्तीने पहायचे आहे. सारे आपलेच आहेत'.

लखनऊ, उत्तरप्रदेशाची राजधानी. विनोबा तेथें पोहोचले, त्या दिवशी बुद्धजयंती होती. वैशाखातल्या निरभ्र आकाशात पौणिमेचा चंद्र चमकत होता. धरतीवर माणसांचा सागर होता पण त्यात लाटा उसळत नव्हत्या. शांत एकाग्रचित्तानें सारे संतवाणी ऐकत होते. "वेदात म्हटले की—

मित्रस्य मा चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षन्ताम्

मित्रस्याऽहम् चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षे ।

सर्व भूतमात्रांनी माझ्याकडे मित्राच्या नजरेनें पहावें असे मला वाटतें म्हणून मीहि सर्वांकडे मित्राच्या नजरेनें पाहतो. . जग तर आरसा आहे. आपण स्वच्छ निर्मल असू तर आरश्यात मलिनता दिसत नाही ...... अहिंसेचे, निर्वैरतेचे प्रमेय बुद्धदेवासारख्या महापुरुषाच्या जीवनाच्या छोट्याशा प्रयोगशाळेंत अनेकदा सिद्ध झाले आहे. मानवी इतिहासात गांधीजींनी प्रथम त्याचा सामूहिक क्षेत्रात प्रयोग केला. आपल्याला आता आर्थिक व सामाजिक क्षेत्रात सामूहिक अहिंसेचा प्रयोग करायचा आहे. हिंसा की अहिंसा या प्रश्नाचा निर्णय घ्यायला भारत आज स्वतंत्र आहे. नीट विचार करून निर्णय घ्या. हिंसेचा मार्ग घ्याल तर रशिया किंवा अमेरिकेला गुरु मानून त्यांचे पाय धरावे लागतील. अहिंसेचा मार्ग घ्याल तर भारत सर्व जगाचा गुरु होईल. प्रलयकाळात मार्कंडेय ऋषींनी जगाला तारले अशी कथा आहे. विश्वसहाराच्या या प्रलयातून जगाला वाचवण्याचे काम आपल्याला करायचे आहे. हवेला नी विचाराला कुणीच अडवू शकत नाही. एकतर तुम्हीं आपला विचार बाहेर पाठवाल नाही तर बाहेरचे विचार घ्याल. —करा निर्णय ! बुद्ध देवानी सुरू केलेले धर्मचक्र-प्रवर्तनाचे अपुरें कार्य आज आपल्याला पूर्ण करायचे आहे."

पुराणात वामनावताराची कथा आहे वामनाचे रूप धारण करून विष्णु बळीराजाकडे गेले आणि त्यानी फक्त तीन पावलाचे दान मागितले पहिल्या पावलात त्यानी सबंध पृथ्वीला व्यापून टाकले दुसऱ्या पावलात स्वर्गाला व्यापले नी बळीराजाला विचारले की तिसरे पाऊल कुठे ठेवू तेव्हा बळीने आपले मस्तक पुढे केले वामनाने बळीराजाच्या मस्तकावर पाय देऊन त्याला पाताळात ढकलले 'नम्र झाला भूता, त्याने कोंडिले अनंता ' विनोबा जनतेला सांगत की "मी वामनाचे रूप घेऊन फक्त तीन पावलाचे दान मागायला आलो आहे भूमिहीनाकरता सहाव्या हिश्श्याचे भूदान द्या, हे माझे पहिले पाऊल आहे 'शिवो भूत्वा शिवम् यजेत्' या न्यायाप्रमाणे गरीबाच्या सेवेला लागा, हे दुसरे पाऊल नी सर्व जमीनीची मालकीच सोडा, हे तिसरे पाऊल आहे '

कधी कधी सभेत विनोबा लहान मुलाना विचारीत, 'पांडव हे किती भाऊ होते ? ' 'पाच ' विनोबा म्हणत, अगदी चूक मुले बुचकळ्यात पडत विनोबा सांगत "पांडव पाच नव्हते, सहा होते कर्ण हा त्याचा सहावा भाऊ होता पण ते त्याला विसरले, त्यामुळे तो कौरवाच्या पक्षात सामील झाला आणि त्याने महाभारत-युद्धाच्या रूपाने संहार घडवून आणला तुमच्या गावचे भूमिहीन हे तुमचे सहावे भाऊ आहेत तुम्ही त्याना विसराल, त्याना जमीन देणार नाही तर महाभारत-युद्धाहूनहि भयंकर असा संहार होईल"

सशयात्म्याच्या शंकाना अंतच नसतो हजारो एकर जमीन मिळत असलेली पाहूनहि लोक विनोबाना म्हणत "या कलियुगात भूदानासारखे प्रेमाने क्रांति करण्याचे काम यशस्वी होणे शक्य नाही" विनोबाना ग्रथाचा नी अनुभूतीचा आधार मिळे "कलौ खलु भविष्यन्ति नारायण परायणा । कलियुगातील लोक नारायण परायण नारायणाचे उपासक होतील नारायण म्हणजे नर-समुदायात वास करणारा देव नारायणाची उपासना म्हणजे मानवाची सेवा कलीयुगातील लोक करतील असे भागवतातच लिहून ठेवले आहे

कानपुर जिल्ह्यातील पुखरायाँ गावी विनोबाच्या हस्ते भूमि वितरणाचा पहिला समारंभ झाला विनोबानी स्वत जमीन पाहून घेतली गगेचे पाणी पिऊन सुपीक झालेली उत्तम जमीन होती मधला एक तुकडा दानात मिळाला

नव्हता. विनोबानी जमीन-मालकाला म्हटले 'तेवढी जमीन ठेवून तुम्ही काय करणार ?' तीहि जमीन दानात मिळाली. भूदानाची जमीन वाटण्याची एक विशिष्ठ पद्धति आहे. प्रथम सर्व गावकऱ्यांची सभा घेतली जाते. गावात भूमिहीन कोण व किती हे सभेत कळतें. सर्वांच्या साक्षीने जमीन वाटली जाते म्हणजे योग्य माणसालाच जमीन मिळते. साधारणत. सरासरीने माणशी एक एकर या पद्धतीनें प्रत्येक कुटुंबाला जमीन दिली जाते जमीन कशी आहे हे पाहून कमी जास्तहि दिली जाते. कुटुंबाला वर्षाला पुरेल एवढे धान्य मिळावें अशी अपेक्षा असते. ज्याला जमीन मिळते, त्याला ती विकण्याचा किंवा गहाण ठेवण्याचा अधिकार नसतो. त्यानें मेहनत करावी व आपले पोट भरावें, मात्र करता त्याला जमीन मिळते. सर्व प्रांतातील सरकारांनी भूमिवाटप सुलभ व्हावें म्हणून कायदा केला आहे त्याद्वारें जमीनीचे हे हस्तांतरण कायदेशीर मानले जातें व त्याला रजिस्ट्रेशन फी लागत नाही ज्याला जमीन मिळते त्याला पाच वर्षांपर्यंत शेतसारा माफ असतो. कारण जमीन मिळाली तरी त्याच्याजवळ पैसा नसतो. शेतीकरता लागणारी इतर साधने बी-बियाणें, नांगर, बैलजोडी वगैरेची हि मदत त्याला हवी असते. काही ठिकाणी गावकरी लोक मदत करतात तर कुठें शहरातील लोक 'साधनदाना' च्या द्वारे मदत करतात. विनोबा दात्याला म्हणतात 'ज्याला तुम्ही प्रेमानें जमीन दिलीत त्याचा संसार हि थाटून द्या.'

भूमिहीनांना भूमि मिळणार यावर प्रथम लोकांचा विश्वास बसत नव्हता. आजवर असें कधी घडले नव्हतें मंगल कलश, धूप दीप यांच्या सान्निध्यात भूमिवाटपाच्या मंगल प्रसंगाची सुरवात झाली. एकाने वाटपाचे नियम सांगितले, 'जो भूमिहीन असेल, ज्याला शेती करता येत असेल व करण्याची इच्छा असेल आणि ज्याला उपजीविकेकरता दुसरा कोणताच धंदा नसेल त्याला जमीन मिळणार. कमीतकमी एक तृतीयांश जमीन हरिजनांना मिळणार.' सभेमध्यें 'पात्र' व्यक्ति बारा होत्या नी मिळालेली जमीन फक्त सहा जणांना पुरेशी होती मग जमीन कुणाला मिळणार ? वाटपाच्या पद्धतीनुसार भूमिहीनांनी स्वत च निवड करायची होती त्यांच्यातले जे सर्वांत अधिक गरीब नी गरजू होते त्यांची नावें त्यांनाच सांगायची होती. विनोबा व्यासपीठावरुन उतरले, भूमिहीनांशी सुखदु खाच्या गोष्टी करु लागले. तेवढ्यात

एक हरिजन सद्गदित होऊन बोलला "मला जमीन देऊं नका, त्या दुसऱ्याला द्या. तो माझ्यापेक्षाहि अधिक गरजू आहे त्याची लहान लहान कच्ची बच्ची आहेत. माझे मुलगे मोठे आहेत, आम्ही मोलमजुरी करून पोट भरू. जमीन त्याला द्या. मला नको. . . . . ऐकणाऱ्याच्या डोळ्यातून आसवें ओघळली. हे काय घडत होतें ? आज जगात सर्वत्र स्वार्थाचा धुजबुजाट चालला असताना एक गरीब हरीजन मान उचावून म्हणतो, 'मला नको, त्याला द्या', नव्या समाजरचनेच्या सर्वोदयाच्या आगमनाची चाहूल होती. राक्षसाच्या सहाराकरता आपल्या हाडाचे दान देणाऱ्या दधीचि ऋषीच्या भूमीत जन्म घेतलेला एक पुण्यात्मा आपल्याहून अधिक गरीब असलेल्या एका माणसाकरता, त्याग करीत होता. . . . विनोबानें जमलेल्या मडळीना विचारले 'अशा मगल वेळी तुम्ही स्वस्थ बसणार का?' एक माणूस पटकन म्हणाला, 'मी देतो पाच एकर जमीन.' 'फार छान! पण आणखी पाच जणाकरता जमीन हवी आहे, म्हणजे सर्व भूमिहीनाना देतां येईल' दोघानी दान दिले 'असा आनदाचा प्रसग पुन्हा येणार नाही सरकारी कागदपत्र घेऊन आलेला गरीब पटवारी हे सर्व पाहत होता. त्याला राहवले नाही. 'लिहून घ्या माझी सव्वा दो बीघे जमीन!' पाकिस्तानांतून आलेला एक निर्वासित जवळच बसला होता. इथें आल्यावर मेहनत करून आपल्या उध्वस्त जीवनाची बाग पुन्हा फुलवण्याचा तो प्रयत्न करीत होता. त्याच्या हृदयातील करुणा त्याला स्वस्थ बसू देईना. 'मी माझी सगळी जमीन बारा बीघे दान देतो.' . . . . . करुणेच्या वर्षावाने सर्व भूमिहीनाच्या जीवनाला नवी पालवी फुटली, सर्वांना जमीन मिळाली जमीन घेणाऱ्याच्या नी देणाऱ्याच्या चेहऱ्यावर सारखाच आनद झळकत होता. विनोबा नेहमी सागतात 'भूदानात सर्वांचे कल्याण आहे, देणाऱ्याचेंहि नी घेणाऱ्याचेंहि. एकाचे हित दुसऱ्याच्या विरोधी असतें हे तत्त्व चुकीचे आहे अहिंसेच्या मार्गानें सर्वांचे हित साधता येतें' . . . . विनोबाच्या या सूत्रावर तेथे जीवनभाष्य लिहिले गेले

वैशाखातले दाहक ऊन चोहीकडे सारी रखरखीत सृष्टि अन् उत्तर प्रदेशाची जीवघेऊ 'लू'! पण विनोबाना 'आनदाचे डोही आनद तरग' या पलीकडे दुसरी अनुभूति नाही वेदामध्यें सूर्याला मित्र म्हटले

आहे मित्र भेटायला म्हणून जवळ आला तर आनद नको वाटायला ? असा त्याचा युक्तिवाद त्याना ऊन जाळत नाही, थंडी गोठवत नाही की पाऊस भिजवत नाही वेदात म्हटले आहे की 'भक्ताला वसत, ग्रीष्म, वर्षा शरद हेमत शिशिर, हे सारच ऋतु रमणीय भासतात ' भक्तीच्या मस्तीत माणसाला ऋतुचक्राचे भान कुठून होणार ? त्यातच उत्तर प्रदेशच्या यात्रेत विनोबाच्या हाती सव्वातीन लाख एकर जमीनीचे भूदानहि आले होते हमीरपुर, जिल्ह्यात यात्रा चालली होती २३ मे १९५२ बेतवा नदीच्या तीरावर शेजारच्या मगरौठ गावचे निवासी स्वागतार्थ जमलेले विनोबानी मत्र दिला 'सारी जमीन देवाची गाव म्हणजे आपले विशाल कुटुंब ' मगरौठचे जमीनदार दीवान शत्रुघ्नसिंह व त्याच्या पत्नी रानी राजेन्द्रकुमारी यानी राष्ट्रीय चळवळींत फार मोलाची कामगिरी केली होती त्याच्या तपस्येमुळे जमीन खोदून तयार होती विनोबानी त्यात विचारबीज पेरले मगरौठच्या गावकऱ्यानी जमीन देवाची करण्याचे ठरवले दीवानसाहेबानी आपली सर्व जमीन दान दिली दुसऱ्या दिवशी त्यानी विनोबाच्या हाती एक कागद दिला भारतातले पहिले ग्रामदान घोषित झाले रक्ताचा थेबहि न सांडता, कुणाच्याहि हृदयाला न दुखवता, कुणाचहि अहित न करता जमीनीची व्यक्तिगत मालकी नाहीशी झाली

पहिल्या परमाणुचा विच्छेद झाला तेव्हा वैज्ञानिकाना कल्पनाहि नसेल की त्यातून विज्ञानालाच नव्हे तर मानवी जीवनालाहि कलाटणी मिळणार आहे मगरौठच्या त्या पहिल्यावहिल्या ग्रामदानाने माणसाच्या मनाला नी जगाला कुठली कलाटणी मिळाली, ह उद्याचे इतिहासकारच ठरवू शकतील

# व्यापक भूमिदान : ३ :

बुद्ध महावीराच्या पावलांच्या स्पर्शाने पावन झालेली विहारभूमीची वाट, राजप्रासादात राहून हि विरक्त राहिलेल्या राजर्षि जनकाच्या विदेह भूमीची वाट, शस्त्रसंन्यास घेऊन प्रेमास्त्राने जग जिंकणाऱ्या सम्राट अशोकाच्या मगधभूमीचा मार्ग घेतल्यापासून विनोबा सतत आवाहन करीत "बुद्धविहार भूमीच्या वंशजानो, अहिंसेच्या करुणेच्या मार्गाने क्रांति होऊ शकते, हे तुम्हाला सिद्ध करून दाखवायचे आहे क्रांति म्हणजे जीवनमूल्यामध्ये परिवर्तन. या अणुयुगात जो तलवार व हिंसेचा आश्रय घेईल तो जुनाट प्रतिक्रियावादी ठरेल ज्या दुर्जनाला नाहीसे करण्याकरता, तुम्ही हाती शस्त्र घ्याल, तो नाहीसा झाल्यानंतर तुमच्यात प्रवेश करेल, त्याचे शस्त्र तुमच्या हाती आले म्हणजे तुम्हीहि त्याच्याच सारखे दुर्जन बनाल रशिया व चीनचा इतिहास आपल्याला हेंच सांगत आहे जेव्हा साध्याबरोबर साधनातहि क्रांति होते तेव्हाच खरी क्रांति सम्यक् क्रांति किंवा सत्क्रांति होते "

कम्युनिस्ट कार्यकर्ते जनतेला सांगत 'या ढोंगी साधूपासून सावध रहा जमीनदाराचे हृदय-परिवर्तन कधीतरी होणें शक्य आहे का? त्यांना तर दंडुकाच दाखविला पाहिजे' विनोबा कम्युनिस्टांना विचारत 'कार्ल मार्क्स दंडुका घेऊन तुमचे परिवर्तन करायला आला होता का रे? तुम्ही स्वत कम्युनिस्ट कसे बनलात? मार्क्सच्या एका पुस्तकाने तुमचे हृदय-परिवर्तन केले तेव्हा तुम्ही स्वत च हृदयपरिवर्तनाचे प्रतीक आहात तुम्ही क्रांति क्रांति म्हणून ओरडता, पण क्रांति कशाला म्हणतात हे तुम्हाला माहीत नाही.

तुम्ही शातीला एका चौकटीत बसवू पाहता पण कुठल्या हि पुस्तकात लिहिल्या-प्रमाणे का कधी शांति होते ? साच्यात घातल्याने शांतीच नाहीशी होते. या भारतात शांति कशी करायची हे तुम्हाला कळत नाही मी वेदापासून गाधीपर्यंत भारतीय संस्कृतीच्या सर्व विचाराना पचवले आहे म्हणूनच मी सागत आहे की भारताचे एक स्वतत्र तत्वज्ञान आहे, एक मिशन् आहे, शातीचे एक भारतीय तत्र आहे "

शातीच्या भारतीय तत्रातले सगळेंच काही न्यारे आहे बिहारच्या यात्रेंत आरंभीच्या तीन चार महिन्यात विनोबाना दानपत्रें खूप मिळाली पण बहुतेक सारी गरीबाची होती चार दोन गुठ्याच्या त्या दानपत्राना विनोबानी 'शबरीची बोरें' नी 'सुदाम्याचे पोहे' असे नाव दिले देवाला असे दान फार आवडतें गरीब शेतकरी आपल्या तुटपुज्या जमीनीतला एक तुकडा भूदानयज्ञात श्रद्धेनें अर्पण करीत तेव्हा विनोबा म्हणत 'त्यानी आपल्या काळ-जाचे तुकडे अर्पण केले आहेत यातूनच अहिंसक शक्ति प्रकटेल त्याग आणि तपस्येतून नवी शक्ति निर्माण होऊ लागली

'सुरम्य शातिके लिये जमीन दो, जमीन दो'
महान शातिके लियें जमीन दो जमीन दो'

खेड्यापाड्यात हा आवाज दुमदुमू लागला दान देणारे गरीब शेतकरी अहिंसक क्रांतीचे अग्रदूत ठरले त्याच्या त्यागानें इतराना प्रेरणा मिळाली मोठमोठे जमीनदार दान द्यायला पुढे येऊ लागले

पालकोटचे राजेसाहेब विनोबाना म्हणाले 'आपल्या सोबत आठ-पधरा दिवस रहायची इच्छा आहे ' आजुबाजूचे लोक हसले हा राजा अन पायी चालणार! राजेसाहेब धार्मिक वृत्तीचे सज्जन पुरुष होते पदयात्रेंत विनोबाशी चर्चा करीत तेव्हा विनोबा सागत 'भूदानयज्ञाच्या द्वारें देशात मानवतेच्या धर्मविचाराची स्थापना होत आहे धर्माचे दोन विभाग आहेत--परिवर्तनशील आणि अपरिवर्तनशील सत्य, प्रेम, करुणा, ईश्वरभक्ति, ह्या गोष्टी कुठल्याहि काळात, कुठल्याहि परिस्थितीत न बदलणाऱ्या अशा आहेत आणि सर्व धर्म त्याचे प्रतिपादन करतात पण काही गोष्टी देशकाल-परिस्थितीनुसार बदलत असतात पूर्वी 'राजा कालस्य कारणम्' म्हटले जाई, आतो 'प्रजा कालस्य कारणम्', म्हटले जाणार समता हा आजचा युगधर्म

आहे करणेच्या द्वारे म्हणजे आध्यात्मिक मार्गाने भूमिसमस्या सोडवणें, हे प्रत्येक धार्मिक म्हणविणाऱ्याचे आजचें कर्तव्य आहे भुकेलेल्याला खाऊ घालणें, तहानेलेल्याला पाणी पाजणें ही खरी भक्ति आहे' ·

राजेसाहेब नवनवे विचार ऐकत, त्यावर विचार करीत अखेरीस त्यांच्या जिल्ह्यातल्या रांची शहरी त्यांनी साडेपन्नेचाळीस हजार एकराचें दानपत्र भक्तिभावानें अर्पण करीत जाहीर सभेत म्हटले की 'विनोबा आमची जमीन घेतात नी आम्हाला जीवदान देतात त्यांनी आम्हाला वाचवलें आहे नाहीतर रशिया-चीनच्या जमीनदाराप्रमाणें आमची हि दुर्गति झाली असती या भूदान-यज्ञात जमीन अर्पण करण्यात आमचे हित आहे काळाची पाऊलें ओळखून वागण्यानें आमचे कल्याण होईल नाहीतर विनाश अटळ आहे' विनोबा त्यांना म्हणाले 'मला नुसती जमीन नको आहे मला तुमचें हृदय पण हवे आहे तुम्ही आमचे काम हाती घ्या' . महालात राहणारे, मोटारीत हिंडणारे राजेसाहेब भूदानाचे कार्यकर्ते बनले, खादीचा साधा पोशाख चढवून अहिंसक क्रांतीच्या धर्मविचाराचा प्रचार करीत पायी हिंडू लागले आपल्या नातेवाईकाकडून, स्नेह्याकडून भूदान प्राप्त करू लागले, भूमिहीनाना जमीन वाटू लागले, कालचा शोषक आज सेवक बनला हृदय-परिवर्तनानतर जीवन-परिवर्तन झाले आणि समाज-परिवर्तनाचें कार्य सुरू झाले

पाटण्याला, अशोकाच्या पाटलीपुत्र नगरीत, २३ ऑक्टोबर १९५२ च्या जाहीर सभेत विनोबानी संपत्तिदान-यज्ञाची घोषणा केली "आजवर मी फक्त भूदान घेत असे आता संपत्तिदान हि घेईन म्हणजे पैसा हाती घेणार नाही, पैसा दात्याजवळच राहील 'मी दरसाल आपल्या उत्पन्नाचा "अमुक" हिस्सा समाजाला अर्पण करीत राहीन' अशा आशयाचे दानपत्र तेवढें माझ्या हाती राहील दानातील पैसा दाता स्वतःच समाजसेवेच्या कार्यांत खर्च करील नी हिशोब माझ्याकडे पाठवील नी कसा खर्च करायचा यावद्दल त्याला मार्गदर्शन मिळत राहील मला दात्याचा फक्त पैसाच नाही तर बुद्धि व शक्ति पण हवी आहे भारतातल्या प्रत्येक माणसानें आपल्या संपत्तीचा एक हिस्सा गरीबाच्या सेवेंत लावावा, ह्या धर्मविचाराची दीक्षा सर्वांना द्यायची आहे" सर्वोदयाच्या अर्थशास्त्राचे तात्त्विक

विवेचन ते अनेकदा करीत साम्ययोगाच्या अर्थरचनेचा आधार त्याना वेदोपनिषदात मिळे 'त्यक्तेन भुजीथा' त्याग करून मग भोग करा 'संपत्ति सब रघुपतिकै आही' सारी संपत्ति देवाची आहे संपत्तीवर माणसाची व्यक्तिगत मालकी राहणे हा अधर्म आहे तत्त्वज्ञानाच्या आधाराविना कोणताहि विचार टिकू शकत नाही आमच्या विचाराचे अधिष्ठान आहे अपरिग्रह आज जगात अपहरणाचा विचार पसरीत आहे अपहर्त्यांचे अपहरण करून समवितरण करावे असा तो विचार आहे आम्ही अपरिग्रहाचा विचार जगाला देत आहोत पूर्वीचे ऋषि यज्ञात आहुति देताना म्हणत 'इन्द्राय इदम्, न मम' हे इन्द्राचे आहे, माझे नव्हे, तसे आता आपण म्हणू या,'समाजाय इदम्, न मम' हे समाजाचे आहे, माझे नव्हे प्रत्येकाजवळ, जमीन, संपत्ति श्रमशक्ति, बुद्धि, विद्या, त्यापैकी जे काही आहे, ते त्याने समाजाला अर्पण करावे आणि मग समाजाकडून प्रसादरूपाने जे मिळेल ते ग्रहण करावे अपरिग्रहाच्या आधारावर नवी समाजरचना निर्माण करणे हे आमचे उद्दिष्ट आहे आजच्या एकागी नीतिऐवजी पूर्ण नीतीची प्रस्थापना करायची आहे आजचा समाज चोराला शिक्षा देतो पण त्याच्या बापाला प्रतिष्ठा देतो धनसंग्रह करणारा, दान न देणारा कजूस हा चोराचा बाप आहे, तो चोर निर्माण करतो मुलाला जेलात पाठवायचे आणि बापाला बाहेर राहू द्यायचे हा कुठला आला आहे न्याय ? '

विहारच्या यात्रेत अचानक विघ्न आले टाटानगर मुक्कामी विनोबाना ताप भरला आणि तो मॅलिग्नट मलेरियाचा ठरला तापातच ते चाडिलपर्यंत पोहोचले आणि तेथे त्याना तीन महिने मुक्काम करावा लागला विनोबानी औषध घेण्यास नकार दिला ताप चढत होता वेदना वाढत होत्या. अन् वेदाती विनोबा विनोदाने म्हणत होते 'आता मी वेदनेच्या हिमालयावर पोहोचलो" 'तू देह नसून आत्मा आहस 'तत्त्वमसि', देह नश्वर आहे आत्मा अमर आहे' ह्या वेदान दर्शनाची विनोबाना अनुभूति असल्यामुळे देहाच्या कष्टाची त्याना कधी जाणीव देखील होत नसे थर्मामिटर भलता आकडा दाखवी नी सभोवतालच्या लोकाच्या ताडचे पाणी पळे, पण विनोबा नेहमीप्रमाणेच शात, प्रसन्न असत, विनोद करीत, हसत, हसवीत. पुढे तर एक एक क्षण कठिण जाऊ लागला, जीवन-मृत्यूची सीमारेषा दिसू लागली राष्ट्रपति, पतप्रधान वगैरे अनेकानी

संदेश पाठवून औषध घेण्याविषयी विनवले. बिहारचे मुख्यमंत्री तर हाती औषध घेऊन त्यांच्या पलंगाशी धरणें धरूनच बसले. अखेरीस विनोबांनी औषध घेतले अन् काही तासात ताप उतरला.

चांडिलला पाचवें अ. भा. सर्वोदय संमेलन झाले. राष्ट्रपति राजेन्द्रबाबू संमेलनाला हजर होते. त्यांचे शरीर दिल्लीला 'राष्ट्रपति भवना'त असे नी हृदय विनोबांच्या सोबत त्यांच्या बिहारची पदयात्रा करी. संमेलनात विनोबांनी सर्वोदय-दर्शनाच्या एका महत्त्वाच्या पैलूवर प्रकाश टाकला, "शासनमुक्त समाज स्थापित करणें हे आमचे ध्येय आहे. त्याकरिता हिंसाशक्तीच्या विरोधी, दंडशक्तीहून भिन्न लोकशक्ति निर्माण करायची आहे. ... आमच्या कार्य-पद्धतीचे दोन विभाग आहेत—विचारशासन आणि कर्तृत्व-विभाजन." . साम्यवाद व सर्वोदय विचाराची तुलना करीत त्यांनी काही मूलगामी मुद्दे मांडले. ... "कांहींना नद्या नी कांहींना नाले का म्हणतात? कांही प्रवाह असे असतात की ज्यांच्यात दुसरे प्रवाह,नद्यानाले, मिळोत की न मिळोत, ते क्षीण होत नाहीत. त्यांचा स्वतःचा असा एक स्रोत असतो. तर कांही प्रवाह कांही काळ विशाल रूप धारण करून मग सुकून जातात. विचार प्रवाहांना व चळवळींना हि हाच नियम लागू आहे. साम्राज्यवाद हा एक क्षीण विचार आहे. कांही काळ त्याचा खूप जोर राहिला पण आता तो टिकणार नाही हें सर्वांना कळून चुकले आहे. साम्राज्यवादाची प्रतिक्रिया म्हणून मार्क्सवादाचा जन्म झाला. गेल्या शंभर वर्षांत मार्क्सवादानें साऱ्या जगावर प्रभाव पाडला. पण तो एक प्रतिक्रियारूप विचार असल्यामुळे तोहि हळू हळू क्षीण होत जाणार. सर्वोदय विचार हा एक स्वतन्त्र, स्वयम् विचार आहे, तो कशाचे उत्तर किंवा प्रतिक्रिया नाही. त्याची मुळें भारतीय संस्कृतीत खोलवर रुजली आहेत. त्यामुळे तो एक अमर, अक्षीण असा विचार आहे."

चांडिलच्या मुक्कामातील एक घटना. दुपारची वेळ. विनोबा वाचनात मग्न. एक गृहस्थ आले आणि प्रणाम करून समोर बसले. कितीतरी वेळ विनोबांचे त्यांच्याकडे लक्षच गेले नाही. नंतर जेव्हा त्यांनी मान वर करून पाहिलें, तेव्हा त्या गृहस्थांनी एक कागद अर्पण केला. एकावर अनेक शून्यें असलेलें असे तें दानपत्र होतें. कोणीतरी ओळख करून दिली. 'हे रामगडचे राजेसाहेब. एक लाख एकर भूमीचे दान द्यायला आले आहेत.' 'जमीन

दिलीत, ठीक केले पण आता आणखी जमीन मिळवण्याचे काम करा' राजे-साहेबानी आदेश मान्य केला विनोबा पुन्हा वाचनात गुग झाले एक लाख एकर जमीन मिळाली देणाऱ्यानें आपणहून, न मागता दिली भूदानाचे कार्य करण्याचे आश्वासन दिले अन् तरीहि काहीच घडले नाही, अशी त्याची वृत्ति! यात्रेत कधी कधी अगदीच कमी जमीन मिळाली एकदा तर फक्त सव्वा एकर मिळाली. त्या हि दिवशी त्याची तीच प्रसन्न शात अविकल मुद्रा! ते हसत म्हणाले 'सव्वा एकर म्हणजे सत्यनारायणाचा प्रसाद मिळाला' सुख-दु ख मान अपमान, यश-अपयश ही सारी द्वद्वें जिरविल्यानतरच अखड आनदाची अनुभूति होते

पहिल्या दोन वर्षांच्या यात्रेत विनोबा प्राचीन दडकाप्रमाणें चातुर्मासात एका ठिकाणी थावले पण विहार यात्रेपासून त्यानी पावसाळ्यातहि पदयात्रा चालूच ठेवण्याचे ठरवले त्या वर्षी वरुणराजा जणू कोपला होता सारखा पाऊस नी सर्व नद्याना अतोनात पूर पुराच्या सकटाने सारा उत्तर विहार म्हणजे गगेच्या उत्तरेचा भाग त्रस्त आणि ज्या भागात पुराचा तडाखा जास्त तिथेच विनोबाची यात्रा चालली होती कित्येकदा कबरभर पाण्यातून मैलचे मैल चालावें लागे सभेच्या वेळी आकाश कोसळे तेव्हा तर विनोबा लोकाना सागत 'केवढा आनदाचा प्रसग आहे हा परमेश्वर या जलधाराच्या रूपानें आपल्याला अनत हस्ताने आलिंगन देत आहे हा पाऊस पडतो आहे म्हणजे प्रभूची कृपाच आकाशातून खाली पडते आहे' त्यावेळी दक्षिण विहार-मध्यें अवर्षणामुळे लोक हवालदिल झाले होते विनोबा लोकाना म्हणत 'तुम्ही आजवर जमीनीचे वाटप चुकीचे केले, भूमिहीनाना जमीन दिली नाही म्हणून देवहि पाण्याचे वाटप हे असे करतो कुठे अति पाऊस देतो तर कुठें अगदी कमी' मुसळधार पाऊस असो, भाजून काढणारें ऊन असो, की कडाक्याची थडी असो विनोबाच्या यात्रेत कधी खड पडला नाही की त्याच्या आनदाला कधी गालबोट लागले नाही 'आनदाचे डाही, आनद तरग, आनदचि अग, आनदाचें।' अशी त्याची सदैव स्थिति, विहारच्या यात्रेला त्यानी नावच दिले 'आनद यात्रा'!

भारतातल्या चौदा स्वयभू ज्योतिर्लिंगापैकी विहारचे वैद्यनाथ धाम (देवघर) हे एक आहे वगाल व विहारच्या लोकाचे तें एक मोठें तीर्थक्षेत्र

आहे १९५३ च्या सप्टेंबरमध्ये यात्रेचा मुक्काम देवघरला होता वैद्यनाथचे मंदिर हरिजनाकरता खुले झाले नाही असे कळताच विनोबा जाहीर सभेत म्हणाले 'देवाच्या भक्ताना जेथे प्रवेश नाही तेथील मूर्ति प्राणहीन बनते. जिथे हरिजनाना प्रवेश नाही तिथे मी जात नाही' . . हे ऐकून मंदिराचे प्रमुख पंडे विनोबाकडे आले 'आमचे मंदिर हरिजनाकरता खुले आहे आपण तेथे अवश्य यावे आम्ही निमंत्रण द्यायला आलो आहोत' विनोबानी निमंत्रण स्वीकारले तिन्हीसांजेची वेळ विनोबा ध्यानमग्न अवस्थेत चालत होते. मनात वेदातील शिवस्तुतिपर मंत्राचा जप चालू होता सोवती मंडळी मागोमाग मौन घेऊन चालली होती त्यात काही हरिजन होते मंदिराच्या दाराशी पोहोचेपर्यंत चांगलाच काळोख होऊन गेला होता मंदिराच्या आतल्या प्रांगणात हि अर्धवट काळोख च होता गर्दी खूप होती विनोबा प्रांगणात शिरताच 'धर्म की जय हो' चा जयघोष झाला 'अधर्म का नाश हो' हा दुसरा जयघोष विनोबाना काही च ऐकू आले नाही त्यांचे ध्यान चालूच होते. घोषणा जोरजोरात होऊ लागल्या गोंधळ, गलका वाढू लागला गर्दीत यरेचसे साथी मागे राहिले चहूकडे गडबड होत असलेली पाहून विनोबा थांबले 'तुम्ही शांत रहा कुणाची इच्छा नसेल तर मी मंदिरात न जाता असाच परत फिरेन' गलका वाढला विनोबा दर्शन न घेताच परत फिरले. इतक्यात 'धक्काबुक्की सुरू झाली काय घडत आहे याची कुणालाच कल्पना येईना पण विनोबाच्या पाच सात सहकाऱ्यानी त्यांच्याभोवती कडे केले. बुक्याचा मार वाढला सहकारी शांतपणे मार खात होते काही पंड्यानी एका भगिनीचा गळा दाबण्याचा प्रयत्न केला पण ईश्वरकृपेने ती वाचली विनोबाच्या डाव्या कानावर एक जोराचा बुक्का बसला आणि त्यांचा तो कान कायमचा अधु झाला पण सहकाऱ्यानी सारा मार सहन करून विनोबाना वाचवले आणि बाहेर आणले एक सहकारी म्हणाले 'पूर्वी चळवळीत लाटी-चार्ज होई तेव्हा मला राग येई पण आज माझ्या मनात राग अजीबात नव्हता. मला वाटले वक्रासुर गुद्दे मारतो आहे नी मी भीमासारखा मार खातो आहे.'

. विनोबा तर सुखरूप मुक्कामी परतले पण काही सहकाऱ्याना हॉस्पीटल ची वाट धरावी लागली बाहीच्या मागे या मारामुळे जन्माच्या व्याधि लागल्या

देशभर खळबळ उडाली सर्वत्र पड्याचा निषेध होऊ लागला बिहार सरकारने काही पड्याना पकडले. दुसऱ्या दिवशी विनोबानी एक वक्तव्य घोषित केले —'काल मी महादेवाच्या दर्शनाला गेलो, तेव्हा दर्शन तर मिळाले नाही, पण महादेवाच्या भक्ताच्या हातचा मार प्रसाद म्हणून मिळाला ज्यानी मारपीट केली त्यानी अज्ञानामुळें तसे केले त्यामुळें त्याना काही हि शिक्षा होऊ नये माझ्या सहकाऱ्यानीं त्यावेळी शाति व निर्वैरभाव राखला, ही प्रभूची फार मोठी कृपा आहे ही घटना म्हणजे भेदासुराचा अतकालीन आक्रोश आहे, असे मी मानतो याची पुनरावृत्ति होऊ नये म्हणून सरकारने व्यवस्था करायला हवी विज्ञानाच्या या युगात प्रत्येक धर्माची कसोटी होणार आहे, याची जाणीव आपल्या समाजाला असायला पाहिजे 'पचवीस वर्षापूर्वी याच ठिकाणी गाधीजीवर दगडफेक झाली होती त्याचा उल्लेख करून विनोबा म्हणाले 'मी ज्याच्या चरणाचा दास आहे, त्याना मिळालेले भाग्य मलाहि लाभले त्याची मला धन्यता वाटते '

विज्ञानाच्या या युगात माणसानें सकुचित बुद्धि राखणें म्हणजे आपल्याच पायावर धोडा पाडून घेणें होय, असे ते नेहमी सागतात. 'विज्ञान आणि आत्मज्ञान हे मानव-पक्ष्याचे दोन पख आहेत बाह्य सृष्टीचे ज्ञान म्हणजे विज्ञान आणि स्रष्टयाचे ज्ञान म्हणजे आत्मज्ञान शरीर आणि आत्मा या दोन्हीचा हि विकास व्हायला हवा त्याकरता विज्ञान व आत्मज्ञान दोहोची कास माणसाला धरायला हवी मोटारीत दोन यत्रें असतात, दिशासूचक आणि गतिवर्धक त्याचप्रमाणें आत्मज्ञान हें दिशा दाखवील व विज्ञान त्या दिशेनें गति वाढवील तर पृथ्वीवर स्वर्ग अवतरेल .तुम्ही विनोबाचे म्हणणे नाही ऐकले तरी चालेल पण अॅटम बाँबचे तर ऐकाल ना ? तो तुम्हाला सागतो आहे की मानवानें परस्पर प्रेमाचा, अहिंसेचा मार्ग घेतला नाही तर सर्वनाश होईल . विश्वयुद्धाचे ( वर्ल्ड वॉर ) चे मला अजीवात भय नाही विश्वयुद्ध हें दैवी प्रेरणेनें होतें ( वर्ल्ड वॉर इज डिव्हाइन ) असे मी मानतो विश्वयुद्ध मानवाला अहिंसेकडे नेतें .लहान लहान झगडे, ल्ढाया, चाकू तलवारीसारखी लहान अस्त्रें सर्वात भयकर आहेत. ती नाहीशी करण्याकडे आपण शक्ति लावू या आणविक अस्त्रें तर माणसाला सागतात की लढाई करू नकोस जगात आज सर्वाना शातता हवी आहे.

पण ती मिळवायची कशी हे मात्र कुणाला कळत नाही भूमिसमस्येसारखा विकट प्रश्न आपण शांतिमय मार्गाने सोडवून दाखवू तर यातून जगाला शांततेचा मार्ग गवसेल"

शांतिमय क्रांतीचा संदेश देत, भूदान प्राप्त करीत शेकडो कार्यकर्ते बिहारच्या खेड्यापाड्यात हिंडू लागले त्यात विधायक कार्यकर्ते तर होतेच पण सर्व राजकीय पक्षाचे कार्यकर्ते देखील होते बिहारची भूमिसमस्या सोडवल्याशिवाय, म्हणजे बिहारमधील सर्व भूमिहीनाकरता जमीन मिळविल्याशिवाय बिहार न सोडण्याचा विनोबानी संकल्प केला होता त्याकरता बत्तीस लाख एकर जमीनीचे दान हवें होते 'एका त्रिकोणात एक प्रमेय सिद्ध झाले म्हणजे मग तें सर्व त्रिकोणात सिद्ध ठरते तसेच बिहारसारख्या एका मोठ्या व प्रातिनिधिक प्रांतात व्यापक भूमिदानाचा प्रयोग होऊन या मार्गानें भूमिहीनांचा प्रश्न सुटेल तर जगात कुठेहि अहिंसक पद्धति यशस्वी ठरू शकते हे सिद्ध होईल' असे ते नेहमी म्हणत बिहार प्रादेशिक कॉंग्रेस कमीटीन बत्तीस लाख एकर भूदान मिळविण्याचा संकल्प केला विनोबा कॉंग्रेस कार्यकर्त्यांना नेहमी सांगत की 'बिहारच्या चंपारण जिल्ह्यातच गांधीजीना असहकाराचे अहिंसक तंत्र गवसले आता आपल्याला भूदान-यज्ञाच्या रूपानें आर्थिक व सामाजिक क्रांतीचे अहिंसक तंत्र सापडले आहे त्याची यशस्विता सिद्ध करण्यात आपली सारी शक्ति लावणे हे आपल्या सर्वांचे कर्तव्य आहे' प्रजा-समाजवादी पक्षाचे त्यावेळचे प्रमुख नेते श्री जयप्रकाश नारायण यानी १९५३ पासून भूदानयज्ञाचे कार्य सुरू केले 'ज्याचे जीवन क्रांतीला वाहिलेले आहे अशा जयप्रकाशजीना भूदानयज्ञात क्रांतीचे दर्शन घडते, ही फार मोठी घटना आहे' असे विनोबा नेहमी म्हणत

१९५४ च्या मे महिन्यात बोधगयेला सहावे अ भा सर्वोदय समेलन झाले भारताचे राष्ट्रपति, पंतप्रधान व अनेक नेते समेलनाकरता तेथें आले सर्वांच्या समक्ष जाहीर सभेत बोलताना विनोबा म्हणाले 'भूदान-यज्ञात जमीन न देणें हा देशद्रोह आहे आज देश संकटात आहे दारिद्र्य, विषमता, शोषण, अन्याय या सर्वांचे अहिंसक पद्धतीनें निर्मूलन करून समता प्रस्थापित करणे हाच देशाला संकट मुक्त करण्याचा मार्ग आहे' सद्य स्थितीचे विश्लेषण करीत त्यानी इशारा दिला की 'गरीब लोक किती दिवस वाट पाहतील ?

आजची समाज रचना क्षणभर देखील सहन करण्याची माझी तयारी नाही ... ...आज जगात दोन प्रकारचे लोक आहेत, शांतिवादी आणि क्रांतिवादी. शांतिवादी लोक 'कायदा आणि सुव्यवस्था' राखू इच्छितात, समाज-रचना जशी आहे तशीच ठेवू पाहतात. 'जैसे थे' राखू इच्छितात. या उलट क्रांतिवादी लोक हिंसक मार्गाने समाज बदलू पाहतात. . ...आम्हाला 'जैसे थे' नको, क्रांति हवी, पण ती शांतिमय मार्गाने हवी आहे.

संमेलनात जयप्रकाशजींचे हृदयस्पर्शी भाषण झाले 'कार्यकर्ते वाढतील, तितकी कामाची गति वाढेल असे सांगून लोकांना आवाहन करीत ते सहज बोलून गेले 'मी या कामाला आपले जीवन दान देत आहे' टाळ्यांचा कडकडाट झाला. राजकारणातले आपले महत्त्वाचे स्थान सोडून जयप्रकाशजींनी क्रांतीच्या होमकुंडात आपल्या जीवनाची आहुति देण्याचे ठरवले आणि नव्या मनूचा आरंभ केला. 'एक माणूस सहसा आपल्या आयुष्यात दोनदा क्रांति करू शकत नाही. पण जयप्रकाशजी एक अद्भुत व्यक्ति आहेत त्यांनी स्वराज्याच्या लढ्यात जीवन अर्पण केले आणि नंतर 'पुण्यक्षया' चा, सत्तेचा मार्ग न धरता पुन्हा दुसऱ्या क्रांतीत स्वतःला झोकून दिले' असे विनोबा त्यानंतर अनेकदा म्हणाले जयप्रकाशजींच्या भाषणानंतर दुसऱ्या दिवशी पहाटे त्यांच्या हाती एक चिठ्ठी आली.

'श्री. जयप्रकाश,

कल आपने जो आवाहन किया था, उसके जवाबमें—

भूदानयज्ञ-मूलक, ग्रामोद्योग-प्रधान अहिंसक क्रांति के लिए मेरा जीवन समर्पण।

सर्वोदयपुरी विनोबा

२०-४-५४

जयप्रकाशजींनी संमेलनात विनोबांचे पत्र वाचून दाखवले आणि एकदम नवीनच कलाटणी मिळाली त्याच्यावर चिठ्यांचा वर्षाव होऊ लागला. एकेक चिठ्ठी उघडून ते वाचून दाखवीत नी 'अमुक कार्यकर्त्याने जीवनदान केले' हे घोषित होई. हा कार्यक्रम दिवसभर चालला. संमेलन संपले तेव्हा शेंकडो कार्यकर्त्यांनी भूदान-यज्ञात आपले जीवन दान दिलेले आढळले. त्यानंतर जीवनदानाचा प्रवाह अधिकाधिक विशाल रूप धारण करीत गेला.

विनोबा, भूदान-यज्ञाला आंदोलन ( चळवळ ) न म्हणता, आरोहण म्हणत पहाड चढताना कधी कधी फार कठीण चढण लागते, तशी याहि आरोहणात लागली एकदा तर विनोबा म्हणाले की 'चक्रव्यूहात सापडलेल्या अभिमन्यूसारखी माझी स्थिति झाली आहे' पण हळूहळू व्यूहाचा भेद होत गेला कधी कधी लोक विचारीत 'तुमचे काम अयशस्वी झाले तर काय कराल ?' विनोबा उत्तर देत "हे काम माझें नाही, देवाचे आहे मी तर त्याच्या हातातील साधन आहे मी स्वत चालत नाही, तो मला चालवितो आहे त्याचे काम यशस्वी झाले नाही तर त्याचीच फजीती होईल त्याला आपल्या प्रतिष्ठेची चाड असेल तर तो करील हे काम यशस्वी !" मोठे पुढारी भूदानाच्या कामाकडे लक्ष देत नाहीत असे कोणी म्हटले तर, विनोबा सांगत 'रामाचे काम वानरानी केले, कृष्णाचे काम गोपगोपीनी केले आणि ख्रिस्ताचे काम सुतार व कोळयासारख्यानी केले आमच्यासारख्या लहानाकडून मोठें काम करवून घेण्याची देवाला हौसच आहे'

बिहारच्या खेड्यापाड्यात पदयात्रा करीत भूदान मागणाऱ्या अनेक लहानमोठ्या कार्यकर्त्यांत अमेरिकन तरुणी 'पॅट' ही देखील होती भारतात एक संत पायी पायी चालतो, जमीन मागतो नी हजारो लोक जमीन देतात, या घटनेबद्दल जगभर कुतूहल निर्माण झाले होतें त्यामुळे युरोप, अमेरिका व जपान इत्यादि अनेक देशातील लोक विनोबाचे काम पहायला भारतात येत, व विनोबाच्या बरोबर पायी हिंडत व विचार समजून घेत पॅटची वृत्ति अधिक सखोल व गभीर अमेरिकेतल्या वैभवसपन्न जीवनात तिला रितेपणा, अशांति, असमाधान भासे आणि म्हणून शांति व समाधानाच्या शोधार्थ ती भारतात आली बिहारच्या यात्रेंत दोन वर्षं पायी हिंडली हिंदी शिकली आणि भारतात असेतोवर हिंदीशिवाय दुसरी भाषा बोलायची नाही असे ठरवले भूदान प्राप्तीकरता तिनें स्वतंत्र पदयात्राहि केली ज्या दिवशी जमीन मिळणार नाही, त्या दिवशी उपास करायचा हा तिचा सकल्प होता पण बुद्धाच्या भूमीतल्या जनतेनें तिला स्नेहासोबत रोज भूदानहि दिले बोधगयेच्या समेलनात इतरासोबत पॅटनें हि भूदान कार्याकरता जीवनदान दिले

बुद्धदेवानें गया शहराजवळील बोधगयेला अश्वत्थ वृक्षाखाली बसून तपस्या केली व तेथच वैशाखी पौर्णिमेला त्याला ज्ञान प्राप्त झाले अशी कथा

आहे चीन, जपान, व्हीएटनाम, कांबोडिया, थायलंड, ब्रह्मदेश, सीलोन, तिबेट इत्यादि सर्व देशात आज बहुसंख्य लोक बौद्ध आहेत त्या सर्वांचे श्रद्धास्थान, सर्वांत मोठें तीर्थक्षेत्र 'बोधगया' हें आहे वेदांत व बुद्धाचा अहिंसा-विचार याच्या समन्वयाच्या उपासनेकरता बोधगयेला एखादा आश्रम स्थापित करावा व परदेशातून येणाऱ्या यात्रिकांशीं स्नेहसंबंध जोडावे असी विनोबांची मनीषा होती पण दानात जमीन मिळाल्याशिवाय आश्रम स्थापायचा नाही, असे त्यांनी ठरवले होते बोधगयेच्या महंतांना हे कळताच त्यांनी बुद्धमंदिराजवळ असलेली तीन एकर जमीन समेलनात दान दिली त्या जमिनीकरता विरयेक देशाची सरकारें लाखो रुपये द्यायला तयार होती महंतजींनी भूदानयज्ञात तर आधीच शेंकडो एकर जमीन दान दिली होती अधिष्ठान मिळाले आणि बोधगयेला 'समन्वयाश्रमा' ची स्थापना झाली राष्ट्रपतीच्या हस्तें विहीर खणण्यास प्रारंभ झाला आणि खणता खणता काळ्याशार दगडाची सुंदर अभग बुद्धमूर्ति सापडली विनोबांना बुद्धदेवाचा आशीर्वाद मिळाला

बिहारच्या यात्रेंत भारतीय हृदयाचे अद्भुत दर्शन घडले गरीब, श्रीमंत, सुशिक्षित, अशिक्षित, वृद्ध, तरुण, बाल, स्त्रिया, पुरुष, हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन इत्यादि सर्वांनी भूदानयज्ञात आपापली आहूति अर्पण केली दानाच्या या कहाणीत रामायण-महाभारतांइतकीच व्यापकता, सखोलता व पावनता आहे. पलामू जिल्ह्यातील एक घटना भूदान कार्यकर्ते एका जमीनदाराकडे गेले "भूमिहीन हे आपले भाऊ आहेत प्रत्येक घरात पाच पांडव असतात असे आपण मानतो भूमिहीनाचा, सहाव्या भावाचा हिस्सा विनोबाजी मागताहेत" हे सारें समजावून सांगितलें जमीनदारानें पाच दहा एकर दान द्यायचे ठरवले. त्याच्याजवळ सहाशें एकर जमीन होती त्याचा आठ वर्षांचा छोटा मुलगा हे सर्व पाहत होता तो अडून बसला 'तुम्हाला सहावा हिस्सा म्हणजे शंभर एकर जमीन दिलीच पाहिजे' बाप ऐकेना मुलानें जेवण सोडले त्याचा सहा वर्षांचा धाकटा भाऊ म्हणाला 'दादा जेवत नाही तर मीहि जेवणार नाही' बापाला वाटले पोटात भूक कडाडेल तेव्हा मुकाट्यानें जेवतील पण सध्याकाळ झाली तरी दोन्ही बाळें उपाशीच होती ती प्रल्हादाच्या भूमीतली बाळें होती.

अखेरीस बाप नमला व त्याने शभर एकराचे दानपत्र लिहून दिले . उत्तर बिहारमध्यें विनोबाची यात्रा चालू होती शेजारच्या गावातून एक गृहस्थ सभेला आला व त्याने थोडेसे दान दिले घरी परतल्यावर त्यानें आपल्या आईला सारी हकीकत सांगितली आई रागावली 'इतकी कमी जमीन का दिलीस ? देवाने तुला पुष्कळ दिले आहे त्या सताच्या मागणीप्रमाणे निदान सहावा हिस्सा तरी द्यायचा होता थोडीशी जमीन देणे तुला शोभत नाही परत जा, आणखी जमीन देऊन ये' दुसऱ्या दिवशी ते गृहस्थ पुन्हा विनोबाच्या पडावावर गेले व सहाव्या हिश्याचे दान देत म्हणाले 'या मागें प्रेरणा माझ्या आईची आहे'

पूर्व पाकिस्तानच्या सरहद्दीजवळच्या पूर्णिया जिल्ह्यातली कथा एक मुसलमान जमीनदार विनोबांना भेटायला आले थोडी जमीन देण्याचा त्याचा विचार होता विनोबांनी सहाव्या हिश्याची मागणी करताच त्यांनीं विचारले 'सहावा हिस्साच का मागता ?' "त्याच असं आहे की साधारण प्रत्येक घरात पाच भाऊ असतात असं मानून मी म्हणतो की मी तुमचा सहावा भाऊ" मुसलमान गृहस्थ चटकन् म्हणाले "काय मजेदार योगायोग ! आम्ही पाचच भाऊ आहोत पण आम्हा मुसलमानात बहीणीचाहि इस्टेटीवर हक्क असतो आमच्या दोन बहीणी हि आहेत' 'ठीक, तुम्ही सात जण तर मी आठवा' विनोबा उद्गारले त्या गृहस्थानी आठव्या हिश्याचे दानपत्र मोठ्या आनदाने अर्पण केले या घटनेचा उल्लेख करीत विनोबाजी एकदा म्हणाले की 'त्याच्या चेहऱ्यावर पाहताच मला अल्लाचे दर्शन घडले'

बिहारची जनता नास्तिकालाहि आस्तिक बनवील गया जिल्ह्यात जयप्रकाशजींची यात्रा चालू होती सभेत भाषण संपल्यावर एक माणूस पुढे आला, 'माझ्याजवळ सहा एकर जमीन आहे मी सर्व दान देतो' 'अरे, पण मग तू काय खाणार ? एखादा एकर दे' जयप्रकाशजी त्याला समजावू लागले पण तो म्हणाला, "आजवर मला जमीनीचं सुख मिळाल आता दुसऱ्या एखाद्या भूमिहीनाला तें सुख मिळू द्या माझे दोन मोठे मुलगे आहेत आम्ही मजुरी करून पोट भरू, तुम्हाला माझी सारी जमीन घेतलीच पाहिजे" जयप्रकाशजींचे हृदय भरून आले ते एकदम म्हणाले 'शिबी-दधीचीच्या वशजा तुला मी नतमस्तक होऊन प्रणाम करतो !"

विहारच्या यात्रेत लाखो लोकांनी विनोबा वाणी-ऐकली पण त्यात स्त्रियांची संख्या फारच कमी पडदापद्धतीमुळें स्त्रिया बाहेर निघत नसत. विनोबा स्त्रियांना म्हणत तुम्ही या समाजाविरुद्ध बंड करा स्त्रियांनी अहिंसक क्रांतीच्या कार्यात पुढाकार घ्यावा असे तें वारवार म्हणत स्त्रिया आणि पुरुष यांना सर्व समान अधिकार मिळावे असें त्यांचे स्पष्ट मत आहे "आध्यात्मिक क्षेत्रात स्त्रियांच्या मार्गातील अडचणी दूर झाल्या पाहिजेत. स्त्रियांना ब्रह्मचर्याचा, सन्यासाचा अधिकार आहे शंकराचार्यांसारखी तेजस्वी, ज्ञाननिष्ठ, वैराग्य-संपन्न स्त्री निघेल आणि समाजाचे मार्गदर्शन करील, तेव्हाच स्त्रियांचा खरा उद्धार होईल" असे ते स्त्रियांना सांगत सुवर्णमोह हे स्त्रियांच्या गुलामगिरीचें एक कारण आहे असे हि ते सांगत "हे दागिने, सोन्याच्या बेड्या, तोडून फेंकाल तरच गुलामीतून मुक्त व्हाल"

सुशिक्षित लोक नेहमी एकच प्रश्न करीत 'तुम्ही पायी पायी हिंडून त्रास कशाला घेता? सरकारला कायदा करायला का नाही सांगत? विनोबा उत्तर देत "राजसत्तेद्वारे क्रांति होणें शक्य असतें तर हातीं असलेली राजसत्ता सोडून बुद्धदेव सन्यासी कशाला झाले असतें? भूमीचें वाटप हे काही आमचे साध्य नाही तें तर साधन आहे सामाजिक क्रांति हे साध्य आहे सरकार नोकर आहे जनता मालक आहे मी मालकांना विचार पटवून देत आहे त्यांना पटला तर ते आपल्या नोकराकडून काम करवून घेतील सरकार आहे शून्य आणि जनता आहे एक एकावर शून्य चढले म्हणजेच त्या शून्याला किंमत येते सरकार आहे बादली नी जनता आहे विहीर विहीरीत पाणी असेल तरच बादलीत येणार

" राजकारणात चाललेली सत्तेची स्पर्धा, स्वार्थाचा बुजबुजाट सारे समाज-जीवन गढूळ करीत आहे त्याच्या शुद्धीकरता निवडणुकीच्या पद्धतीत सुधारणा व्हायला पाहिजे आजच्या निवडणुकीत प्रत्येक उमेदवाराचा कार्यक्रम असतो-आत्मस्तुति, परनिंदा आणि मिथ्याभाषण निवडणुकामुळे जातिभेदाचे भूतहि पुन्हा डोकें वर काढू लागले आहे देशात दोनच प्रकारचे पक्ष आहेत, सत्ताधारी नी सत्ताकांक्षी सारे सत्तेच्या रिंगणाभोवती घिरट्या घालतात सेवेकडे कुणाचेच लक्ष नाही निवडणुका खेळाव्यात, लढू नये, खेळीमेळीने सर्व घ्यावे जे जिंकतील त्यांनी विष्णुसारखे आदर्श

सेवक बनावे. लक्ष्मी पायाशी असून हि विष्णु विरक्त असतो. जे हरतील त्यांनी शंकराप्रमाणे जनतेंत जाऊन सेवा करावी '

बिहारच्या जनतेंत अपार श्रद्धा. बुद्ध-महावीराच्या तपस्येला फळें येत गेली करुणामूलक क्रांतीच्या जयघोषाचे जनमनात पडसाद उमटू लागले. सव्वादोन वर्षांच्या बिहारच्या यात्रेच्या आरंभी 'जमीन दो जमीन दो', च्या घोषणा होत पण अंती जमीनीची दानपत्रें घेऊन उभे असलेले शेतकरी 'जमीन लो, जमीन लो' म्हणू लागले. भागलपुरच्या वकीलांचे शिष्टमंडळ विनोबाकडे गेले 'तुम्ही सगळ्या जगाचे भले करतो अन् आमच्या मात्र पोटावर पाय देता. आजकाल जमीनीच्या किंमती उतरत आहेत. लोक जमीनीकरता पूर्वीसारखे भांडत नाहीत. त्यामुळें आमचा धंदा बसत चालला आहे.' विनोबाना गमत वाटली. 'तुमचा धंदा बसणें, हीच क्रांतीची खूण आहे. तुमच्या जवळ विद्या आहे. नव्या समाजरचनेंत तुम्हाला हि अवश्य काम मिळेल.' बिहारभूमीत पुन्हा एकदा धर्मचक्र फिरू लागले. 'काळाची मागणी आणि धर्मविचार यांचा जेव्हा सयोग होतो तेव्हा धर्मचक्र-प्रवर्तन होतें ऋषि मुनि धर्मविचार नेहमीच सांगत असतात. पण भूदानयज्ञाचा विचार आज प्रत्येकाच्या हृदयाला स्पर्श करीत आहे, कारण कालपुरुष समतेची मागणी करीत आहे.'

बिहारची यात्रा संपवून १९५५ च्या एक जानेवारीला विनोबानी वंगभूमीत प्रवेश केला तेव्हा त्यांच्या हाती बिहारच्या बावीस लाख एकर जमीनीची तीन लाख दात्यानी दिलेली दानपत्रें होती. तीन लाखात बहुसंख्य गरीब शेतकरी होते. त्यानी निढळाच्या घामानें शिंपलेल्या प्राणप्रिय जमीनीतून एकेक हिस्सा समर्पण करून क्रांतीची हवा निर्माण केली अन् धर्मचक्र गतिमान् झालें. बुद्धदेवाच्या तपस्याभूमीनें धर्मचक्र-प्रवर्तन सुरू केलें

* * *

# भूमि-क्रांति : ४ :

'भेगेछ द्वार एशछ ज्योतिर्मय
तोमारि होक जय।
हे विजयी वीर नवजीवनेर प्राते, नवीन आशाय् खड्ग तोमार हाते'

'द्वार उघडून येणाऱ्या ज्योतिर्मय सूर्या तुझा जयजयकार असो. नवजीवनाच्या प्रातःकाली तू एखाद्या विजयी वीराप्रमाणें आला आहेस, तुझ्या हाती नवीन आशाचे खड्ग आहे'

बंगबालिका रवीन्द्रगीत गात होत्या। स्त्रियांनी शंख फुंकले, उलुध्वनि केला आणि विनोबांना पंचारतीने ओवाळले नव्या वर्षाच्या नव प्रभाती बंगभूमीत नवीन आशा प्रकटली

रामकृष्ण परमहंसाची ज्या ठिकाणी प्रथम समाधि लागली, त्या विष्णुपुर गावात त्याच स्थानी बसल्यावर विनोबाहि ध्यानस्थ झाले. "रामकृष्णानी जी समाधि व्यक्तिगत जीवनात अनुभवली, तिला सामूहिक रूप द्यायचे आहे आपल्याला सामाजिक समाधि साधायची आहे भूदानाच्या द्वारें जगताला क्लेश संघर्ष झगडे यापासून मुक्त करायचे आहे कोणी तरी हातावर सोन्याचे नाणे ठेवताच रामकृष्णाना विषारी जीवाणु चावल्या-गत वेदना झाल्या म्हणतात संपत्तीचे वाटप झाले म्हणजे मग तें वितरित कांचन परमेश्वराची विभूति बनते"

शेंकडो वर्षांच्या गुलामगिरीमुळें निस्तेज, निष्प्राण, जड बनलेल्या या देशाला अध्यात्माच्या दुंदुभीनें जागे करणारे विवेकानंदहि बंगालचेच त्यांनी

देशाला 'दरिद्रनारायणाची उपासना' शिकवली अन् गांधीजींनी ती पुढें चालवली त्याची आठवण करून विनोबा सांगत 'आपल्याला आता दारिद्रय नाहीसे करून नारायणाची स्थापना करायची आहे जनतेची सामूहिक शक्ति म्हणजे नारायणी शक्ति ती शक्ति प्रकटेल तर देशाचा उद्धार होईल'

चैतन्य महाप्रभूंच्यामुळे बंगालमध्यें भक्तीची परंपरा आजवर चालत आली आहे पाणी वाहतें असले म्हणजे शुद्ध राहतें विचाराचेंहि तसेंच असतें "भक्ति ज्ञान व कर्म यांचा त्रिवेणी संगम झाला म्हणजे व्यक्तीचें आणि समाजाचें जीवन शुद्ध नी समृद्ध बनतें भारतातल्या भक्तिसंप्रदायाला कर्मयोग व ज्ञानाची जोड द्यायला हवी नाहीतर तो एकांगी व दुबळा ठरतो

भारताच्या फाळणीमुळें बंगाल व पंजावला अपार दुःखें सहन करावी लागली आजहि बंगाल व्यथित आहे आणि म्हणून विचलितहि आहे बंगालच्या भूमीचेंच नव्हे तर कित्येक घराचे नी हृदयाचेंहि तुकडे झाले आहेत आजहि बंगालमधल्या अनेक घरातले अर्धे लोक पूर्व पाकिस्तानात तर अर्धे हिंदुस्थानात, पश्चिम बंगालात आहेत वर्षेन् वर्षे लोटली तरी त्यांच्या भेटीगाठी होत नाहीत त्यातच। पूर्व पाकिस्तानातून आलेल्या हजारो निर्वासितामुळें बंगालची परिस्थिति व मनःस्थिति आणखीच बिघडलेली पण बंगालच्या जनतेला विनोबाची ओळख पटली नी तिनें अक्षरशः प्रेमवर्षाव सुरू केला बिहारमधून ओरिसात जाताना विनोबानी वाटेत बंगालची फक्त पचवीस दिवस यात्रा केली त्या छोटयाशा यात्रेला त्यानी 'प्रेम-यात्रा' असें नाव दिलें तहानलेल्याला पाणी मिळाव, तसें बंगालच्या जनतेला विनोबाना पाहून वाटत होतें

मानवाच्या इतिहासात कितीतरी राजे जग जिंकायला निघाले होते सिकंदरहि त्यातलाच एक वायव्य दिशेनें भारतात प्रवेश करून त्यानें पोरसाला हरवलें अन तो विजयोन्मादात पुढें जाऊं लागला वाटेत एक फकीर बसला होता फकीरानें सिकंदराकडे ढुंकूनहि पाहिलें नाही, त्यामुळें सिकंदर रागावला 'कोण आहेस रे तू?' सिकंदरच्या प्रश्नावर फकीर हसला 'मी आहे दुनियेचा बादशाहा' सिकंदर आणखीच रागावला 'जग मी जिंकलें नी तू कसा झालास रे दुनियेचा बादशाहा?' फकीर खूपच हसला 'जग जिंकायला निघालास पण स्वतःला जिंकलें आहेस कां तू?' सिकंदर

वरमला ज्या भूमीत स्वत ला जिकणारी माणसे आहेत त्या भारतावर आपण कधीहि विजय मिळवू शकणार नाही, हे त्याला कळून चुकले

अशोकहि भारतातला एक चक्रवर्ती सम्राट होता पश्चिमेचे इतिहासकार म्हणतात की 'जगाच्या इतिहासाच्या आकाशात इतर सारे महाराजे, बादशाहा तारकासारखे चमचमतात पण अशोक मात्र एकटा चंद्रासारखा चमकतो आहे प्रेमाने जग जिंकू पाहणारा जगाच्या इतिहासातला तो एकटाच सम्राट आहे पण अशोकहि आपल्या पूर्वायुष्यात हिंसक होता. त्याला 'चड अशोक' म्हटले जाई अनेक मुलुख जिकल्यानतर त्याने कलिग देशावर, म्हणजे आजच्या ओरिसावर स्वारी केली कलिगच्या शेकडो वीरानी स्वातन्त्र्याच्या रक्षणाकरता प्राणार्पण केले अशोक जिकला पण विजयी मुद्रेने त्याने रणमैदानाकडे पाहिले तेव्हा त्याला रक्ताच्या नद्या वाहताना आढळल्या त्याच्या मनात धर्म जागला त्याने शस्त्रे फेकून दिली आणि बुद्धदेवाच्या अहिंसा-धर्माचा स्वीकार केला कलिग भूमीत प्रवेश करताच विनोबाना इतिहासाचे स्मरण झाले "चड अशोकाला धर्म अशोक बनविणाऱ्या कलिगभूमीच्या वीरानो, आता तुम्हाला नवा पराक्रम करायचा आहे, भूमि क्राति करायची आहे '

अपरिग्रही समाज स्थापित करणे म्हणजे सर्वांना साधु बनवायचे की काय असा प्रश्न अनेकाच्या मनात उपस्थित होई 'अपरिग्रही समाजाची पाच लक्षणे ऐकल्यानतर तो प्रश्न उरत नाही "त्यात अति सग्रह राहील पण तो विभाजित, वाटलेला असेल लक्ष्मी खूप असेल, पैसा नाही दूध-मधाच्या नद्या वाहतील दारु, सिगरेट सारख्या व्यर्थ गोष्टी राहणार नाहीत चागल्या वस्तूचा विकास करतानाहि क्रमयुक्त सग्रह केला जाईल माणसाच्या आवश्यकताचा क्रम खालीलप्रमाणे आहे आकाश, हवा, पाणी, अन्न, वस्त्र, घर, काम करण्याची साधने, ज्ञानाची साधने आणि मनोरजनाची साधने व्यसनाचा नवर अगदी शेवटी येतो भाडवलवादी विचारसरणीत उत्पादन व वितरण या दोन्हीतहि केन्द्रीकरण असते समाजवादात, उत्पादनात केन्द्रीकरण व वितरणात विकेन्द्रीकरण आणि सर्वोदयात दोन्हीतहि विकेन्द्रीकरण असते जो कच्चा माल खेड्यात उपलब्ध असेल, त्याच्या पक्क्या मालाची गरज असेल व खेड्यात तयार करणे शक्य असेल त्या कच्चा

मालाचा पक्का माल खेड्यातच तयार व्हावा, हे ग्रामोद्योगाचे एक मूलभूत तत्त्व आहे मोठमोठ्या उद्योगाचे राष्ट्रीयीकरण व्हावे सर्वोदय-विचार यंत्र विरोधी नाही आम्ही फक्त इतकेच म्हणतो की माणसाने यंत्राचे गुलाम बनू नये, यंत्राने माणसाचे गुलाम बनावे यंत्रें तीन प्रकारची असतात (१) समयसाधक यंत्रे—मोटर, आगगाडी, विमाने वगैरे याचा उपयोग अवश्य करावा पण विवेकाने करावा (२) सहारक यंत्रे—बदूक, तोफ, बॉब याचा उपयोग अजीबात होऊ नये (३) उत्पादक यंत्रें—यात दोन प्रकार आहेत पूरक व मारक एखादे यंत्र पूरक आहे की मारक हे देशकालपरिस्थितिनुसार ठरेल अमेरिकेसारख्या जनसख्या कमी व जमीन अधिक असलेल्या देशात ट्रॅक्टर पूरक ठरेल तर भारतासारख्या जनसख्या अधिक व जमीन कमी असलेल्या देशात ट्रॅक्टर मारक ठरेल आपापली परिस्थिति पाहून यंत्राचा उपयोग करावा '

१२ फेब्रुवारी हा गांधीजीचा श्राद्ध दिन त्या दिवशी आपल्या हाताने कातलेल्या सुताची एक गुंडी प्रत्येक भारतीयाने गांधीजीच्या स्मृतीला श्रद्धा-पूर्वक अर्पण करावी अशी विनोबाची मनीषा आहे सूत्रांजलीचा हा कार्यक्रम दरवर्षी देशभर सर्वत्र चालतो पण कोटीच्या देशात राहणाऱ्या विनोबाना हजारो गुंड्या मिळून समाधान होत नाही ते म्हणतात ' भारतातल्या माणसाने हजार नी लाखाची भिकार भाषा बोलू नये कोटीहून कमी सख्येचे ध्येय हे भारतीयाला शोभत नाही ' ओरिसाच्या यात्रेत श्राद्धदिनी यावर त्यानी अधिक विवेचन केले "आज जगात सर्वत्र कधी हॉट पीस तर कधी कोल्ड वॉर, असे चालते त्यात परिवर्तन व्हावे असे सर्वांना वाटते पण मार्ग सापडत नाही सुदैवाने गांधीजीनी आपल्याला मार्ग दाखवला आहे शोषण नाहीसे होत नाही, शोषणहीन समाज स्थापित होत नाही, तोवर जगात शांतता स्थापित होऊ शकणार नाही शोषण नाहीसे करण्याकरता माणसाने उत्पादक शरीर-परिश्रम करण्याची प्रतिज्ञा करायला हवी व श्रम सर्वांना अविरोधी असा हवा चर्खा हे अविरोधी उत्पादक श्रमाचे प्रतीक आहे चर्खा, अहिंसक क्रांतीचा झेंडा आहे खादी वापरणे म्हणजे साक्षात् क्रांतीच परिधान करणे होय देवाने माणसाला खायला एक छोटेसे तोंड दिले व काम करायला दोन लांब हात दिले देशातल्या सब माणसाच्या हाताना काम मिळेल तर देश सहज समृद्ध बनेल "

भारतीय माणसाला काशी, रामेश्वर, द्वारका व जगन्नाथपुरी या चार धामाची यात्रा करण्याची फार इच्छा असते मराठीत म्हणच आहे— 'काशीस जावे नित्य वदावे' विनोबाची यात्रा काशीहून वैद्यनाथधाम नी पुढें जगन्नाथपुरी कडे जात होती वैद्यनाथधाम ते पुरी हा रस्ता अहिल्याबाईने बांधला असे म्हणतात चैतन्यमहाप्रभु, गुरु नानक याच रस्त्यानें पुरीला गेले होते १९५५ च्या मार्च मध्ये पुरीला सातवे अ भा सर्वोदय समेलन झाले देशभरचे शेकडों सर्वोदय-कार्यकर्ते समेलनाकरता जमले होते समेलनात विनोबानी सर्वांच्या विचाराना व भावनाना चालना दिली "१७५७ मध्ये प्लासीची लढाई झाली आणि भारताच्या गुलामीची सुरवात झाली १८५७ मध्ये भारताने स्वातंत्र्याकरता जोरदार उठाव केला आता १९५७ मध्ये आपल्याला खऱ्या स्वराज्याची, ग्रामस्वराज्याची स्थापना करायची आहे भूमिसमस्या सोडवून भूमिक्रान्ति करायची आहे एवढेच नव्हे तर शासनमुक्त समाजहि स्थापायचा आहे छोटया हिंसेतून मोठया हिंसेकडे, पुढें अतिहिंसेकडे नी आता अहिंसेकडे कालप्रवाह वाहतो आहे मानवमानसयत्र मार्गे जाऊ शकणार नाही, ते पुढेंच जाईल त्याची गति अहिंसेकडे आहे एका अतिसूक्ष्म जड परमाणूच्या स्फोटातून विश्वसहारक शक्ति निर्माण होऊ शकते तर चैतन्यपरमाणु, ज्ञानपरमाणूतून विश्वाला वाचवणारी केवढी प्रचड शक्ति निर्माण होऊ शकेल, याची कल्पना करा भूदानयज्ञात अर्पण केलेले प्रत्येक दानपत्र हे विश्वशातिकरता मतदान आहे, हे लक्षात घेऊन सर्वांनी दोन वर्षांचा काळ या कार्याकरता द्यावा अशी माझी मागणी आहे हिंसत एखादें अस्त्र असफल ठरले तर त्याहून तीव्र अस्त्राचा प्रयोग केला जातो तीव्र तीव्रतर तीव्रतम ही हिंसेची प्रक्रिया आहे याउलट सत्याग्रहाची प्रक्रीया सौम्य, सौम्यतर, सौम्यतम अशी राहील "

पुरीनतर ब्रह्मपुर आले तेथें प्रथमच अखिल भारतीय कॉंग्रेस कमीटीची बैठक विनोबाच्या सान्निध्यात झाली विनोबांनी कॉंग्रेसजनाना सागितलें की "भूदानाच्या यज्ञानें देशाची नैतिक शक्ति, अहिंसक शक्ति वाढेल भारतानें शातिवादी परराष्ट्र धोरण स्वीकारले हे भारताच्या परपरेला साजेसेच आहे पण जोंवर देशात अहिंसक शक्ति निर्माण होत नाही तोंवर भारताच्या शातीच्या धोरणात शक्ति येणार नाही अमेरिका व रशिया परस्पराच्या

भयानें शस्त्रास्त्रें वाढवीत आहेत या दुष्ट चक्राचा भेद करायचा असल्यास भारताने युनिलॅटरल डिसआर्मामेंट, एकपक्षीय नि:शस्त्रीकरण करण्याची हिंमत दाखवायला हवी याला मी आक्रमणकारी अहिंसा म्हणतो आपल्याला अहिंसेचे आक्रमण करायचे आहे त्याकरता देशाला तयार करण्याचा सर्वोत्तम मार्ग भूदान हा आहे म्हणून या कामात सर्वांनी सहकार्य करावे "

बहरामपुर नतर ओरिसाच्या गजाम व कोरापुट या जिल्ह्यातील जगल-पहाडाच्या प्रदेशाची यात्रा सुरु झाली कोरापुट जिल्ह्यात सव्वीस ग्रामदानें मिळाली होती म्हणून विनोबाचे कोरापुटकडे विशेष लक्ष होतें कोरापुटच्या घनदाट जगलात जाण्याला फारसे कुणी उत्सुक नसत ओरिसातल्या सरकारी अधिकाऱ्याची कोरापुटला बदली झाली म्हणजे त्याना अदमानला पाठवल्या-सारखें वाटे नरभक्षक वाघ आणि जगली हत्ती याच्यामुळें तेथील जीवनहि मोठें धोक्याचें असे तेथील आदिवासी लोकात एक मोठी मजेदार चाल आहे एखाद्या स्त्रीच्या पतीला वाघानें खाल्लें अन् तिला पुनर्विवाह करायचा असेल तर ज्या माणसाच्या पत्नीला वाघानें खाल्लें असेल अशा च माणसाशी ती लग्न करू शकते हाच नियम पुरुषानाहि लागू आहे वाघानें माणसाला खाणें हा तेथील जीवनातील एक नित्याचा भाग येथील बहुसख्य जनता आदिवासी आहे तरी पण इतरहि अनेक जातीचे लोक येथें राहतात. कित्येक गावे समिश्र वस्तीची आहेत लागवडीखालची जमीन कमी आहे. पहाडाच्या कुशीत वसलेली लहान लहान खेडी आहेत खेड्याची लोकसख्या सरासरी २०० आहे बाहेरचे व्यापारी अधिकारी वगैरे येथें येऊन शोषण करतात त्यामुळें पाढरपेशा लोकाविषयी अविश्वास व भय सर्वत्र आढळतें. परदेशातून आलेल्या गोऱ्या ख्रिश्चन मिशनऱ्यानी मात्र जवळ जवळ शभर वर्षापासून येथील जनतेची सेवा केली आहे

कोरापुटच्या साध्याभोळ्या ग्रामीणाना विनोबाचा विचार चटकन पटे त्यातच येथील निष्ठावत कार्यकर्ते श्री विश्वनाथ पट्टनाईक याच्या सेवेमुळें लोकाची मनोभूमि बरीच तयार झालेलीच होती विनोबा त्याना सांगत—'भारतातल्या खेड्याच्या उद्धाराचा मार्ग आहे—ग्रामदान ग्रामदान म्हणजे खेड्यातल्या सर्व जमीनमालकानी स्वेच्छेनें आपल्या जमीनीची मालकी सोडून द्यायची व खेड्यातल्या सर्व लोकाचे मिळून एक मोठें कुटुब बनवायचे.

आज आपल्या खेड्यात ग्रामभावनाच नाही प्रत्येकजण आपापले तेवढे पाहतो त्यामुळे कोणीच सुखी होऊ शकत नाही सारी जमीन गावाची केली म्हणजे गावचे सगळे लोक मिळून योजना तयार करतील व सहकार्याने काम करतील तर उत्पादन वाढेल व आर्थिक स्थिति सुधारेल लोकाच्या आवश्यक्ता काय व कच्चा माल कोणता उपलब्ध आहे हे पाहून ग्रामोद्योग सुरू करता येतील, त्यामुळे बेकाराना काम मिळेल व लक्ष्मी वाढेल परस्पर प्रेम वाढले म्हणजे जीवनातील आनद वाढेल स्वार्थ, मोह, चोरी, स्पर्धा नाहीसे होऊन लोकाचा नैतिक स्तर वाढेल हे माझे, हे तुझे, अशी भावना माणसाला आसक्तीच्या बधनात जखडते जमीनीची मालकी सोडल्यामुळे गावकऱ्याना आसक्ति सोडण्याचा धडा मिळतो आणि त्याची आध्यात्मिक उन्नति होते

जगाचे एक कुटुब आहे म्हणण्याने वस्तु अव्यक्त होते, चटकन ध्यानात येत नाही, आणि छोटयाश्या कुटुबात राहण्याने माणूस आसक्त बनतो म्हणून आम्ही मधला सोपा मार्ग, मध्यम मार्ग शोधला आहे ग्रामपरिवार बनवा फार मोठा समुद्रहि नको की अगदीच लहान नालाहि नको छानशी नदी हवी "

कोरापुटमध्ये रस्ते फारसे नाहीतच त्यातून ते दिवस पावसाळ्याचे सर्व नद्यानाले पाण्याने तुडुब भरलेले विनोबाची रोजचीच वाट चिखल-पाण्याची पाऊस जोरात पडू लागला म्हणजे ते जोरजोराने वेदमत्र गात-

'स नो वृष्टिम् दिवस्परि
स नो वाजम् अनर्वाणम्
स न सहस्रिणीरिष '

'आमच्यावर पावसाचा वर्षाव होवो आमची शक्ति कुठित न होवो आमची इच्छाशक्ति शतगुणित होवो " पर्वत-नद्याच्या सगतीत वन-काननात राहणाऱ्या आदिवासीना ते म्हणत की 'तुम्ही ऋषीची बाळे आहात प्राचीन ऋषि असाच जगलात तपस्या करीत' एका सभेत त्यानी गावकऱ्याना सस्कृत श्लोक शिकवला सभेचा वर्ग झाला आणि सगळे गावकरी विद्यार्थ्याप्रमाणे घोकू लागत 'कराग्रे वसते लक्ष्मी' त्याना अपार आनद झाला शेकडो वर्षाच्या इतिहासात त्या लोकाना प्रथमच सस्कृत श्लोक, देववाणी शिकविली जात होती कोरिमान भागवताचे फार महात्म्य कवि

जगन्नाथदास यांचें ओडिया भाषेंतले भागवत सबंध प्रांतभर भक्तिभावानें वाचले जातें विनोबा जेव्हा लोकाना म्हणाले की तुम्ही संस्कृत भागवतहि शिका, तेव्हा त्याना आश्चर्याचा धक्का बसला 'आम्ही भागवत शिकू शकतो ? आहे अधिकार आम्हाला ?' आजवर कोणीहि त्याना भागवत शिकवले नव्हतें तुम्हाला भागवत शिकण्याचा अधिकार नाही असेंच सर्व धर्ममार्तंडानी त्याना सांगितले होते विनोबा म्हणाले 'मी शिकवेन तुम्हाला भागवत' लोकाचा आनंद गगनात मावेना पीडित उपेक्षित दलित वनवासियाच्या जीवनात जणू नवसंचार झाला !

कोरापुट यात्रेत रोज ग्रामदानें होऊ लागली जमीनीची मालकी नाहीशी करण्याकरता चीन व रशियात लाखो लोकांची कत्तल झाली असे म्हणतात भारतातल्या जंगलातल्या रमणीय प्रदेशात लोक स्वखुशीनें जमीनीची मालकी सोडू लागले आणि नवीन समाजाचा पाया रचू लागले ग्रामदानाला विनोबा अहिंसेचा अॅटम बॉंब म्हणत 'अॅटम बॉंबचा स्फोट जगात कुठेंहि झाला तरी सगळ्या जगावर परिणाम होतो व हवा अशुद्ध होते त्याच प्रमाणें कुठेंहि ग्रामदान झाले तरी त्याचा जगावर परिणाम होईल व त्यामुळें सगळ्या जगाचे वातावरण शुद्ध होईल कोरापुटमध्यें अहिंसेचे अॅटम बॉंब तयार करण्याचा कारखाना उघडला आहे ' भूमिसमस्या ही जागतिक स्वरूपाची आहे असं ते तेलंगाणा यात्रेपासूनच सांगत होते "जगातली सगळी जमीन सर्व मानवाकरता खुली व्हावी, जमीनीची मालकी सर्वत्र नाहीशी व्हावी, सर्व देशाचे दरवाजे सर्व मानवाकरता उघडे व्हावेत पासपोर्ट व्हीसा वगैरे नाहीसे व्हावेत, माणूस पृथ्वीच्या पाठीवर कुठेंहि जाऊ शकतो व मेहनत करून आपले पोट भरू शकतो अशी स्थिति आणायची, साऱ्या जगाचे एक राज्य करायचें, हे भूदानयज्ञाचे उद्दिष्ट आहे असें ते नेहमी म्हणत. देशोदेशींच्या लोकाना या कार्याचे आकर्षण वाटे आणि ते विनोबाचे काम पाहून प्रभावित होत व आपापल्या देशात परत जाऊन या कार्यावर लेख, पुस्तकें लिहून प्रचार करीत कवि टेनिसनचा नातू हॅलम टेनिसन यानें लिहिलेले 'भारताचा पायी चालणारा संत' हे पुस्तक इग्लंड-अमेरिकेत खूप गाजले फ्रान्सचे तपस्वी शांतिवादी 'शांतिदास' यांचे फ्रेंच भाषेतले 'गांधी ते विनोबा' हे पुस्तकहि फार मननीय आहे एक ऑस्ट्रेलियन तरुणहि

यात्रेंत आला व परतताना म्हणाला की कांही तरी संदेश द्या. विनोबांनी ऑस्ट्रेलियाच्या जनतेला नम्रतेनें सांगितले की 'तुम्ही आपल्या देशाचे दरवाजे चीन-जपानच्या लोकांकरता उघडे करा व त्यांना जमीन द्या. त्या देशामध्यें लोकसंख्या फार व जमीन कमी आहे उलट ऑस्ट्रेलिया, अमेरिका, कॅनडा वगैरे देशात जमीन भरपूर तर लोकसंख्या कमी आहे. तेव्हा चीन-जपानच्या लोकांना तुम्ही जमीन दिली तर पुढचे अनेक संघर्ष टळतील. नाहीतर तेथील लोकांना जमीनीकरता युद्धाचा मार्ग घ्यावा लागेल. ऑस्ट्रेलियाचे लोक चीन-जपानला प्रेमानें जमीन देतील तेव्हाच भूदानयज्ञ सफल झाला असे मी समजेन."
. . . . . मानपुर हें ओरिसातील पहिले ग्रामदान. ओरिसाच्या लोकांना विनोबा सांगत की 'आता मानपुरचे आक्रमण ऑस्ट्रेलियावर होणार आहे मानपुरचा ग्रामदानाचा विचार तेथें पोहोचणार आहे.'

'निरागस निष्पाप बालक जगन्मातेच्या अंगणात सहजपणें खेळत राहतें पण अभिमानी ज्ञानी मात्र बाहेरच्या दरवाज्यापाशीच उभा राहतो' अशा अर्थाचे एक रवीन्द्रगीत आहे. कोरापुटच्या बालकवत् वनवासी लोकांना भूमीक्रांतीचा युगविचार चटकन समजला आणि त्यांनी क्रांति करून दाखवली. याविषयी विनोबा म्हणाले "स्वराज्यातली मीठ-भाकरी चालेल पण गुलामीतली शिरा-पुरी नको असे आपण पूर्वी म्हणत असू; कारण स्वराज्याचे एक स्वतंत्र मूल्य आहे स्वराज्यानंतर सुखी होणें किंवा दुःखी होणें आपल्या हाती आहे स्वराज्य मिळण्यात मूल्य-परिवर्तन झाले. सुख आणि मूल्य-परिवर्तन या वेगवेगळया वस्तु आहेत आणि मूल्य परिवर्तनाचे विशेष मोल आहे. ग्रामदानाचेंहि स्वतंत्र मूल्य आहे. कारण त्यात मूल्य-परिवर्तन होतें." शेतीविषयकहि एक मूलभूत मुद्दा त्यांनी मांडला—"झाडाची मुळें जमीनीत खोलवर रुजली असली म्हणजे तें वहरतें. मुळें जमीनीतून उपटून काढली की झाड सुकून जातें माणसाचेंहि तसेच असतें माणसाचा भूमीशी, निसर्गाशी संबंध तुटला की त्याचे जीवन विकृत बनतें, विकास खुंटतो म्हणून प्रत्येक माणसाची मुळें जमीनीत रुजायला हवीत. प्रत्येकाचा जमीनीशी संबंध हवा. भूमिसेवा हा माणसाचा मूलधर्म आहे त्याचीच दीक्षा देशाला द्यायची आहे. प्रत्येक माणसानें, पंतप्रधानांनी देखील, रोज तास दोन तास तरी शेतात काम करावे. म्हणजे शरीर-मन-बुद्धीचे आरोग्य चांगले राहील."

अरण्य-यात्रेत वृक्षवेलीच्या सगतीत, झऱ्याचा खळखळ निनाद नी पाखराचे गोड सगीत ऐकत विनोबाना नित्यनूतन विचार स्फुरत उपनिषदात एक गमतीदार गोष्ट आहे एका राजाला कळले की राज्यात कुठेंतरी फार मोठा ज्ञानी आहे त्यानें ज्ञान्याच्या शोधार्थ चारीकडे दूत पाठविले दूतानी परतून सागितले 'नाही लागत शोध सारी नगरें धुडाळली पण काही पत्ता लागत नाही' राजा म्हणाला 'अरे वेडयानो, ज्ञानी कधी शहरात राहतो का? तुम्ही भलत्याच ठिकाणी शोध केला? गिरिराजाच्या निकट-नद्याच्या सगमाजवळ, ज्ञानी माणसे राहतात'. विनोबा क्राति-सूत्रें रचीत—"जमीनीचे वास्तविक मूल्य आहे तर संपत्तीचे काल्पनिक मूल्य आहे मला वाटतें की माझा जन्म सपत्तीची प्रतिष्ठा खतम करण्याकरिताच झाला आहे" "सुशासन नव्हे, स्वशासन हे आमचे ध्येय आहे त्याकरता सत्तेचे विकेन्द्रीकरण करायला हवे आणि शिक्षण-शास्त्र, मानस शास्त्र व तत्त्वज्ञानात अहिंसा मान्य करायला हवी — शिक्षणात दड आणि प्रलोभन याना काम राहता कामा नये अहिंसेचे दोन पैलू आहेत, आपण कुणाला न घाबरणें आणि दुसऱ्या कुणाला आपली भीति न वाटणें मानसशास्त्रात व्यक्तिगत मनाला गौण स्थान व सामूहिक बुद्धीला प्रधान स्थान दिले पाहिजे तत्त्वज्ञानात, आपण देह नसून आत्मा आहात, हा विचार मान्य करायला हवा"

"या विज्ञान-युगात निर्णयशक्तीला फार महत्त्व आहे आणि म्हणून स्थितप्रज्ञाच्या लक्षणाची आज विशेष गरज आहे"

येथील लोक ग्रामदानें कशी देतात, याचे बाहेरच्या सुशिक्षिताना आश्चर्य वाटे बाहेरून आलेल्या एका प्रोफेसरानें एका खेडयातील लोकाना हा प्रश्न विचारला अशिक्षित गावकरी म्हणाले 'देवानें सगळी अक्कल तुम्हा सुशिक्षिताना च दिली आहे, असे समजू नका आम्हालाहि त्याने बुद्धि दिली आहे आपल्या गावातील सर्व लोकाच्या कल्याणातच आमचे स्वत चे कल्याण आहे हे आम्हाला कळतें'—'पिके बुडाली, आणखी काही सकट आले तर काय कराल?'. गावकऱ्यानी हसत हसत उत्तर दिले—'हम जियेंगे तो साथ जियेंगे, मरेंगे तो साथ मरेंगे'

चहूकडे पसरलेल्या भाताच्या हिरण्यागार शेतामध्यें ती एक झोपडी खुलून दिसत होती- झोपडीत राहणारा माणूस त्या छोटयाशा गावच्या

सर्व जमीनीचा मालक होता बाकी सारे त्याचे मजूर. कुठल्या तरी सभेंत विनोबाचे विचार ऐकल्यापासून त्या माणसाच्या मनात मथन सुरु झाले होतें त्यानें आपल्या पत्नीचा सल्ला घेतला–' सारी जमीन दान देऊन जमीन गावाची करावी असे फार वाटते आहे काय करू, सुचत नाही ' पत्नी शातपणें म्हणाली 'आणखी विचार कसला करता ? माझी दोन मुले आजवर सुखासमाधानानें खातपीत असत. गावातली सगळी मुले माझीच मुले आहेत असे मी समजेन त्या सगळयाना चागलेचुगले खायला मिळेल तर माझा आनद वाढेलच तुम्ही जरुर ग्रामदान करा ' ग्रामदानाची घोषणा करताना त्या उभयताना स्वर्गीय आनद झाला

कोरापुटच्या या जगलात नेमकी पावसाळयातल्या चार महिन्यात विनोबाची यात्रा झाली विनोबा व त्याच्या यात्रीदलातील सोबत्यात कुणालाहि वाघानें खाल्ले नाही की हत्तीनी तुडवले नाही सार्पविंचू तर जवळ फिरकले देखील नाहीत पुराच्या पाण्यानें कुणाला वाहून नेले नाही की रस्ता चुकून कुणी काटयाकुटयात अडकले नाही मलेरिया नी नाना रोगाचे हे जगल म्हणजे माहरघरच. पण कुणी आजारी देखील पडले नाही यात्रा सपत होती, आपल्या सुशिक्षित सोबत्याना विनोबा म्हणाले ' या जगलात कोणी केले तुमचे रक्षण ? आता तरी देवावर विश्वास बसतो का ? जो देवाचे काम करतो त्याचे रक्षण देवच करतो '

ब्रह्मज्ञानाची प्राप्ति करायची असेल तर तपस्या करा असा आदेश उपनिषदें अनेकदा देतात विनोबा म्हणतात क्रांति करायची असेल तर तपस्या करा, चित्तशुद्धि करा, त्यातून शक्ति निर्माण होईल कोरापुटच्या यात्रेंत याचे प्रत्यतर आले चार महिन्यात सहाशे खेडयानी ग्रामदान केले. कोरापुटचा निरोप घेताना विनोबा म्हणाले 'विश्वयुद्धाची आणि विश्व-शातीची बीजें माणसाच्या हृदयातच असतात कोरापुटमध्ये ग्रामदानाच्या रूपानें अहिंसेचे सहाशे अँटम बॉंब्स तयार झाले आणि अहिंसेची शक्ति प्रकट झाली म्हणून या यात्रेला मी शक्ति-यात्रा, असे नाव देत आहे '

# ग्राम-स्वराज्य : ५ :

प्रभु रामचंद्राचे वर्णन करताना वाल्मीकीनें म्हटले आहे की तो सागराप्रमाणें गंभीर आणि नगाधिराज हिमालयाप्रमाणें महान् होता सागरापासून हिमगिरीपर्यंत पसरलेल्या या विशाल देशाला विनोबानी इन्द्रधनुष्याची उपमा दिली आहे इन्द्रधनुष्यात सात रंग असतात पण ते एकमेकात असे काही मिसळून गेले असतात की त्याच्या वेगवेगळ्या सीमारेखा दाखविता येत नाहीत एका प्रातातून दुसऱ्या प्रातात जाताना सीमेवर निरोप व स्वागताचा समारंभ होतो तेव्हां विनोबा म्हणतात 'कुठें आहे सीमारेखा ? खाली ही अखंड पृथ्वी आहे नी वर अनंत आकाश रंग, रूप, भाषा, पोषाख, आचार इत्यादीमध्यें भिन्नता असली तरी भारतीय हृदयाची भाषा एकच आहे, असा विनोबाना सर्वत्र अनुभव येई भारताच्याच नव्हे तर मानवाच्या हृदयाची भाषा एकच आहे माणसाला प्रेमाची भाषा शब्दाविना बोलता येते, कानाविना ऐकता येते

१९५५ च्या गाधीजयंतीला विनोबानी आंध्रात पाऊल टाकले देशभर राज्य-पुनर्रचनेच्या प्रश्नावर वादळ उठले होतें भाषाभिमान, प्रांताभिमान वर उफाळून आला होता एका नेत्यानें म्हटले की आपल्या देशात अजून ट्रायबॅलिझम आहे यावर विनोबानी म्हटले "भाषावार प्रांतरचना मूलत चागली आहे शेतकऱ्याच्या भाषेत राज्यकारभार चालावा हें लोकशाहीच्या दृष्टीनें आवश्यकच आहे ..... भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नावर काही ठिकाणी दंगे झाले, ही फार दु खद गोष्ट आहे पण



पुराण सार ची पूर्व तयारी भैया [अच्युतभाऊ] बरोबर चर्चा करतांना



बुद्धगयेला बुद्ध मंदिराच्या प्रांगणात बसून धम्मपदाचा पाठ करीत आहेत ता ७ १ ६१

भारतात भाषेनुसार प्रांत बनले आहेत, राष्ट्र नव्हे युरोपात एकच धर्म आहे, संस्कृतिहि समान आहे, लिपी एकच आहे आणि भाषामध्येंहि इतके साम्य आहे की एकमेकाच्या भाषा पधरा दिवसात शिकता येतात तरीहि युरोपात एकेका भाषेचे एकेक राष्ट्र बनवले आहे भारतात युरोपप्रमाणेंच अनेक भाषा आहेत, विशाल भूविस्तार आहे, नाना धर्म व जाति आहेत आणि तरीहि प्राचीनकालापासून भारत एक राष्ट्र बनले आहे प्राचीन ऋषि 'दुर्लभ भारते जन्म' म्हणत असत, 'दुर्लभ महाराष्ट्रे जन्म' किंवा 'दुर्लभ गुर्जरदेशे जन्म' असे म्हणत नसत युरोपला आमच्या सारखें एक राष्ट्र बनायला अजून खूप अवकाश आहे तेव्हा समाजशास्त्रात भारत युरोपच्या कितीतरी पुढें आहे "

बिहारची यात्रा सपल्यापासून प्रत्येक प्रातात विनोबाच्या भाषणाचा अनुवाद प्रातीय भाषेत होई विनोबाना भारतातल्या सर्व भाषा येत असल्या-मुळें अनुवादकाची चागलीच परीक्षा होई एखाद्या शब्दाचा अनुवाद करताना किंचित् छटा बदलली तरी विनोबा त्याला याबबीत व समर्पक शब्द सागत, अन् लोक आनदानें टाळ्या वाजवीत १९४० साली ब्रिटिश सरकारनें भारताच्या इच्छेविरुद्ध भारताला आपल्याबरोबर युद्धात खेंचले तेव्हा त्याचा निषेध करण्याकरता म्हणून गाधीजींनी वैयक्तिक सत्याग्रहाची चळवळ सुरू केली. त्यावेळीं त्यानी देशातले प्रथम सत्याग्रही विनोबाना व नवर दोनचे सत्याग्रही प नेहरूना नियुक्त केल होतें गाधीजीच्या या आदेशाचा गूढार्थ विनोबानी त्यावेळी ओळखला 'गाधीजींनी माझ्यावर या देशाची सेवा करण्याची जबाबदारी टाकली हें माझ्या लक्षात आले आणि जनतेच्या हृदयाशी एकरूप होण्याकरता म्हणून मी सर्व प्राताच्या भाषा शिकायला सुरवात केली" बेचाळीसच्या चळवळीत दक्षिणेंतल्या वेलोर जेलमध्ये असताना विनोबानी दक्षिणेच्या चारी भाषा तमिळ, तेलगु, कन्नड व मल्याळम् एकदम शिकायला सुरवात केली या चारी भाषात फारसे काहीच साम्य नाही व त्याच्या लिप्याहि वेगवेगळ्या आहेत फक्त कन्नड व तेलगुची लिपी जवळजवळ समान आहे सर्व लिप्या शिकण्यात विनोबानी आपले डोळे खूप बिघडवून घेतले सर्व लोकाना परस्पराच्या भाषा शिकायला सोपें जावें व भारताचे भावनात्मक एकीकरण

अधिक दृढ व्हावे म्हणून सर्व भाषांनी देवनागरी लिपी घ्यावी असें विनोबाचें मत आहे. देवनागरी लिपी शास्त्रीय दृष्टीनें उत्तम आहे त्यात काही बारीक दोष आहेत तेवढी सुधारणा करण्याकरता विनोबानी 'लोक नागरी' लिपी काढली. कार्यकर्त्यांनी निदान दोन चार तरी भाषा शिकाव्या व दक्षिणेची एक तरी भाषा अवश्य शिकावी असा विनोबाचा आग्रह असतो.

आंध्रची तेलुगु भाषा समृद्ध व विकसित आहे. संत कवि त्यागराज यांची भजनें पदे सर्व दक्षिण भारतात अतिशय लोकप्रिय आहेत. कर्नाटकी संगीत-पद्धतीतील बहुतेक रचना त्यागराजाच्या आहेत. पोतना हा आंध्रचा महाकवि. त्याने तेलुगु भाषेत लिहिलेलें भागवत आंध्राचे लोक फार भक्ति-भावाने वाचतात ग्रन्थ समाप्त झाल्यावर त्याला मित्रांनी सला दिला की 'तुझा ग्रन्थ राजाला अर्पण कर म्हणजे तुझा फायदा होईल.' पोतना शेतकरी होता, देवाचा भक्त होता. त्यानें उत्तर दिले 'माझा ग्रन्थ देवाकरता आहे. तो देवालाच अर्पण आहे.' आंध्रातल्या यात्रेंत विनोबा पोतनाच्या भागवताचे रोज अध्ययन करीत. प्रत्येक प्रांतातल्या यात्रेंत तेथील सर्वोत्तम आध्यात्मिक साहित्याचे अध्ययन करून विनोबा जनतेच्या हृदयाशी आपल्या हृदयाचे तार जुळवीत.

आंध्रात कम्युनिस्टांचा बराच जोर होता. निवडणुकींतहि त्यांना चांगले यश मिळाले होतें. त्यांनी आपल्या निवडणुकीच्या घोषणापत्रात म्हटले होतें की "आमचे सरकार स्थापन झाले तर आम्ही भूमिविषयक सुधारणेचा कायदा करू. वीस एकर ओलिताच्या जमीनीचे सीलींग करू." यावर विनोबा त्यांना म्हणत 'तुम्ही अगदीच प्रतिगामी झालात. आंध्रात वीस एकर ओली-ताच्या जमीनीचे सीलींग करण्यानें श्रीमंताजवळ भरपूर जमीन राहील व भूमिहीनांना फारसे काहीच मिळणार नाही.....क्रांति करण्याचा तुमचा दावा पोकळ आहे असे दिसते.' वैचारिक सफाई व्हावी म्हणून विनोबा सांगत की "सर्वोदय-विचार हाच एकमेव पूर्ण विचार आहे बाकी सगळे अरा-विचार आहेत जातिवादी आपल्या जातीच्या कल्याणाचा विचार करतात, धर्मवादी आपल्या धर्माच्या आणि राष्ट्रवादी आपल्या राष्ट्राच्या कल्याणाचा विचार करतात. हे सगळे मानवतेचे तुकडे करून एका तुकड्यासबंधीच विचार करतात कम्युनिस्टांचा विचारहि तुकड्याचाच विचार आहे. ते सबंध

मानवतेचे दोन तुकडे करून त्यातल्या एका तुकड्याचा, गरीबाच्या कल्याणाचा विचार करतात तो कितीहि मोठा तुकडा असला तरी शेवटी तुकडाच आहे सर्वोदय मात्र सर्व मानवाचे कल्याण चाहतो . .. . साम्यवादी राज्य-विलयनाच्या गोष्टी करतात व आज अगदी मजबूत हुकुमशाही हवी म्हणतात म्हणजे त्यांची हुकुमशाही नगद व राज्यविलयन उधार आहे. सर्वोदय-विचारात सत्तेच्या विकेन्द्रीकरणाद्वारे राज्यविलयनाच्या प्रक्रियेला आज-पासूनच आरंभ करायचा असतो भूदान हा शासनमुक्तिकडे नेणारा असा एक कार्यक्रम आहे जनतेनें भूमिसमस्येसारखा एक एक महत्त्वाचा प्रश्न स्वतःच्या शक्तीनें सोडविण्यानें सरकारची सत्ता कमी कमी होत जाईल. . . . हितविरोधाचा विचार चुकीचा आहे सर्वोदयाच्या योजनेत प्रायव्हेट सेक्टरहि १००% राहील व पब्लिक सेक्टरहि १००% राहील १००+१००=१०० असे हे सर्वोदयाचे विलक्षण गणित आहे, ग्रेटेस्ट गुड आफ दी ग्रेटेस्ट नंबर, जास्तीत जास्त लोकांचे जास्तीत जास्त भले हा युरोपातला विचार आम्हाला पसंत नाही सर्वांचे भलें व्हावें हे आमचे ध्येय आहे 'सर्वेत्र सुखिन सन्तु' ही ऋषीची आकांक्षा प्रत्यक्षात आणायची आहे"

रोज संध्याकाळच्या सभेंत प्रवचनानंतर प्रार्थनेचा कार्यक्रम असतो स्थान गांधीजींच्या आश्रमातील पद्धतीप्रमाणें गीतेतल्या स्थितप्रज्ञाच्या लक्षणाचे श्लोक, विनोबांनी रचलेली सर्वधर्म-नाममाला आणि एकादशव्रत-स्मरण असे पण आंध्रात प्रवेश केल्यापासून विनोबांनी मौन प्रार्थनेचा नवीन उपक्रम सुरू केला 'मौन ही सर्वोत्तम भाषा आहे' असे म्हणून ते जनतेला पांच मिनिटें मौन राखून ईश्वराचे ध्यान करायला सांगत 'राम कृष्ण हरि गोविंद, गॉड वाहेगुरु, सिद्ध, बुद्ध यापैकी ज्याला जें नांव प्रिय असेल त्या नांवाचा त्यानें मनात जप करावा व प्रभूला सत्य प्रेम व करुणा दे अशी प्रार्थना करावी सत्य प्रेम व करुणा हे सर्व धर्मांचे सार आहे' असे सांगून ते मौनास आरंभ करीत. सामूहिक ध्यान अन् तेंहि हजारोंच्या जाहीर सभेंत करण्याची लोकांना कधीच सवय नव्हती, पण पहिल्याच दिवसापासून हा नवीन उपक्रम यशस्वी झाला. विनोबा सांगत 'सामूहिक ध्यानांत आध्यात्मिक शक्ति प्रकटते '

आंध्रात आधी फारसे काही काम न झाल्यामुळें ग्रामदानें किंवा भूदानहि फार मिळालें नाही पण जनतेनें सर्वोदय-विचार उत्कटतेनें ग्रहण केला रोज

हजारो लोक विनोबा-वाणी ऐकत विनोबाच्या यात्रेसोबत सर्वोदय-साहित्याचे चालतें फिरतें दुकानहि असतें विनोबा जनतेला म्हणतात, 'तुम्ही इतके साहित्य विकत घ्या की आमच्या दुकानाचे दिवाळेंच निघावे' आंध्रात साहित्य-विक्री खूप झाली 'गीता-प्रवचनें' हे पुस्तक घरोघरी पोहोचावे अशी विनोबाची इच्छा आहे ते म्हणतात की या पुस्तकाच्या रूपानें मी सदैव तुमच्याजवळ राहीन प्रेमाचे प्रतीक म्हणून ते गीता-प्रवचनावर 'नित्य पठनीय' असे लिहून सही देतात 'गीता-प्रवचनें' मूळ मराठीत आहे १९३२ साली धुळ्याच्या जेलमध्यें असताना विनोबानीं गीतेवर प्रवचनें दिली आणि साने गुरुजीनीं ती टिपून घेतली पण आता भारतातल्या सर्व भाषात व इंग्रजीतहि गीता प्रवचनाचें भाषांतर झाले आहे देशभर सर्व भाषात मिळून त्याच्या दहा लाखावर प्रति विकल्या गेल्या आहेत भाषा शिकण्याला मदत व्हावी म्हणून कित्येक भाषातील 'गीता-प्रवचना' ची एक एक नागरी लिपीतील आवृत्ति हि काढली आहे विनोबा म्हणतात 'कुणी तलवारीच्या मदतीने जमीन मिळवतो तर कुणी कायद्याच्या पण मी गीतेच्या सहाय्याने जमीन मिळवतो'

दक्षिण व उत्तर भारतातल्या सभामध्यें एक फार मोठा फरक जाणवतो. उत्तर भारतात सभात स्त्रियाची संख्या विरळच असते पण दक्षिणेतल्या सभामध्ये पुरुषाच्या बरोबरीने स्त्रियाची संख्या आढळे मुसलमानाच्या राज्यामुळें उत्तरेत आलेली पडदा पद्धति दक्षिणेंत नाही अस्पृश्यतेचे भूत मात्र सगळीकडे आढळतें भूदान-यज्ञाच्या द्वारें संपूर्ण सामाजिक समतेची स्थापना व्हावी, स्पृश्यास्पृश्यभेद, जातिभेद, धर्मभेद, स्त्री-पुरुष-भेद नाहींसे होऊन सर्व मानवाना समान अधिकार व समान प्रतिष्ठा मिळावी, अशी विनोबाची आकांक्षा आहे

१९५६ च्या नव वर्षदिनी विनोबानी आंध्रातून हैदराबाद राज्यात प्रवेश केला त्यानंतर काही महिन्यानी हैदराबाद राज्याचे विघटन होऊन राज्याचे तेलुगु मराठी व कन्नड बोलणारे तीन विभाग शेजारच्या तीन प्रातात विलीन झाले भूदानाद्वारें बरीच जमीन वाटली गेल्यामुळें अशांतीची आग विझली आहे, असे विनोबांना त्याच्या तेलंगणाच्या या दुसऱ्या यात्रेंत आढळले. भय आतंक नाहीसा होऊन जीवन सुरळित चाललेले दिसले परंतु त्याच वेळीं राज्य पुनर्रचनेच्या प्रश्नावर देशात इतरत्र ठिकठिकाणी हिंसा झाली होती

त्याचा उल्लेख करीत ३० जानेवारीच्या पोचमपल्लीच्या सभेंत विनोबांनी सांगितलें की "ही हिंसा म्हणजे आमचा पराभव आहे शहरावर अजून आमचा प्रभाव पडला नाही पण दिवा कधी निराश होत नाही बाहेर जितका जास्त अंधार असेल तितका दिवा अधिक चमकतो यावेळी आपण आत्म-परीक्षण करायला हवें"

विनोबा विद्यार्थीहि आहेत नी शिक्षकहि अध्ययन केले नाही, असा त्यांचा एक दिवस जात नाही शिक्षण हा त्यांचा प्रिय विषय त्यात त्यांनी अनेक प्रयोग करून एक स्वतन्त्र दर्शनच मांडले आहे "शिक्षणावर सरकारची सत्ता असता कामा नये कारण त्यातून भयानक स्वरुपाची बौद्धिक गुलामगिरी व साचेबंदी निर्माण होते शिक्षण जनतेच्या व ज्ञानी लोकांच्या हाती असावें, त्यात निरनिराळे प्रयोग व्हावेत शिक्षित कुणाला म्हणावें याची त्यांची एक अभिनव व्याख्या आहे शिक्षण जितके वाढत जाईल, तितकी सैन्याची गरज कमी होत जाईल जिथे सैन्य शून्य तो देश सर्वांत अधिक सुशिक्षित"

आंध्र मानेन अडोनी या गावी विनोबांनी व्यापारी मंडळींना मौलिक गोष्टी सांगून आवाहन केले "हिंदू धर्मानें व्यापारालाहि मोक्षाचे एक साधन मानले आहे वैश्याचाहि एक धर्म आहे व्यापाऱ्याला मोक्ष मिळवण्याकरता घरदार व्यापार सोडण्याची गरज नाही त्याने आपल्या धर्माचें नीट पालन केल्यास त्याला मोक्ष मिळेल संग्रह हा व्यापाऱ्याचा धर्म नव्हे, शेतकरी मालक आहे व व्यापारी सेवक गांधीजीच्या कल्पनेनुसार व्यापाऱ्यांनी ट्रस्टी या नात्यानें आपल्या संपत्तीचा उपयोग समाज-सेवेच्या कामात करावा"

विधान-सभेच्या सदस्यांनाहि त्यांच्या धर्माचें भान करविलें गेलें. "हिंदुस्थानच्या प्राचीन राज्यशास्त्रानें राज्यकर्त्यांना सांगितलें आहे कीं समाजात अभय निर्माण करणें हें त्यांचे कर्तव्य आहे आज तर सारें जग भयभीत आहे अशावेळी जो देश निर्भय बनेल तोच जगाला वाचवेल प्रजेत अभय यावें म्हणून समाजातील, दारिद्र्य, दुःख, विषमता यांसारखीं भयस्थानें नाहींशीं केली पाहीजेत शिक्षणात सुधारणा केली पाहीजे नवें राज्य आल्यानंतर त्याच क्षणीं नवा झेंडा फडकवीला जातो, त्याचप्रमाणे, नवें शिक्षणहि सुरु व्हायला पाहीजे स्वराज्य मिळाल्यानंतरहि जुनेंच शिक्षण-पद्धति चालू आहे, हे फार मोठें दुर्दैव आहे . . . आपण गरीबांचे सेवक आहोंत, ही

गोष्ट राज्यकर्त्यांनी नेहमी ध्यानात ठेवावी नियोजन करतानाहि जे सर्वांत दु खी असतील त्याना सर्वांत प्रथम मदत मिळेल, अशी योजना हवी"

तिरुपतीचा बालाजी, दक्षिण भारतातील एक प्रसिद्ध तीर्थक्षेत्र आहे. तेथे 'भारत हा सस्कृति-सगमाचे प्रतीक आहे,' हे सागून विनोबा तमिलनाड (मद्रास राज्य) कडे वळले श्रीरगम्, चिदबरम्, रामेश्वर, मदुरा, काची-पुरम, कन्याकुमारी वगैरे अनेक महान् तीर्थक्षेत्रें हे तमिलनाडचे एक वैशिष्टय आहे तेथें अगदी लहान खेड्यातहि एक भव्य मदिर आढळतें मदिरासभोवती गाव वसलेला असतो विनोबा तेथील लोकाना सागत "सारी जमीन व सपत्ति ईश्वराला अर्पण करायची, याचा पदार्थपाठच याच्या द्वारे मिळतो भागवतात म्हटले आहे की "सगळ्या जगातून भक्ति नाहीशी झाली तरी द्रविड देशात राहील" उत्तरेतील आर्य आणि दक्षिणेतील द्रविड याच्या सस्कृति-सगमातून आजची भारतीय सस्कृति आकारास आली आहे मध्ययुगातील चार महान् आचार्य दक्षिणेतील होते शकराचार्य केरळचे, रामानुजाचार्य तमिळनाडचे, वल्लभाचार्य आध्रचे व मध्वाचार्य कर्नाटकचे. रामानुजाच्या भक्तिमार्गाचा उत्तरेंत फार प्रसार झाला तुलसीदास, सूरदास, कबीरदास वगैरे उत्तरेंतील बरेचसे सत रामानुजसप्रदायाचे आहेत तमिळनाडमधील सत-परपरा फार प्राचीन आहे अनेक आळवार (सत) भक्तीचा सदेश देत शेकडो वर्षे सचार करीत होते त्यातील एका सताची कथा विनोबा नेहमी सागत "भयाण रात्र होती खूप पाऊस पडत होता एक आळवार एका लहानशा खोलीत झोपले होते दारावर कुणीतरी थाप मारली त्यानी दार उघडले एक माणूस ओला-चिंब होऊन उभा होता आश्रयाला आला होता सताने त्याला आत घेत म्हटले 'खोली फार लहान आहे, इथें एकच माणस झोपू शकतो पण दोन बसू शकतात आपण दोघेहि बसू या' थोडया वेळानें दारावर पुन्हा थाप ऐकू आली आणखी एक माणूस आश्रय मागत होता सताने म्हटलें 'या आत इथे दोन माणसे बसू शकतात पण तीन उभे राहू शकतात आपण तिघेहि उभे राहू या' विनोबा म्हणतात भूदानयज्ञामार्गे ही वृत्ति आहे आपल्याजवळ जे काही आहे तें वाटून खाऊ या कुटुंबात असेच होतें पुरणपोळी असो की मीठभाकरी असो, जें असेल तें सर्वजण वाटून खातात व अधिक मिळावें म्हणून सर्वजण झटतात. कुटुबाचा हा न्याय समाजाला लागू करायचा आहे

परदेशातून विनोबाचे काम पहायला येणारी माणसें मजेदार प्रश्न करीत व विनोबा उत्तरेंहि मजेदार देत एका अमेरिकननें विचारलें 'तुम्हाला दर मैलाला किती जमीन मिळाली?' विनोबाचा हिशोब तयारच होता 'सरासरी दर मैलाला शभर एकर!' ख्रिसमसचे दिवस जवळ आले दुसऱ्या एका अमेरिकनानें म्हटले आमच्या देशाकरता काही तरी सदेश द्या विनोबा हसले 'मी काय सदेश देणार? अजून इथेच आम्ही विशेष असे काम केले आहे?' पण तो आपला हट्ट सोडेना शेवटी विनोबानी सदेश दिला की "२५ डिसेंबर हा प्रभु येशु ख्रिस्ताचा जन्म-दिन तेव्हा त्या दिवशी ख्रिस्ताचे नाव घेऊन तुम्ही आपली सर्व शस्त्रास्त्रें समुद्रात बुडवून टाका रशियालाहि मी हेंच सागेन यावर जर तुम्ही म्हणाल की शस्त्रास्त्रनिर्मितीच्या कामात अनेकाना काम मिळतें तर मी असा सल्ला देतो की वर्षभर शस्त्रास्त्रें बनवा म्हणजे बेकाराना काम मिळत जाईल व दरवर्षी ख्रिस्तजन्माच्या शुभमुहूर्तावर वर्षभराची सारी शस्त्रें बुडवीत जा" आजवर नाना देशातील माणसें भूदान-यात्रा पहायला आली पण रशियाची आली नव्हती आघात प्रथमच रशियन लोक यात्रेत आले व त्यानी यात्रेची फिल्महि घेतली एका डच माणसानें म्हटले की 'मी भारतात खूप हिंडलो दिल्ली, मुंबई, कलकत्ता, मद्रास सर्व पाहीलें पण गाधीजीचा प्रभाव सर्वत्र नाहीसा झालेला दिसतो. गाधीजींचा प्रभावहि त्याच्या देहाबरोबरच नाहीसा झाला का?' विनोबानी त्यावर एक भाषणच दिले "देशात गाधीजीचा प्रभाव वाढत आहे असे मला वाटते याची चार कारणें देता येतील—

(१) भारतानें शातता, तटस्थता व मैत्रीचे परराष्ट्रीय धोरण स्वीकारलें

(२) हळूहळू सरकारला ग्रामोद्योगाचे महत्त्व पटू लागलें आहे

(३) भूदान-यज्ञाच्या विचाराचें देश स्वागत करीत आहे

(४) थडी ऊन वारा पाऊस याची पर्वा न करता शेंकडो कार्यकर्ते खेड्यापाड्यात, रानावनात पायी हिंडून भूदान मिळवीत आहेत.

हें गाधीजींच्या प्रभावाचे दृश्य स्वरूप आहे"

औद्योगीकरण, व मुद्राचा प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळें की काय कोण जाणे पण परदेशी पाहुण्याना विनोबाच्या विचाराचें मर्म पटवून बढायचें.

एका वृद्ध अमेरिकन प्रोफेसरनें विनोबाचा फक्त एक मिनीटाचा वेळ मागितला व प्रभुजवळ विनोबाकरता प्रार्थना करीत तो म्हणाला—" गांधीजींना जसं मीठ, तशी तुम्हाला जमीन ना? " विनोबा खुश झाले " अगदी बरोबर. मिठाच्या सत्याग्रहाच्या काळात गांधीजी मीठ तयार करायला सांगत पण मीठ तयार करणें हे काही त्यांचे ध्येय नव्हते. तर मिठाच्या निमित्ताने देशात स्वराज्याची शक्ति निर्माण करणे हे ध्येय होते तसेच भूदान हे मला निमित्तमात्र आहे भूदानाच्या द्वारे विश्वशांतिकरता अनुकूल वातावरण निर्माण करणे हा माझा उद्देश आहे "

•पाकिस्तानने अमेरिकेकडून लष्करी मदत घेण्यास सुरवात केल्यामुळे देशात चिंतेचे वातावरण होते या प्रश्नावर कांचीपुरमच्या सर्वोदय-संमेलनात विनोबा म्हणाले की ' पाकिस्तानच्या वाढत्या सैन्यशक्तीला उत्तर कसे द्यायचे हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे आज जगात भय इतके वाढले आहे की यापूर्वी इतकें भय कधीच नसेल रशिया व अमेरिका एकमेकांना भितात व भीतीमुळे शस्त्रास्त्रे वाढवीत राहतात भारत व पाकिस्तानचीहि तीच गत आहे शक्ति वाढावी म्हणून पाकिस्तान सैन्य वाढवीत आहे तेव्हा आपल्यालाहि शक्ति वाढवली पाहीजे असे बोलले जाते पण शक्ति कशात आहे ? वाटाघाटी करायला आम्ही तयार आहोत पण वाटाघाटीमागे शक्ति हवी असे दोघेहि म्हणतात यावर माझें असे म्हणणें आहे की, तो सैन्य वाढवीत आहे तर तुम्ही कमी करत जा हे तुम्हाला वेडपटासारखें वाटेल, पण थोडा थंड डोक्याने विचार कराल तर लक्षात येईल की आजच्या भय, हिंसा व प्रतिहिंसेच्या दुष्ट-चक्रातून जगाला वाचवायचे असेल तर कुणाला तरी निर्भयतेने सैन्य बरखास्त करण्याची हिंमत करावी लागेल आणि भारतासारखा गरीब देश सैन्य वाढवीत राहील तर जनता उपाशी मरेल हे विसरू नका रशिया चीनसारखे आमच्या जवळ हैड्रोजन बाँब नाहीत तर आम्ही विचार करतो की निदान चाकू तरी जवळ असू द्यावा, म्हणजे वेळप्रसंगी आपले नाक कापून शत्रूला अपशकून तर करता येईल ! "

तमिळ ही एक स्वतंत्र व प्राचीन भाषा आहे किमान दोन हजार वर्षांपूर्वीपासून तिचा विकास अखंड चालत आलेला आहे 'तिरुक्कुरळ' हा तमिळमधला प्राचीन धर्मग्रन्थ आजहि फार लोकप्रिय आहे विनोबाजींचा

तमिळ प्रथांचा अभ्यास फार दांडगा. गेल्या भाषणांत तमिळ मनाची अनेक वळणें ते धडाधड म्हणून दाखवीत तेव्हां लोक आनंदानें टाळ्या वाजवीत. राजाजींचे तमिळ लेखनांत अग्रगण्य स्थान आहे, पण विनोबांचें तमिळवरचें प्रभुत्व पाहून राजाजीहि आश्चर्यचकित होत. 'आमच्यावर हिंदी लादली जात आहे, उत्तर भारतीय लोक आमच्यावर साम्राज्य गाजवू पाहतात' अशी त्या दिवसांत फार ओरड होती. 'द्रविड कळहम्' व 'द्रविड मुन्नेट्र कळहम्' हे दोन राजकीय पक्ष तर उत्तर भारताच्या प्रभुत्वांतून मुक्त होण्याकरतां स्वतंत्र "द्रविडीस्थाना' ची हि मखून मधून मागणी करत. हिंदी विरोधी आंदोलनाचे तेच कर्णधार. त्रिचनापल्ली हा त्यांचा प्रमुख अड्डा. तेथें त्या पक्षाचे नेते रामस्वामी नायकर आपल्या काही अनुयायांसह विनोबांना भेटले व फार प्रेमानें गोष्टी झाल्या. नंतर सभेंत विनोबा लोकांना म्हणाले "तुम्हाला हिंदी शिकायला पाहीजे. शंकर रामानुज त्या काळची राष्ट्रभाषा संस्कृत शिकले म्हणूनच ना सार्‍या भारतावर दिग्विजय करू शकले! क्रिकेटमध्यें इनिंग्ज् असतात त्याप्रमाणे देशाच्या इतिहासांतहि कधीं उत्तर भारताची इनिंग चाले तर कधीं दक्षिण भारताची. प्रथम उत्तरेची इनिंग होती. वेदोपनिषदांतील विचार उत्तरेतून दक्षिणेकडे गेला. नंतर दक्षिणेची इनिंग सुरू झाली. शंकर-रामानुजांनीं दक्षिणेतून उत्तरेंत विचाराचें लोण नेलें. पुढें उत्तरेची इनिंग झाली, रामकृष्ण, विवेकानंद, गांधीजी, टागोर इत्यादींचा उत्तरेंतून विचार इकडे आला. आता पुन्हा दक्षिणेची इनिंग सुरू व्हायला हवी. त्याकरतां तुम्ही राष्ट्र-भाषा हिंदी शिका आणि उत्तर भारतांत जाऊन पराक्रम करा." विनोबांचें भाषण चालू होतें तेव्हां कित्येकांना वाटलें की सभेंत गोंधळ होईल, दगडफेक होईल. पण लोक तर तन्मयतेनें ऐकत होते अन् चार दोन वाक्यानंतर खुश होऊन टाळ्या पिटीत होते.

उत्तर-दक्षिण, ब्राह्मण-ब्राह्मणेतर आस्तिक-नास्तिक वगैरे वादामुळें तमिळनाडचें समाज शरीर-व्याधि ग्रस्त झालेलें होतें. पक्षभेद, जातिभेद इत्यादींची जोड होतीच. विनोबांनीं विचार-अस्त्रें चालवीत व तमिळ संतांचीं भक्तिभावानें भजनें गात या व्याधींवर उपाय सांगितले. "आस्तिकांच्या करुणाशून्य वृत्तीतूनच नास्तिकता जन्माला येते. मानवसेवा हीच या युगातली भक्ति आहे ही गोष्ट ओळखून आस्तिक म्हणविणारे लोक करुणेचें कार्य

करू लागतील तर नास्तिकता आपोआप नाहीशी होईल पूर्वी मंदिराकरता जमीन देण्याची प्रथा होती पण आज मंदिर-मठाच्या द्वारें शोषण होत आहे तेव्हा मंदिराकरता जमीन देणें हा आज अधर्म आहे मंदिर-मठांनी पूर्वीची तपश्चर्येची परंपरा चालवावी म्हणजे धर्मतेज पसरेल विज्ञान-युगांत खरा धर्म वाढणारच आहे भक्ति म्हणजे 'न मम' ही जमीन, संपत्ति माझी नाही, ईश्वराची आहे जमीनीची मालकी समर्पण करण्यानें समाजात आस्तिकता वाढेल" विनोबांच्या तमिळनाड-यात्रेबद्दल राजाजींनी उद्गार काढले की 'आमचा तमिळनाड अहिल्येप्रमाणें जडवत्, नास्तिक, भक्तिशून्य बनला होता विनोबांनी आमचा अहिल्योद्धार केला'

सात महिनेपर्यंत विनोबा तमिळनाडच्या हृदयावर तपस्याभक्तीचा अभिषेक करीत होते अखेरीस मदुरा जिल्ह्यात मीनाक्षी मातेच्या कृपेनें पाझर फुटला व ग्रामदानें होण्यास सुरवात झाली मदुरा जिल्ह्यातली ही ग्रामदानें, कोरापुटसारखी आदिवासींची नव्हती, तर सुशिक्षित, पुढारलेल्या लोकांनी विचार समजून उमजून आपापला मालकी हक्क विसर्जित केला होता आणि जमीनहि कावेरीचे पाणी पिऊन पुष्ट झालेली कुठें कुठें तर पाच सात हजार रुपये एकराची देखील जमीन, वर्षांतून तीन चार पिकं देणारी जमीनीची किंमत जसजशी वाढते तसतसा माणसाचा मोहहि वाढतो म्हणतात त्यातच मदुरा जिल्ह्यातील बरीच गावें भिन्न भिन्न जाति व धर्म असलेल्या समिश्र वस्तीची अशा ठिकाणी ग्रामदान होणे हे आजवर अशक्य मानले जाई पण तुकाराम महाराज म्हणतात ना 'अशक्य तें तुम्हा, नाहीं नारायणा, निर्जिवा चेतना आणावया' नारायणाच्या आदेशानें सुरू झालेल्या कार्यांत नारायण अशक्याला शक्य बनवीत होता भूदानयज्ञ सुरू झाला तेव्हा तमिळ-नाडचे प्रमुख कार्यकर्ते जगन्नाथन् विनोबांना भेटायला उत्तर प्रदेशात गेले. तेथें मिळणार दान पाहून त्यांना आश्चर्य वाटे ते म्हणत 'आमच्या तमिळनाड-मध्यें काही असे भूदान मिळणे शक्य नाही आमच्याकडे अशी श्रद्धाहि नाही, जमीनहि मूल्यवान् आणि लोक सुशिक्षित म्हणून बुद्धीला फाट फार' विनोबा त्यांना सांगत 'जें काय गंगा-यमुनेच्या प्रदेशांत होऊं शकतं तें कावेरीच्या प्रदेशातही अवश्य होईल" जगन्नाथन् अश्रद्ध मनानें परतले आणि आता या कावेरीच्या प्रदेशांत भूदानच नव्हे तर ग्रामदान होत होतें भूमिवाटपाच्या

एका समारंभात राजाजी म्हणाले 'आपल्या पूर्वजांचा विश्वास देखील बसणार नाही, असे हे अद्‌भुत कार्य घडतें आहे'

गंगेच्या प्रवाहाप्रमाणें मानवाचे मन सगळीकडे पावनच आहे पण काही ठिकाणी काशी, प्रयाग, हरिद्वार या तीर्थक्षेत्राप्रमाणें त्यात काकणभर अधिक असे काही आढळते तमिळनाडमध्यें जनमनाच्या श्रद्धेचें दिव्य दर्शन सतत घडायचे उंच उंच मंदिराप्रमाणेंच हिंदू संस्कृतीचे एक रमणीय रूप दिसायचे विनोबानी कुठल्याहि गावात प्रवेश केला की घर न घर सारवून स्वच्छ केलेलें, अंगणात सडा नी त्यावर रांगोळी, दाराभोवतीं केळीचे खांब, मंगल कलश आणि आरतीची तारटें हाती घेऊन उभ्या असलेल्या भगिनी, हे दृश्य दिसायचे साष्टांग नमस्कार केल्याशिवाय तर येथील लोकांना चैनच पडत नाही. मग विनोबा नव्या युगांतला 'दंडवत् प्रणाम्' म्हणजे काठीप्रमाणे ताठ उभें राहून प्रणाम करायला शिकवीत खाली वाकू नका, नम्रता हृदयात ठेवा, रोजच्या जाहीर सभेनंतर मौन प्रार्थना होई डिंडिगलच्या सभेंत लाखावर समुदाय असेल लहान मुलामुळें सभेंत फारशी शांतता नव्हती पण विनोबानी 'ॐ शान्ति' म्हणताच जादुमंत्रासारखा परिणाम झाला नी इतकी विलक्षण शांतता पसरली की डोळे मिटलेल्याला वाटावें की सगळे लोक घरोघरी निघून गेले असावेत! तें दृश्य पाहून बिहारचे एक गृहस्थ म्हणाले 'मला वाटायचे की बिहारसारखी श्रद्धा कुठें नाही, पण आज माझा गर्व गळून पडला'

ग्रामदानाच्या पायावर ग्रामस्वराज्याची इमारत उभारण्याचा खादी, ग्रामोद्योग, जातिभेद-निरसन व नई तालीमचा कार्यक्रम देत विनोबा म्हणत, "देशाला स्वराज्य मिळाले पण तें दिल्लीतच अडकलें खेडयाखेडयात पोहोचलें नाही खेडी पूर्वीसारखीच आजहि गुलाम आहेत जनशक्ति जागेल व प्रत्येक खेडयातले लोक आपापल्या खेडयाचा सर्व कारभार एकोप्यानें व सहकार्यानें चालवू लागतील, तेव्हा खेडयात स्वराज्य पोहोचेल खादी, ग्रामोद्योग म्हणजे उद्योगाचे विकेन्द्रीकरण करून खरें स्वराज्य स्थापायचे आहे सत्ता व संपत्तीच्या केन्द्रीकरणातून गुलामगिरीच निष्पन्न होते आज जगातला कुठलाहि देश खऱ्या अर्थानें स्वतंत्र नाही प्रत्येक देशाचे भवितव्य चार दोन पुढाऱ्यांच्या हातात आहे अमेरिका व रशियाच्या पुढाऱ्यांची मति ठिकाणावर राहिली तर आपण सगळे जगू. त्यांची बुद्धि फिरली की आपलेंहि जीवित

धोक्यात आहे ही परिस्थिति बदलून जनतेचे राज्य स्थापायचे आहे"

"काळ पुढे धावतो आहे राष्ट्रवादाचे युग सपले आहे वेदामध्यें 'विश्व-मानुप' चा उल्लेख येतो त्याप्रमाणें आपल्याला विश्वमानव बनायचे आहे चिंतन जगाचे करायचे व सेवा आसपासच्या क्षेत्राची करायची व्यापक चिंतन व विशिष्ट सेवा, हा आपला मत्र आहे हे ज्ञानविज्ञानमय युग आहे आत्मज्ञान तर आपल्याला अहकार सोडून समष्टीत विलीन होण्याचा व्यापक होण्याचा सदेश पूर्वीपासून देत आले आहे आता विज्ञान व आत्मज्ञान एकच सदेश देत आहेत—मानवानो तुम्ही प्रेमानें एकत्र रहायला शिकाल तर टिकाल नाही तर भस्मसात व्हाल अशी धोक्याची सूचना विज्ञान सतत देत आहे व्यक्तिगत मालकी अहकार व स्वार्थ यावर आत्मज्ञान आणि विज्ञान या दोहोचा हि प्रहार होत असल्यामुळें आता व्यक्तिगत मालकी टिकू शकणार नाही ग्रामदान केल्यानें आपली भौतिक आणि नैतिक उन्नति एकसाथच होईल"

वाटेत पाडेचरी, श्री अरविंदाचे तपस्या-स्थान आले विनोबानी अरविंदाश्रमात मुक्काम केला व श्री माताजींचा आशीर्वाद घेतला श्री अरविंदानी मानसिक भूमिकेच्या वर, अतिमानस भूमिकेवर जाण्याचा सदेश दिला आहे विनोबा त्याचा वारवार उल्लेख करून म्हणत की "या विज्ञान-युगात आपण मनाच्या भूमिकेवर राहून काम करू तर मार खाऊ नी हार खाऊ म्हणून आपल्याला अतिमानस भूमिकेवर चढण्याचा प्रयत्न करायला हवा" यावर लोक म्हणतात की हे कसे शक्य आहे? तर मी याना विचारतो की अरे या युगात रशियाची कुत्री देखील चद्रावर जाते अन् तुम्ही माणसा-सारखी माणसे असून कच खाता?

तजावर हे तमिळनाडच्या सस्कृतीचे केन्द्र-स्थान मानले जातें मराठ्यानी तेथें आपले राज्य स्थापले होतें शिवाजीच्या वशपरपरेंतल्या राजानी तजावर-मध्यें विनोबाचे स्वागत केले मराठी राजघराण्यातल्या लोकानी तमिळ भाषेचा व सस्कृतीचा अगीकार करून ते तेथील जनतेशी एकरूप झाले साहित्य, कला, सगीत व विद्या इत्यादीना उत्तेजन देणाऱ्या मराठी राजाचे तेथील जनता फार आदरानें स्मरण करते

भारतातल्या एका जुन्या परपरेचे स्मरण करीत विनोबा लोकाना म्हणत "आपल्या परपरेनुसार काशीच्या गगाजलाचा अभिषेक रामेश्वराच्या

मस्तकावर केला जातो व तेथून समुद्रजल घेऊन पुन्हा काशीला जाऊन विश्वेश्वराच्या मस्तकावर समुद्रजलाचा अभिषेक करायचा असतो, तेव्हा यात्रा पूर्ण होते मी काशीहून भूदान-ग्रामदानाचे गंगाजल घेऊन इथें आलो आहे आता ग्रामस्वराज्याच्या समुद्रजलानें माझा कुंभ भरा म्हणजे मग तें घेऊन मी पुन्हा उत्तरेस जाईन" येशू ख्रिस्तानें म्हटले आहे ना की 'ठोठवा म्हणजे दार उघडेल, मागा म्हणजे मिळेल' त्याप्रमाणें विनोबा मागत गेले नी त्यांना मिळत गेलें तमिळनाडमध्ये साडेतीनशें ग्रामदानें झाली आणि ग्रामस्वराज्याचे मंदिर उभारण्यास आरंभ झाला

कार्तिकस्वामीच्या पळनी या तीर्थस्थानी सर्व-सेवा-संघाची एक बैठक झाली दक्षिणेंतला कार्तिकस्वामी विवाहित नी गणपति ब्रह्मचारी असतो- पळनीला विनोबांच्या सल्ल्यानुसार सर्व-सेवा-संघानें निधि-मुक्ति आणि तंत्र-मुक्तीचा क्रांतिकारी निर्णय घेतला त्यानुसार सर्व प्रांतातील भूदान-समित्या विसर्जित करून व गांधी-निधितर्फे भूदान कार्याला मिळणारा पैसाहि घेणे बंद करून चळवळ सर्वस्वी जनतेवर सोपवायचे ठरवले व सत्तावनमध्ये क्रांति करण्याकरता सर्वस्व समर्पित करण्याचे ठरले सिंहगडाच्या लढाईंत शेलारमामाने दोरच कापून टाकला होता, तसेंच या चळवळीत सारे दोर कापले गेले

कन्याकुमारी, हें तीन सागराच्या मीलनाचे स्थान, भारताचे दक्षिण टोक. तेथील मंदिरात पार्वती, कुमारीच्या रूपानें तपस्या करते आहे व तिकडे उत्तरेस कैलास पर्वतावर शंकर ध्यान करीत बसले आहेत अशी भव्य कल्पना करून भारतीय एकात्मतेचे सुंदर चित्र आपल्या पूर्वजांनी उभे केले आहे कन्याकुमारीच्या सागरात ज्या शिलेवर बसून विवेकानंदानी ध्यान केले तेथें बसून विनोबांनी प्रतिज्ञा केली की "भारतात ग्राम-स्वराज्याची स्थापना होईपर्यंत माझा संचार चालू राहील प्रभूचा संकल्प पूर्ण होईल, नाहींतर हे पाय गळून पडतील"

* * *

# शांतिसेना—सर्वोदयपात्र : ६ :

सात स्वराच्या रागतीतून सुरेल संगीत आकारास येते एकच एक स्वर संगीताप्रमाणें जीवनातहि गोडी निर्माण करीत नाही स्वर भिन्न हवेत पण त्यात सुसंवाद हवा, विसंवाद नको भिन्न भिन्न स्वराच्या या भारतात सुसंवाद कायम रहावा, विसंवाद येऊ नये, हे भूदान यात्रेचे एक आनुषंगिक कार्य विनोबा त्याला 'भूदान-यात्रेचा बाय प्रॉडक्ट' म्हणत सगळयाचे स्वागत करणें, सगळयाना आत्मसात करून त्याच्यावर आपला रंग चढवून त्याचे भरणपोषण करणें हे भरतभूमीचे सनातन समन्वय-कार्य आजहि अविरत चाललेच आहे आज केरळात त्याची कसोटी व्हायची आहे

तीन सागराच्या मीलनस्थानी ध्यान करून विनोबानी पुन्हा उत्तरेची दिशा घेतली आणि केरळाच्या रमणीय भूमीची यात्रा सुरू केली आकारानें छोटासा पण आशयानें महान् अशा ह्या केरळात सौंदर्य आणि समस्या एक-मेकाशी स्पर्धा करीत होत्या पूर्वेकडे पर्वत व पश्चिमेकडे समुद्र याच्या कात्रीत अडकलेली ही जमीनीची चिंचोळी पट्टी एका एकरात अधिकात अधिक जितकी माणसं सामावतां येणें शक्य असेल नसेल, त्या सर्वांना सामावण्याचा प्रयत्न करीत आहे केरळाइतका दाट लोकसंख्येचा प्रदेश विरळाच आढळेल शिक्षणाचें प्रमाणहि केरळात सर्वांत अधिक सुशिक्षित बेकार म्हणजे जागृत ज्वालामुखी कोणत्या हि क्षणी स्फोट व्हायचा

सारा केरळ म्हणजे एक उद्यानगृहाची मालिकाच आहे त्रिवेन्द्रम् ते कालिकतच्या तीनशें मैलाच्या रस्त्याच्या दोन्ही बाजूला नारळी, पोफळी

आंबे, फणस, काजू इत्यादींच्या बागांमधली छोटी छोटी घरे दिसतात. केरळात वेगळी गावे नाहीत, घरांची अखंड मालिका आहे फक्त नावाच्या पाट्या बदलल्या म्हणजे दुसरे गाव आले असे समजायचे समुद्राच्या खाड्या व जलाशयांच्या शांत निळ्या पाण्यात पडलेली हिरव्यागार झाडांची प्रतिबिंबे बाहेरच्या पाहुण्याला मोहित करतात सृष्टिप्रमाणेच केरळाच्या माणसाची मनेहि मृदुमधुर व शांत पोशाख साधा, पावरा विनोबांच्या रोजच्या वाटेवर रस्त्याच्या दुतर्फा शेकडो दर्शनार्थींची गर्दी दिसायची पण गलका गोंधळ नसायचा

सीमेवर विनोबांचे स्वागत करण्याकरता केरळाचे कम्युनिस्ट मुख्यमंत्री श्री नंबुद्रीपाद आले होते विनोबांनी त्यांना सबंध केरळा स्टेटचे दान मागितले केरळात नुकत्याच झालेल्या निवडणुकीत कम्युनिस्ट पक्षाला विधानसभेत बहुमत मिळाल्यामुळे कम्युनिस्ट पक्षाचे सरकार स्थापित झाले होते वैधानिक मार्गाने कम्युनिस्ट पक्षाने राज्यकारभार हाती घेतल्याचे जगाच्या इतिहासातले हे पहिलेच उदाहरण असल्यामुळे त्यावेळी केरळाकडे सर्वांचे डोळे लागले होते केरळातील कम्युनिस्ट पक्षाने आपल्या निवडणुकीच्या जाहीरनाम्यात पंधरा एकर ओलीताच्या जमीनीचे सीलींग करण्याची घोषणा केली होती जमीनीची मालकी नाहीशी करण्याच्या बाबतीत त्यात उल्लेखहि नव्हता आणि इकडे विनोबा तर करुणेच्या मार्गाने जमीनीची मालकी प्रत्यक्षात नाहीशी करीत होते केरळात ग्रामदाने होऊ लागली आणि अहिंसेच्या क्रांतिकारक तत्त्वाची साक्ष कम्युनिस्टांनाहि पटली कालडीच्या सर्वोदय-संमेलनात कम्युनिस्ट सरकारतर्फे आलेल्या कायदेमंत्र्यांनी जाहीर केले की 'भारतात क्रांति करायची असल्यास विनोबांचा ग्रामदानाचा हृदय-परिवर्तनाचा मार्गच सर्वोत्कृष्ट आहे' विनोबांनी त्याच संमेलनात सांगितले की "साम्यवादाची गंगा आणि समाजवादाची यमुना आता सर्वोदयाच्या सागरात विलीन होऊन जाणार आहे समुद्र सर्वांना आत्मसात् करतो व सर्वांना आपल्यासारखे खारे बनवतो"

केरळात प्रवेश करताच विनोबांनी म्हटले की 'मी शंकराचार्यांच्या व प्रभु येशूच्या राज्यात प्रवेश करीत आहे प्रभु येशूने म्हटले आहे की शेजाऱ्यावर आपल्यासारखेच प्रेम करा भूदानाचे कार्य याच उपदेशाचे

प्रत्यक्ष रूप आहे शंकराचार्यांनी एक पाऊल पुढें जाऊन अद्वैताचे तत्त्वज्ञान जगाला दिले शेजाऱ्यावर स्वत सारखेंच प्रेम का करायचे याचे कारण त्यांनी सांगितले—एकच आत्मा सर्वत्र व्याप्त असल्यामुळें मी–तू चा भेद मिथ्या आहे 'मा गृध कस्य स्विद् धनम्' या उपनिषत् वचनावर भाष्य लिहिताना शंकराचार्य म्हणतात 'धन कोणाचे आहे ?अर्थात् धनाची मालकी कोणाचीच नाही '

केरळात शेंकडा तीस टक्याहून अधिक लोक ख्रिश्चन आहेत तेथें लहानशा खेड्यातहि चर्च आढळते पहिला ख्रिश्चन मिशनरी सेंट टॉमस ईसवी सनाच्या पहिल्या शतकातच केरळात आला ख्रिस्ती धर्म आधीं भारतात पसरला व मागून युरोपात गेला तेव्हा तो आमचाच एक धर्म आहे, असं विनोबा नेहमी सागत केरळातल्या चार प्रमुख चर्चेसच्या प्रमुखानी विनोबाच्या आगमनापूर्वीच एक पत्रक काढून भूदानकार्यास सर्व ख्रिश्चनानी मदत करावी अशी विनति केली होती काही प्रमुख ख्रिश्चन पादरी एकदा विनोबाना म्हणाले "तुमच भूदानाच काम आम्हाला आवडत पण ग्रामदानाचा विचार मात्र पटत नाही खाजगी मालकीच अजीबात नाहीशी करणें हे योग्य वाटत नाही खाजगी मालकी ही पवित्र गोष्ट आहे, अस आमच्या धर्मग्रंथात सांगितले आहे " विनोबानी उत्तर दिले की 'तुमच्या म्हणण्यात तथ्य आहे माणूस आपल्या कष्टानें जें मिळवतो त्यावर त्याचा हक्क आहे ती वस्तु त्याच्या हातून जबरदस्तीनें हिसकावून घेणें योग्य होणार नाही खाजगी मालकी पवित्र आहे, पण मालकी हक्काचे स्वेच्छेनें समर्पण करणें ही पवित्रतर गोष्ट आहे ' पादऱ्यानी आनदानें माना डोलावल्या व ग्रामदानास समति दिली याचा उल्लेख करीत विनोबानी एका भाषणात सांगितले की 'व्यक्ति आणि समाजाच्या हितात विरोध आहे, ही कल्पनाच चूक आहे माणसाच्या शरीराच्या वेगवेगळ्या अवयवात विरोध नी झगडा आहे का कुठें ? पायाला काटा बोचला की डोळ्यात पाणी तरळतें नी हात काटा काढायला खाली वाकतो सगळें शरीर निरोगी असले अन् फक्त पायाच्या अंगठ्याला जखम झाली असली तरी त्या अंगठ्याचे दु ख सर्व अवयवाना जाणवतें समाजात असच व्हावयास पाहिजे सगळ्या व्यक्ति मिळूनच समाज बनतो तसेंच व्यक्ति समाजाहून वेगळा राहील तर विकास करू शकणार नाही म्हणून व्यक्तीच्या



सोखोदेवरा (बिहार) जयप्रकाशजींच्या आश्रमातील जाहीर सभा

विकासात समाजाचे हित आहे व समाजाच्या विकासात व्यक्तीचे हित आहे खाजगी मालकीहक्क (प्रायव्हेट प्रॉपर्टी) वळजबरीनें हिसकावून घेण्याचा विचार चूक आहे पण त्याचे समर्पण करा असे सागणें योग्य आहे तसेच समाजात दारिद्रय असताना कोणी व्यक्ति अधिक धनसग्रह करेल तर त्या पापातून व्यक्तीला मुक्त करण्याचा समाजाला अधिकार आहे यालाच अपरिग्रह व अस्तेय म्हणतात सग्रह वाढला म्हणजे चोरी व कायद्याने सपत्तीचे अपहरण करण्याची प्रवृत्ति वळावते "

कालडी हा शकराचार्यांचा जन्मग्राम सेंट टॉमसची समाधिहि कालडी-जवळच आहे कालडीला १९५७ चे अ भा सर्वोदय समेलन झाले सत्तावन साल हे भूदान आरोहणाच्या इतिहासातले महत्त्वाचे वर्ष देशभर कित्येक तरुण-तरुणींनी नोकऱ्या व कॉलेज सोडून सत्तावनचे एक वर्ष भूमिक्रांतीच्या कार्याला अर्पण केले होतें त्यामुळें देशभर सर्वत्र पदयात्राच्या द्वारें क्रांतीचा सदेश गावोगावीं पोहोचविला जात होता सत्तावनमध्यें शांति होणार, नवा समाज येणार अशा आकाक्षेनें भारलेले शेकडो तरुण-वृद्ध कालडीच्या समेलनात जमले होते प्रसिद्ध सिंधी कवि दुखायल याचें 'गावकी धरति गावका राज, सत्तावनमें हो स्वराज्य' हें गीत सर्वत्र दुमदुमत होतें देशातील सर्व राजकीय पक्षानी भूदान-ग्रामदानाच्या कार्यास पाठिंबा दिला होता विनोबा समेलनात म्हणाले 'सहानुभूतीचा प्याला भरला आहे '

केरळाच्या यात्रेतील सर्वांत महत्त्वाची घटना म्हणजे शांति-सेनेची पुन स्थापना 'शांतिसेनेची कल्पना मूळची गाधीजींची अहिंसेचे, करुणेचे राज्य स्थापायची त्याची मनीषा होती आणि म्हणून अहिंसेत रक्षण करण्याचे सामर्थ्य आहे हें सिद्ध करायचे होतें विनोबा म्हणाले की 'शांति-सेनेची स्थापना पूर्वीच झाली होती गाधीजी हे शांतिसेनेचे पहिले सैनिक होते आणि ते स्वतःच प्रथम सेनापतिहि होते सेनापति या नात्यानें त्यानी 'करेंगे या मरेंगे' हा आदेश दिला आणि सैनिक या नात्यानें त्या आदेशाचे पालन करून ते निघून गेले ' ते एकच होते पण एकाच्या आकड्यासारखे होते एकावर शून्यें चढली म्हणजे मग मोठा आकडा बनतो विनोबांचा शांति-सेनेच्या पुन स्थापनेचा उपक्रम म्हणजे एकावर शून्यें चढविण्याचा कार्यक्रम

केरळाचे वयोवृद्ध नेते श्री केलप्पन आणि इतर सहा बसलेल्या कार्यकर्त्यांना केरळ-यात्रेच्या शेवटच्या मुक्कामावर २३ ऑगस्टला जाहीर सभेत शांतिसैनिकाची दीक्षा देऊन विनोबांनी शांतिसेनेच्या स्थापनेची विधिवत् घोषणा केली.

शांतिसैनिकाचे प्रतिज्ञापत्र खालीलप्रमाणे आहे.—

"मी, शांतिसैनिकाच्या निम्नलिखित सहाकलमी प्रतिज्ञापत्रावर सही करीत आहे.—

(१) मी आपल्या जीवनात सत्य, अहिंसा, अपरिग्रह आणि शरीरश्रम यांचे यथाशक्ति पालन करेन.

(२) निष्काम सेवा म्हणजे फळाची कामना न ठेवता सेवा करेन.

(३) सत्तेच्या व पक्षीय राजकारणात भाग घेणार नाही; परंतु सर्व पक्षांच्या माणसांचे सहकार्य आपल्या कामात मिळवीन

(४) जातिभेद, धर्मभेद, वर्गभेद मानणार नाही.

(५) भूदानयज्ञमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक क्रांतीच्या कार्यात अधिकात अधिक वेळ व चिंतन सर्वस्व अर्पण करेन.

(६) शांतिसेनेच्या कामाकरता आपले प्राणहि अर्पण करण्यास तयार राहीन."

ते पावसाळ्याचे दिवस होते आणि केरळात पाऊसहि खूप पडतो. पण शांतिसेनेवर भाष्य करताना विनोबांना पावसाने अधिक प्रेरणा मिळे. रोजच्या भाषणात ते नवनवे विचार सांगत— "भूमि-समस्येसारखा कठिण प्रश्न अहिंसेनें सोडविला जाऊ शकतो हे ग्रामदानाने सिद्ध झाले आहे देशांत अंतर्गत शांति स्थापण्याची व देशाचे रक्षण करण्याची रक्षणकारिणी शक्ति अहिंसेत आहे, हे आता सिद्ध करायचें आहे. . . . माणूस प्रेमाच्या वातावरणात जन्म घेतो, त्यातच लहानाचा मोठा होतो आणि त्यातच लीन होतो. आणि तरीहि प्रेम अजून प्रकटत नाही याचे कारण असे की आम्ही फक्त अनुरोधी प्रेम करतो, प्रतिरोधी प्रेम करीत नाही. जो आपल्यावर प्रेम करील त्याच्या-वर प्रेम करणे म्हणजे अनुरोधी प्रेम. हे तर जनावरांतहि आढळतें. चारा घेऊन गेलात की गाय सुद्धा तुमच्यावर प्रेम करते व लाठी घेऊन गेलात कीं लाथ मारू पाहते. आपणहि एवढेंच केले तर जनावरांहून अधिक तें काय केले? माणसाने प्रतिरोधी प्रेम करायला पाहिजे. येशु ख्रिस्तानें शेजाऱ्यावर

प्रेम करा, एकमेकावर प्रेम करा व शत्रूवरहि प्रेम करा असे सांगितले आहे. यांतून प्रेमाची शक्ति प्रकटेल आपल्याला प्रेमाचे आक्रमण केले पाहिजे. शांतिसैनिकाचे प्रमुख शस्त्र नी अस्त्र प्रेम हेच राहील . . . शस्त्र शत्रूला मारू शकतें पण प्रेम शत्रूला मित्र बनवते. . . . . शांतिसैनिकाचे काम दुहेरी स्वरूपाचे आहे समाजातील अशांतीची कारणें नाहीशी करण्याकरता अहिंसेद्वारा समाजक्रांति करण्याचे भूदान-ग्रामदानाचे काम हे त्याचे नित्यकार्य राहील व पुढें दंगा वगैरे झाल्यास तो शमविण्याचा प्रयत्न करणे हे त्याचे नैमित्तिक कार्य राहील . . . . जनतेची नित्य सेवा करून शांतिसैनिक सर्वांचा स्नेह व विश्वास संपादन करेल. जाति, धर्म, पंथ, पक्ष वगैरे भेद न राखता तो सर्वांची माणूस या नात्यानें सेवा करेल दर पाच हजार लोकसंख्येकरता एक या हिशोबानें सार्‍या देशभर पंचाहत्तर हजार शांतिसैनिक मिळावेत अशी माझी आकांक्षा आहे "

विनोबांनी स्वत:ला 'शांतिसेनेचे सुप्रीम कमांडर' म्हटले. कमांडरचा आदेश होताच शांति-सैनिकानें अशांतीची आग विझवण्याकरता प्राणाचेहि बलिदान करण्यास तयार रहायचे व कुणी आपल्यावर प्रहार करील तर मारणाऱ्याविषयी मनात प्रेमच बाळगायचे ख्रिस्ताला ज्यांनी सुळावर चढविले त्यांच्या करता ख्रिस्तानें देवाजवळ प्रार्थना करीत म्हटले कीं "प्रभु यांना क्षमा कर हे अज्ञानी जीव आहेत त्यामुळे आपण काय करीत आहोंत हे त्यांना कळत नाही." हा शांतिसैनिकाचा आदर्श आहे शांतिसैनिकाची वृत्ति कशी असावी हे सांगताना विनोबांनी एक उर्दू शेर म्हटला,

अपनी गर्दन का मुझे कुछ गम नही
खम न आ जाये कहीं तेरे शमशेर में'।

'माझ्या मानेवर तुझी तलवार आहे मला माझ्या मानेची काळजी नाही पण तुझी तलवार पुढें वाकडी तर नाही ना होणार, याची काळजी आहे '

केरळांतून कुर्ग संस्थानाच्या वाटेनें विनोबा कर्नाटकात गेले. कर्नाटक हा हनुमानाचा प्रदेश. तेथें विनोबांनी झोपलेल्या हनुमानाला जागें करण्यास आरंभ केला. टिपू सुलतान कर्नाटकचाच. त्याचा उल्लेख करून विनोबा जनतेला विचारीत 'टिपूच्या सैन्यात तुम्ही हजारोंच्या संख्येनें दाखल झालात. मग आता माझ्या या शांतिसेनेंतहि तशाच संख्येनें या. . . . . आज जग

सक्रमणावस्थेत आहे हिंसेवरची श्रद्धा उडाली आहे पण अहिंसेवर अजून बसली नाही अणुबांबच्या भीतिमुळें हिंसेचा मार्ग सोडला पाहिजे हे कळले आहे, पण अहिंसेच्या मार्गाने प्रश्न कसे सोडवायचे हे मात्र कळले नाही कुठेहि दगा किंवा आक्रमण झाल्यास सशस्त्र सेना एकदम तेथे जाऊन शिस्तबद्ध रीतीनें काम करून प्रतिकार करते म्हणून आज सशस्त्र सेनेची प्रतिष्ठा कायम आहे अशा रीतीने प्रसग येताच तावडतोब जाऊन शिस्तबद्ध पद्धतीन काम करण्याची शक्ति शातिसेनेने दाखवली पाहिजे तरच जगाची अहिंसेवर श्रद्धा बसेल सैन्यात भीतिमुळे आज्ञा मानली जाते अहिंसेत प्रेमामुळें, श्रद्धेमुळें आज्ञापालन केले जाईल "

१९५७ च्या २१-२२ सप्टेंबरला म्हैसूर शहराजवळील येलवाल या गावी, ग्रामदान परिषद आली व सवसेवासघाच्या निमन्त्रणानुसार देशातील सर्व प्रमुख पक्षाच्या नेत्यानी त्या परिषदेत भाग घेतला काँग्रेसचे नेते प नेहरू, पतजी, ढेबरभाई, मोरारजी देसाई, प्रजासमाजवादी पक्षाचे अध्यक्ष श्री गगाशरणसिंह, कम्युनिस्ट पक्षाचे नेते श्री नबूद्रीपाद व झेड अहमद, सर्वसेवा-सघाचे नेते श्री जयप्रकाश नारायण आणि भारताचे राष्ट्रपति राजेन्द्रप्रसाद इत्यादि सर्व प्रमुख पुढाऱ्यानी एकत्र जमून दोन दिवस ग्रामदानावर चर्चा केली आणि एकमतानें एक ठराव पास केला त्या ठरावात म्हटले आहे की "ग्रामदान चळवळीचे आम्ही स्वागत करतो ज्या मूलभूत तत्त्वानुसार ही चळवळ चालवीली जात आहे, त्या तत्त्वाद्वारे खेड्यातील जनतेची सर्वांगिण प्रगति होईल या चळवळीमुळें खेड्याचा आर्थिक विकासहि होईल, सहकार्याची भावना वाढेल, जनतेची *सर्वांगिण प्रगति* होईल आणि भूमिसमस्या सोडविण्याच्या दृष्टीनें अनुकूल वातावरण निर्माण होईल अहिंसक पद्धति व ऐच्छिक स्वरूप हे या कार्याचे वैशिष्टय आहे भौतिक व नैतिक विकास एकसाथ साधणाऱ्या अशा कार्याला सर्वांनी सहकार्य करावे • • सरकारच्या पचवार्षिक योजनेला या कार्यानें मदत मिळते सरकारची विकास खड-योजना आणि ग्रामदान-चळवळ याच्यात घनिष्ठ सहकार्य स्थापित होणें इष्ट आहे ' या ठरावावर सव नेत्यानी सह्या केल्या

येल्वाल परिषदेच्या वक्तव्यावर विनोबानी विस्तृत भाष्य केले "सर्व पक्षाच्या प्रमुख राष्ट्रनेत्यानी या कार्याला आशीर्वाद दिला आणि ग्रामदानाचा

विचार मान्य केला याचा अर्थ असा की देशाने या कार्यावर पसतीचें शिक्कामोर्तब केले क्रांति प्रथम हवेत होते आणि मग जमीनीवर उतरते हवेंत क्रांति झाली आहे हे ओळखन आपण दुप्पट उत्साहाने काम करू या ! !

ग्रामदानामुळें धर्म अर्थ काम मोक्ष या चारी पुरुषार्थांचा विकास होतो हे समजावून सागून विनोबानी म्हटले की "ग्रामदान हे डिफेन्स मेझर आहे देशात गरीब-श्रीमत, भूमिहीन-भूमिवान असे भेद राहतील आपापसातील भाडणें, सघर्ष राहील तर देशाचे स्वातत्र्य धोक्यात येईल ग्रामदानामुळे खेड्याखेड्यातील भेद नाहीसे होऊन प्रेमाचें व सहकार्याचे वातावरण पसरेल आणि देशाचे स्वातत्र्य अबाधित राहील "

विनोबाची यात्रा जमीनीवर पण चितन आकाशाच्या सानिध्यात चाले आकाश त्याना नवेनवे विचार देई ' कार्ल मार्क्स म्हणतो की समाजात दोन वर्ग आहेत हॅवज् आणि हॅव-नॉटस्, ' आहेवाले आणि नाहीवाले, शोषक आणि शोषित, श्रीमत आणि गरीब ' पूर्वी मीहि म्हणत असे की ज्याच्याजवळ जमीन आहे त्यानी भूमिहीनाना जमीन द्यावी पण आता माझ्या लक्षात आले की यात विचार-दोष आहे दोन वर्ग आहेत ही कल्पनाच चूक आहे जगात हॅव नॉट ( नाहीवाले ) कुणी नाहीच सर्वच लोक हॅवज् (आहेवाले) आहेत ज्याच्याजवळ अगदी काहीच नाही असा माणूस देवानें निर्माणच केला नाही कुणाजवळ जमीन आहे सपत्ति आहे तर कुणाजवळ श्रम करण्याची शक्ति आहे किंवा विद्या आहे ज्याच्याजवळ यापैकी काहीच नाही त्याच्याजवळ प्रेम तर आहेच आजवर प्रत्येक माणूस आपल्याजवळ जें काही आहे, त्याचा उपयोग आपल्या कुटुबाकरताच करीत असे ज्याच्याजवळ जें काही आहे तें त्यानं समाजाला अर्पण कराव, हा ग्रामदानाचा मूलभूत विचार आहे "

भूदानयात्रा सुरू होण्यापूर्वी विनोबा आपल्या पवनार आश्रमात साधना करीत असतानाची गोष्ट आझाद हिंद फौजेंतील एका व्यक्तीने विनोबाना अभिवादन केल 'जय हिंद' विनोबानी चटकन् म्हटले— "जय हिंद, जय दुनिया, जय हरि।' -कर्नाटकाच्या यात्रेत १९५७ मध्यें विनोबाना नवा मत्र स्फुरला 'जय जगत ' वैशाखाच्या उन्हात लहानशी ठिणगी पडली तरी वडवाग्नि पेट घेता त्याप्रमाणें क्षणानच तो मत्र चहूकडे पसरला जियें-जयें विनोबा जात, जनता जयघोष करी 'जय जगत ' विनोबा त्यावर

भाष्य करीत "पधरा वर्षापूर्वी 'जय हिंद' हा मत्र निर्माण झाला त्यानतर विज्ञानाची एवढ्या झपाट्याने प्रगति झाली की माणूस चद्रावर स्वारी करण्याचे बेत रचू लागला तेव्हा आता आपल्याला अधिक व्यापक बनायचे आहे आणि म्हणून 'जय जगत्' म्हणायचे आहे 'जय हिंद' ह 'जय जगत्' च्या पोटात येऊनच जाते " इग्लडमधून आलेल्या परदेशी पाहुण्याना नवा मत्र फार आवडला ते म्हणाले 'आज जगाला याचीच गरज आहे '

कर्नाटक यात्रा आणखी एका मत्राची जननी ठरली शातिसेनेसबधी बोलताना विनोबानी केरळात म्हटले होते की 'सैन्याला जनतेची समति हवी असते हिंसक सैन्यामागे लोकशाहीत जनतेच्या मतदानाचे बळ असते त्याप्रमाणे शातिसेनेलाहि जनतेची समति मिळायला हवी समति-सूचक म्हणून प्रत्येक कुटुबाने एक नारळ किंवा सुताची एक गुडी या कामाकरता अर्पण करावी" यातूनच पुढे 'सर्वोदय-पात्र' च्या कल्पनेचा जन्म झाला 'मूठभर धान्य आणि जगभर शाति' हा मत्र देत विनोबा सागत "शातिसेनेच्या सर्वोदयाच्या कार्याला भारतातील घराघरातून समति मिळाली तरच ते काम फोफावेल समतिदान म्हणून प्रत्येक घरात सर्वोदय-पात्र ठेवावे ह्यात जेवणा-आधी लहान मुलाच्या हाताने मूठभर धान्य टाकले जावे माझ्या पोटात अन्न टाकण्याआधी समाजाला काही तरी अर्पण करायचे, त्याग करून मगच भोग करायचा, ही शिकवण या कार्यक्रमाद्वारे लहान मुलाना मिळेल आणि त्याना उत्तम सस्कार मिळतील जगाच्या शाततेकरता, सर्वोदयाकरता म्हणजे जगाच्या कल्याणाकरता प्रत्येक आई आपल्या सर्वांत लहान मुलाच्या हातून सर्वोदय-पात्रात रोज धान्य टाकील तर मातेचा मगल आशीर्वाद आम्हाला मिळेल या मूठभर धान्यातून जगाला तारणारी शातीची शक्ति निर्माण होईल"

वेदात म्हटले आहे 'यत्र विश्वम् भवति एकनीडम्' साऱ्या विश्वाचे घरटे, विश्वातल्या कुठल्याहि श्रात क्लान्त मानवाचे आश्रयस्थान व्हावे या हेतूने विनोबानी बगलोरला 'विश्वनीडम्' आश्रमाची स्थापना करण्याचे ठरवले दक्षिणेच्या चार प्राताना जोडणे, उत्तर व दक्षिण भारताला जोडण आणि भारत व विश्वाला जोडणे, हा आश्रमाचा उद्देश आहे हृदये जोडीत जगताला जोडण्याचा हा एक नम्र प्रयास आहे

# 'आलों मी दारा' : ७ :

'आमुचा स्वदेश, भुवनत्रयामधें वास' ही अनुभूति घेत विनोबाची महाभारत-यात्रा चालू होती जेथें जेथें ते जात तेथें तेथें प्रभु त्यांच्या सांगाती राही आणि जनहृदयाला वाटे की आपला जन्मोजन्मीचा सखा आपल्याला भेटत आहे जनता अनंत हस्तांनी दान देत होती आणि घेत होती 'मी तुम्हाला ज्ञानासारखी अनमोल वस्तु देतो नी तुमच्या कडून मातीसारखी सामान्य वस्तु घेतो केवढा स्वस्त सौदा आहे हा!' हे विनोबाचे मन जनतेला पटे जनमनाचा ठाव घेऊन विनोबानी ओळखले की हजारो राजे महाराजे आले व गेले पण भारतीय हृदयावर राजा रामाचीच अबाधित सत्ता चालू आहे दिल्लीजवळच्या एका खेड्यातील घटना विनोबानीं आपल्या भाषणात अकबर बादशाहाचा उल्लेख केला सभेला आलेल्यांत बहुसंख्य मुसलमान होते. विनोबानी सहज विचारले माहीत आहे ना अकबर बादशाहा?' लोक म्हणाले, नाहीं माहीत 'काय तुम्ही अकबर हें नावच ऐकले नाहीं!' विनोबांना आश्चर्याचा धक्का बसला 'अकबर हे नाव माहीत आहे आम्हाला. अल्लाह हो अकबर (परमेश्वर सर्वश्रेष्ठ आहे)' विनोबाचे डोळे पाणावले. अकबरसारख्या पराक्रमी बादशाहाला जियें कुणी पुसत नाहीं तियें इतर चिल्लर राजाची काय कथा? पण लोकांना कबीर माहीत होता, तुलसीदास माहीत होता

१९५८ च्या २३ मार्चला निपाणीहून महाराष्ट्रात प्रवेश केल्यावर विनोबा म्हणाले "कबीर व तुलसीदासाच्या राज्यात हिंडल्यानंतर मी बुद्ध

महावीराच्या राज्यात विहार केला तेथून पुढें चैतन्य व रामकृष्णाच्या राज्यात नी नंतर जगन्नाथाच्या राज्यात माझी यात्रा झाली पुढे दक्षिणेत पोतना व वल्लभाचार्याच्या नी रामानुज, माणिक्यवाचकर व नम्मालवाराच्या राज्यात भटकून शंकराचार्य व येशू ख्रिस्ताच्या राज्यात नी नंतर बसवेश्वर व पुरंदर-दास यांच्या राज्यात फेरफटका मारून आता मी ज्ञानोबा व तुकोबाच्या राज्यात प्रवेश करीत आहे "

कोल्हापुर जिल्ह्यातल्या आजरे महालात काही ग्रामदानें झाली होती विनोबाच्या यात्रेत ग्रामदानाची संख्या वाढू लागली कोल्हापुरातून रत्नागिरी 'भारताला अनेक रत्ने देणारा रत्नाचा गिरि' जिल्ह्यात विनोबा पादाक्रांत करू लागले जनतेचा अखंड प्रेमवर्षाव चालूच होता पण कोल्हापुरच्या सभेत दहा-पाच लोकांनी सभा उधळण्याचा प्रयत्न केला विनोबा म्हणतात मी पुढारी नाही. प्रेम नी विचार देणारा एक सेवक आहे स्वामीला सेवा नको असे समजून विनोबानी त्या दिवशी जनतेला प्रणाम केला व ते न बोलता परतले भार-तातल्या यात्रेतली ही अशी पहिलीच घटना त्यावेळी द्विभाषिकाविरुद्ध चळवळ चालू होती त्यामुळें सुशिक्षिताची मनें प्रक्षुब्ध होती

मे महिन्यात पंढरपुरला अ भा सर्वोदय-संमेलनाच्या निमित्तानें देशभरचे सर्वोदय सेवक जमले होते पांडुरंगाचा भक्त पांडुरंगाच्या दाराशी आला आणि त्यानें दार ठोठावले मागे विहारात वैद्यनाथधामला देवाच्या दर्शनाऐवजी 'प्रसाद' मिळाल्यानंतर विनोबानी पुरीला जगन्नाथाच्या दाराशी उभें राहून प्रवेश मागितला पण विनोबाच्या यात्रीदलात एक फ्रेंच ख्रिश्चन भगिनी असल्यामुळे त्याना प्रवेश नाकारला गेला सोबत्याना जिथें प्रवेश नाही तिथें मीहि जाणार नाही, हे विनोबाना धर्मराजाने सांगितले होतें स्वर्गात आपल्या सोबत्याला, कुत्र्याला प्रवेश मिळाला नाही म्हणून धर्म-राजान स्वर्गहि नाकारला होता पुरीला गुरु नानकानाहि प्रवेश मिळाला नव्हता तेव्हा त्यानी दाराबाहेर उभें राहून देवाची आरति केली "गगन हीच थाली आहे आणि रविचन्द्र ह दीपक आहेत" पुढ केरळातील गुरुवायूरच्या मंदिरातहि विनोबाना प्रवेश मिळाला नाही पण कर्नाटकातील गोकर्णनाथाच्या मंदिरात मात्र मुसलमान सोबत्यासह प्रवेश मिळाला होता 'जन नाहे अवघा हा जनार्दन' ही विनोबाची श्रद्धा त्यामुळें त्याना सर्वत्र देवाचेच दर्शन

चडायचे. तरीहि असंख्य साधुसंतांच्या तपस्येनें पावन झालेल्या तीर्थस्थानांविषयीहि त्यांना श्रद्धा वाटे –

पंढरपुरला, बडवे मंडळींनीं विनोबांना मंदिरात येण्याचे आमंत्रण दिलें. विनोबांनी लिखित आमंत्रण मागितलें, व तें मिळाल्यावर, ज्येष्ठी एकादशीच्या सुमुहूर्तांवर विनोबांनी आपल्या सर्व-धर्मावलंबी सोबत्यासह पांडुरंगाच्या मंदिरात प्रवेश केला विनोबांच्या सोबत, मुसलमान भगिनी फातमा, जर्मन ख्रिश्चन हेमा, पारशी गुलबेन मेहता तसेच ज्यू शीख बौद्ध जैन वगैरे सर्व धर्मांच्या सोबत्यांना देवाचे दर्शन मिळालें आणि आसवांची फुलें अर्पून विनोबांनी देवाची पूजा केली पंढरपुरचे मंदिर उघडलें आणि महाराष्ट्र-यात्रा सफल झाली असें विनोबा म्हणाले त्या घटनेचे हिंदू-धर्माच्या इतिहासात फार महत्त्व आहे. धर्माचा संकुचित अर्थ घेऊन दुराग्रह बाळगण्याचे दिवस संपले आहेत. देव भक्ताला दूर ठेवील तर भक्त देवालाच निरोप देईल अशी परिस्थिति आहे, याची जाणीव समाजाला झाली

महाराष्ट्राच्या यात्रेंत ओरिसाचे गांधी म्हणविले जाणाऱ्या श्री गोपबंधु चौधरी यांच्या मृत्यूची बातमी आली आणि विनोबांच्या भाषेंत "एक भक्त देवा घरी गेला" गोपबाबूंच्या कुटुंबातील यच्चयावत् माणसें भूदानयज्ञाच्या कामात रंगली आहेत असें कुटुंब भारतात विरळाच गोपबाबूंच्या आधी उत्तर प्रदेशाचे तपस्वी नेते बाबा राघवदास अखंड पदयात्रा करीत असतानाच निजधामी गेले आणि बिहारचे त्यागी निष्ठावान् नेते श्री लक्ष्मीबाबू यानीहि पदयात्रा करीत करीतच स्वर्ग गाठला विनोबा म्हणत साठ वर्षें झाली म्हणजे परलोकाला जायचा पासपोर्ट मिळाला या सर्व प्रभावशाली सहकाऱ्यांचा वियोग विनोबांना सतत जाणवे पण यानीच्या होमकुंडात उडी घेणाऱ्या नवनव्या तरुणांकडे पाहून त्यांना प्रभूच्या लीलेचे स्मरण होई

पंढरपुरनंतर विनोबा मराठवाड्याकडे वळले मराठवाड्याला मागासलेला म्हणतात पण ज्ञानदेव, एकनाथ, रामदास, यांच्या भूमीतल्या लोकांजवळ श्रद्धेचें भांडवल असल्यामुळें त्यांतून क्रांतिकारी शक्ति निर्माण होऊ शकते, असा विनोबांचा विश्वास मराठवाड्यात सर्वोदय-पात्राचा व्यापक प्रयोग व्हावा ही त्यांची इच्छा तेथील पुढाऱ्यांनी व जनतेनें पूर्ण करायचें ठरवलें घरोघरी विश्वशांतिकरता रोज मूठभर धान्य समाजाला अर्पण करण्याची नवीन

उपासना सुरू झाली तर त्यातून शांतीची शक्ति निर्माण होऊ शकेल 'सर्वोदय-पात्राच्या धान्याचा उपयोग शांतिसेनेसाठीं म्हणजे समाज-क्रांतिसाठी करायचा आहे. लोकांचे थोडेसे दुःख दूर करणें हा आमचा उद्देश नाही. तर दुःखाचे कारण असलेली आजची समाज-रचना बदलविणें हा उद्देश आहे. रोगाचे मूळ नाहीसे झाल्याशिवाय नुसती मलमपट्टी करण्यांत काय अर्थ ? . . . . आपली लोकशाही यशस्वी करण्याकरता समाजांत निष्पक्ष, निष्काम, निर्वैर अशा सेवकांची, शांति सैनिकांची गरज आहे ' त्याचवेळी भारताचे राष्ट्रपति राजेन्द्रप्रसाद यांनी आपल्या घरात सर्वोदय-पात्र ठेवल्याची वार्ता आली विनोबा म्हणाले 'लोकशाहीत इशाऱ्याने काम होनें हुकुमानें नव्हे राष्ट्रपतींनी हा इशारा केला तेव्हा देशात घरोघरी सर्वोदय-पात्र ठेवले पाहिजे

औरंगाबादला महाराष्ट्रातील साहित्यिकांची सभा झाली प्रत्येक प्रांतात तेथील साहित्यिक विनोबांना भेटत असत विनोबा स्वत ला 'साहित्यिक नव्हे, साहित्यिकांचा भक्त' म्हणवीत शब्द-शक्तीच्या महात्म्याचे त्यांना विशेष भान आहे 'आम्हा घरी धन शब्दांचीच रत्ने, शब्दांचीच शस्त्रें, जतन करू' असे हि त्यांना तुकारामाप्रमाणें वाटतें साहित्यिकांना ते एकदा म्हणाले की "तुम्हीं भूदानावर लिहावे असे मी म्हणत नाही. कुणाच्या सांगण्याने साहित्यिक लिहूच शकत नाही मी फक्त एवढेंच म्हणतो कीं मी जो आनंद लुटतो आहे, त्यात तुम्ही सहभोगी व्हा . . . . जगाला आकार देणाऱ्या तीन शक्ति आहेत, विज्ञान, आत्मज्ञान व साहित्य साहित्य हा विज्ञान व आत्मज्ञानाला जोडणारा सेतु आहे" विनोबाचे भाषण ऐकून विहारचे एक मोठे साहित्यिक म्हणाले "तुम्हाला भेटून फार बर वाटत तुम्ही मधून मधून आम्हाला बोलावीत जा" विनोबा हसून म्हणाले "फूल फुलल म्हणजे भ्रमरांना बोलवाव लागत नाही"।

धुळयाचा जेल ही 'गीता प्रवचना' ची जन्मभूमि विनोबांनी जेलला भेट दिली व कैद्यांसमोर जुन्या आठवणी सांगितल्या फासावर जाणारे गुन्हेगार मरण्यापूर्वी 'गीताई' मागत नी उपास करून पैसे वाचवून विनोबाना दक्षिणा पाठवत, ती गोष्ट सांगताना विनोबाचा गळा दाटून आला

धुळयानंतर पश्चिम खानदेशातील जंगलाच्या, अक्राणी महालात यात्रा झाली ऐन पावसाळ्याचे दिवस, रस्त्याचे नावहि नाही दाट जंगल

डोंगर व दऱ्या सर्वांनी मोडता घातला पण विनोबा पुढेंच गेले 'चलता मुसाफीर ही पायेगा, मंजिल और मुकाम' हें त्यांना माहीत होतें अक्राणी महालात तपस्येच्या समप्रमाणात ग्रामदानाचे प्रमाण वाढू लागले सबंध अक्राणी महाल व अक्कलकुवा याचे ग्रामदान घोषित झाले सारी गावें आदिवासींची होती विनोबा म्हणाले 'आदीवासी-सेवेचे नवे दालन उघडले गेले '

पढरपुरच्या संमेलनातच विनोबांनी काश्मीरला जाण्याची घोषणा केली त्यामुळें पढरपुरनतर त्यांनी काश्मीरचा सरळ मार्गच धरला वाटेंत येणाऱ्या प्रांतांतहि जास्त न हिंडता शक्य तितक्या लवकर काश्मीरला पोहो॰चायचें ठरले सात महिन्यांची महाराष्ट्रातील यात्रा संपवून सप्टेंबरात त्यांनी गुजरायेंत प्रवेश केला सीमेवर ते म्हणाले 'महाराष्ट्र ही माझी जन्म-भूमि पण गुजरात द्विजन्म भूमि आहे, इथें मी खऱ्या अर्थानें द्विज झालो मला ज्ञान मिळाले ' साऱ्या भारतात विनोबा हिंदीत बोलले पण महाराष्ट्रात मराठीत व गुजरायेंत गुजराथी भाषेंत बोलले गाधीजींशी बोलण्याकरता म्हणून ते गुजराथी शिकले होते

सूरत जिल्हा हा विधायक-कार्यांचे माहेरघरच ठिकठिकाणीं आश्रम व विधायक-कार्य करणाऱ्या निष्ठावान् सेवकांची सेना आढळे वडोदा विनोबाचे आवडतें शहर तेथें त्यांना बालपणीच्या सर्व रम्य स्मृति आठवल्या विनोबाचा जन्म कुलाब्यातील गागोदा गावीं झाला तरी पण वडिलांच्या नोकरीमुळें त्याचें सारें शिक्षण वडोद्यात झाले वडोद्यातील गल्ली-न-गल्ली त्यांना माहीत दूरवर भटकायला जायचा त्यांना पूर्वीपासूनच नाद एकदा ते रात्री बारालाच भटकायला निघाले राजवाड्यावरून जात असताना दरवानानें पाहिलें पण ते आपल्या धुंदीत पुढें जात होते. परतताना दरवानाने अडवलें 'कोण आहे ? चोर दिसतोस' विनोबा म्हणाले 'चोर ज्या रस्त्यानी जाईल त्याच रस्त्यानी परत फिरतो का कधी ? ' वडोद्याच्या सेंट्रल लायब्ररीतील पुस्तक-न-पुस्तक विनोबांच्या नजरेखालून गेलें होतें तेथील मुक्कामात जुन्या मित्रमडळीचे एक संमेलन झाले, तेव्हा विनोबांनी सांगितले 'मी मैत्रीचे नातें सर्वश्रेष्ठ नातें मानतो मी सर्वांचा मित्र आहें व सर्वांनी माझें मित्र बनावे ही माझी आकांक्षा आहे अर्जुन हा कृष्णाचा भक्त

असूनहि सखा होता. त्याची सख्यभक्ति मला फार आवडते आता दास्य-भक्तीचे युग गेले आहे. सख्यभक्तीचे आले आहे '

वडोद्याला विनोबांनी आपले पूर्वीचे घर पाहिले. ज्या घरात आईने त्यांना आपल्या जीवनाद्वारे भक्तीचे संस्कार दिले त्या घरात आईच्या आठवणीने त्यांचे हृदय भरून आले आईला गीता वाचण्याची हौस पण संस्कृत येत नव्हतें मराठीहि येतवातच येत होतें. 'विन्या मला मराठीत गीता हवी आहे' विन्याने दोन तीन भाषांतरें आणून दिली. पण आईला पसंत पडेनात "विन्या तूच का नाही करत रे भाषांतर' आईनें आदेश दिला त्यानंतर अनेक वर्षांनी विन्याने संस्कृत गीतेला मराठीत 'गीताई' च्या रूपाने आणलें तेव्हा आई देवाघरी गेलेली होती पण 'माझ्या आईसारख्या असंख्य आयांना उपयोगी पडेल' या भावनेने विनोबांनी जणू प्राण ओतून भाषांतर केले महाराष्ट्रात "गीताई' च्या पावणे सहा लाख प्रति विकल्या गेल्या आहेत

सौराष्ट्र व सिंधी व्यापाऱ्यांनी वसविलेले कच्छमधील नवीन बंदर गांधीधाम पाहून विनोबा अहमदाबादला आले विनोबांच्या भोवती रोजच विशाल जनसमुदाय गोळा होतो व मोठ्या शहरात तर त्याला सागराचेच रूप येतें, पण तरीही अहमदाबादची सभा वैशिष्ट्यपूर्ण वाटली. तीन लाखाहून अधिक लोक तास दीडतास चित्रासारखे तटस्थ बसून गांधी-विचार ऐकत होते साबरमतीच्या आश्रमात विनोबांना गांधीजींच्या सहवासातील काळ पुन्हा साकार झाल्यागत भासला गांधीजी कुणाजवळ तरी विनोबांविषयी म्हणाले होते "आश्रमात येणारे इतर लोक इथून काही घ्यायला येतात पण हा तरुण द्यायला आला आहे' ७ जून १९१६ ला विनोबा गांधीजीजवळ पोहोचले अन 'तेव्हापासून त्यांनी सांगावे नी मी करावें, हेच माझे जीवन' असे ते म्हणत १९४० साली *वैयक्तिक सत्याग्रहाच्या* वेळी गांधीजींनी विनोबांना विचारलें, 'तू प्रथम सत्याग्रही व्हावेंस अशी माझी इच्छा आहे. पण तुझ्या मागें कामे अनेक वेळ मिळेल का तुला ?' विनोबांनी चटकन उत्तर दिले 'बापू मला तुमचा हुकुम म्हणजे यमराजाच्या हुकुमासारखा वाटतो तुम्ही म्हणाल तर या क्षणी देखील माझी तयारी आहे '

ग्रामदानात मोठ्या जमीनदारांना भय वाटते असे आढळताच *विनोबांनी लोकांना सांगितले 'ग्रामदान म्हणजे अभयदान'.* ग्रामदानात

कुणालाच कसले भय नाही यात सर्वांचे कल्याण आहे सर्वोदय-पात्रावावत ते लोकाना सागत "आपले काम ऐच्छिक आहे ऐच्छिक काम हें जवरीनें केल्या जाणाऱ्या कामापेक्षा अधिक लवकर व उत्तम होतें हें आपण सिद्ध करू तरच अहिंसेचे राज्य येईल"

गुजराथेतून राजस्थान मेवाडला मीरावाईच्या मदिरात, समाजाची सर्व बधनें फेकून देऊन, भक्तीच्या मस्तीत रगणाऱ्या मीरेला विनोबानी 'बडखोर सत' अशी पदवी दिली मीरावाईसारख्या क्रातिकारी सताच्या भूमीतल्या स्त्रिया आजहि पडद्यात आहेत याचे विनोबाना दु ख होई स्त्रियानी ब्रह्मविद्येच्या क्षेत्रात पराक्रम करावा ही त्याची मनीषा आहे अजमेरच्या सर्वोदय-समेलनात 'ब्रह्मविद्यामदिरा' ची स्थापना करून त्यानी देशभर सर्वोदयाचे काम करणाऱ्या निवडक दहा ब्रह्मचारिणी भगिनींना पवनारच्या आपल्या परधाम आश्रमात प्रतिष्ठित केले

अजमेर हे मुसलमानाचे मोठें तीर्थक्षेत्र मक्केनतर अजमेरचा मान आहे दरवर्षी हजारो मुसलमान तेथें यात्रेकरता जमतात मागे देशाच्या फाळणीनतर एकदा विनोबा अजमेरला आले तेव्हा त्यानी तेथील दर्ग्याला भेट दिली होती दर्ग्यांत मुसल्मानासोबत नमाजमध्यें भाग घेऊन त्यानी स्थितप्रज्ञाच्या लक्षणाची सस्कृत प्रार्थनाहि म्हटली होती त्यानतर हजारो मुसलमानानी तेथील पद्धतीप्रमाणें त्याच्या हाताचे चुबन घेऊन आपली श्रद्धा व्यक्त केली होती या यात्रेत विनोबा आपल्या सर्व धर्मांच्या सोबत्याना घेऊन दर्ग्यांत गेले पढरपुरसारखाच सोहळा झाला मशीदीत स्त्रियाना प्रवेश नसे पण विनोबासोबत अनेक स्त्रियाहि तेथें गेल्या व सर्वानी मिळून तेथें सर्व-धर्म-प्रार्थना म्हटली

राजस्थाननतर पजाब आला देशाच्या फाळणीमुळें पजाबला फार सहन करावें लागले होतें शेंकडो घरें उध्वस्त झाली होती हिंदु आणि मुसलमान दोघाच्याहि रक्ताच्या नद्या वाहिल्या होत्या पण आज पजाब तें सारें विसरला होता गुरु नानकाचे भजन गात विनोबाचे स्वागत करीत होता.

'ना को वैरी नाही बेगाना।
सकल सगी हमको बनी आई'

आमचा कुणीहि वैरी नाहीं वी कुणी आम्हाला परका नाही सगळ्याशी

आमचे चागले जमते, . . . . . फाळणीच्या वेळच्या भयकर कहाण्या सागून पजाबी लोक म्हणत 'त्यावेळी आमची सर्वांचीच डोकी फिरली होती हिंदू शीख मुसलमान सारे माथेफिरू बनलो होतो पण माणूस मुळात चागला आहे '

पजाबातील शीख बधुभगिनींची विनोबावर विलक्षण श्रद्धा. गुरु नानकाच्या उपनिषदासारख्या, आकाराने लहान पण गुणाने भारी असलेल्या 'जपुजी' या ग्रथाचा विनोबा तेथील यात्रेत रोज सध्याकाळी पाठ करीत व त्यावर भाष्य करीत 'जपुजी' ने विनोबाचे चित्त खेचले त्यातील वचनें सागून ते सर्वोदयाचा विचार समजावीत—"आपल्याला निर्भय आणि निर्वैर बनले पाहिजे "

"आई पथी सयल जमाती, मन जीतै जग जीतु "

'सगळे पथ आमचे आहेत, मन जिंकले म्हणजे जग जिंकले' हे गाणे गात विनोबा पठानकोटला पोहोचले तिथून काश्मीर व पाकिस्तान एका हाकेच्या अतरात आहेत भारत आणि पाकिस्तान दोघानाहि पाण्याच्या रूपानें नवे जीवन देणाऱ्या रावी नदीचा पुल ओलाडून १९५९ च्या मे महिन्यात बुद्धजयतीच्या मुहूर्तावर विनोबा काश्मीरला पोहोचले

* * *

## - मोहब्बत का पैगाम [प्रेमसंदेश] : ८ :

तुलसीरामायणात सीतास्वयंवराच्या प्रसंगाचे मजेदार वर्णन आहे. प्रभु रामचन्द्र धनुष्याजवळ गेले तेव्हा सभा-मंडपात बसलेल्या लोकांच्या मनात निरनिराळे भावना-तरंग उमटले रमणींना तो कामदेव वाटला, मल्लांना प्रतिमल्ल नी रावणाला शत्रु 'जाकी रही भावना जैसी। प्रभुमुरति देखी तिन तैसी' ज्याची जशी भावना, त्याप्रमाणें त्याला प्रभुमूर्ति दिसली. काश्मीरात जाणारेहि नानाविध भावना घेऊन जातात. विनोबांनी काश्मीरच्या पहिल्याच भाषणात आपला उद्देश सांगितला की 'इथे मी पहायला ऐकायला नी प्रेम करायला आलो आहे कुराणात पैगंबराची एक कथा आहे. अबुबकर ह्या त्याचा आवडता शिष्य, असे लोक समजत. एकदा कोणीतरी त्यांना त्यावद्दल विचारले तर ते म्हणाले की 'जर अल्लाची तशी परवानगी असती तर मी अबुबकरवर इतरांहून जास्त प्रेम केले असतें तेव्हां अल्लाच्या हुकुमानुसार मी सर्वांवर समान प्रेम करीन'

हिमालयाच्या अंगाखांद्यावर खेळणाऱ्या, झेलम-चिनावच्या नी असंख्य जल-प्रवाहांच्या निर्मल जलानें आपली तुटपुंजी भूमि सिंचित,. फळा-फुलांनी बहरलेल्या बागांसोबत राहणाऱ्या साध्या भोळ्या काश्मीरी लोकांचा प्रदेश आज जगाच्या राजकारणातली एक गुंतागुंतीची समस्या होऊन बसला आहे याची तेथील निवासीयांना कल्पना देखील नसेल. १९४७ च्या १५ ऑगस्टला स्वराज्य आलें, भारताचे विभाजन झाले, सर्व देशी संस्थानांना भारत व

पाकिस्तानापैकी कुठल्याहि प्रदेशात सामील होण्याचा परवाना देऊन इंग्रज येथून निघून गेले. काश्मीर हे बहुसंख्य मुसलमान वस्ती असलेले, हिंदु राजाचे राज्य होते. तेथील राजानें कुठल्याच देशात सामील न होता दोन्ही देशाशी 'जैसे थे' करार केला. फाळणीच्या काळात हिंदु व मुसलमानांच्या रक्तानें सारा उत्तर भारत रंगला पण काश्मीरने आपली हिंदू मुस्लिम ऐक्याची परंपरा कायम राखली. गांधीजी म्हणाले 'काश्मीर म्हणजे घनदाट काळोखातला छोटासा दीप आहे.'

जेमतेम दोन महिने होत नाहीत तो पाकिस्तानने टोळीवाल्या लोकांना पाठवून काश्मीरवर हल्ला केला. काश्मीरच्या राजानें धावरून जाऊन भारत-सरकारची मदत मागितली. काश्मीरचे जननेते शेख अब्दुल्ला यांनीहि भारत-सरकारला विनविले. राजानें कायदेशीर रीत्या भारतात सामील होण्याच्या करारावर सही केली आणि भारतीय वायुदलाच्या विमानांनी काश्मीरच्या बचावाकरता सैन्यासह श्रीनगरकडे धाव घेतली. श्रीनगरपासून चार मैलावर टोळीवाले येऊन थडकले होते. पण भारतीय सेनेनें मोठ्या शौर्याने आक्रमणाचा प्रतिकार केला. टोळीवाले मागे पळू लागले, तेवढ्यात हा प्रश्न युनोत गेला आणि युनोच्या मध्यस्थीने लढाई बंद झाली. दोन्ही फौजांना जागच्या जागी थांबायचा आदेश आला. त्या क्षणापासून भारत व पाकच्या फौजा त्याच जागी उभ्या आहेत. जेथे लढाई थांबली त्या रेषेला सीझ फायर लाईन (युद्ध बंदी रेषा) म्हणतात. या रेषेनें काश्मीरचेहि दोन तुकडे झाले. एक तुकडा अजूनहि पाकिस्तानच्या ताब्यात आहे. त्याला त्यांनी 'आझाद काश्मीर' हे नाव दिले आहे.

" काश्मीर हे कुणाचे आहे, असा प्रश्न लोक विचारीत तेव्हा विनोबा म्हणत ' काश्मीर हे जगाचे आहे. हिंदुस्थानहि जगाचा आहे व पाकिस्तानहि जगाचा आहे. या विज्ञान-युगात आता वेगवेगळे देश राहणार नाहीत. सर्व जगाचे एक राज्य बनेल व आजचे देश त्याचे प्रांत होतील. .. येथील लोक म्हणतात काश्मीर आमच्या बापाचा आहे. मी त्यांना सांगतो कीं काश्मीर तुमच्या बापाचा होता हे खरे आहे पण आता तो तुमचा राहीला नाही. आता काळ बदलला आहे. संकुचित राष्ट्रवादाचे दिवस संपले आहेत. "

नयनरम्य सृष्टिसौंदर्याने नटलेली वाट चालतांना डोंगरावरून विमानें

उडत. दिल्ली ते मॉस्को आठ तासात नेणारे जेट विमान अवघ्या सात मिनिटांत हिमालय ओलाडतें हे कळल्यावर विनोबा म्हणू लागले 'पर्वत वह सबसे ऊचा हमसाया आसमांका। वह सतरी हमारा वह पासवाँ हमारा' असे कवि इकबाल म्हणत, तो जगातला सर्वांत ऊंच पर्वत फक्त सात मिनिटात पार केला जातो. याचा अर्थ असा की विज्ञानाने भौतिक अंतर नाहीसे केले आहे. आता मानसिक अंतर नाहीसे करण्याचे काम अध्यात्माला करायचे आहे. विज्ञान आणि अध्यात्माचा संयोग झाल्यास भूतलावर स्वर्ग अवतरेल, नाही तर विनाश ओढवेल. विज्ञान आणि आत्मज्ञान हे दोन्हीहि माणसाला व्यापक बनायला सागत आहेत.

भौगोलिक दृष्टीनें काश्मीरचे तीन तुकडे आहेत. चिनाब नदीच्या खोऱ्याचा दक्षिणेकडील जम्मू विभाग हा बहुसंख्य हिंदू वस्तीचा आहे. झेलम नदीच्या खोऱ्याचा काश्मीरचा भाग हा बहुसंख्य मुसलमान वस्तीचा व ईशान्येकडील लडाखचा भाग हा बहुसंख्य बौद्ध वस्तीचा असून तेथील संस्कृतीवर तिबेटी संस्कृतीचा प्रभाव आहे. राज्याचे नाव 'जम्मू आणि काश्मीर' हे आहे. विनोबा तेथील लोकांना विनोदानें म्हणत 'अरे, नुसते जे. के. एल्. स्टेट म्हणा. एल्. गाळाल तर लडाखवर दुसरे लोक हक्क सागू लागतील. भारतातून काश्मीरमध्यें येण्याकरता पूर्वी परमिट लागे पण विनोबांच्या आगमनासोबतच परमिट-पद्धति नाहीशी होऊन काश्मीर सर्वांना खुलें झाले.

काश्मीर राज्यात सीलिंगचा कायदा पूर्वीच झाल्यामुळे कुणाजवळ जास्त जमीन राहिली नव्हती. विनोबा येण्यापूर्वी येथे कोणीहि प्रचार देखील केला नव्हता. अगदी कोरी पाटी होती. तरीहि रोज भूदान मिळू लागलें व 'जमीन देणाऱ्या बाबा' च्या दर्शनाकरता हिंदू मुसलमान बाधव दूरदूरच्या भागातून रोज येऊ लागले विनोबांनी सर्व धर्मांचा भक्तिभावाने अभ्यास केलेला आहे. मूळ कुराण वाचता यावें म्हणून ते अरबी भाषा शिकले. कुराणाचा बराचसा भाग त्यांनी पाठ केला आहे. थेट अरबी उच्चारात कुराण म्हणताना पाहून मौलाना आझादांनी त्यांना 'हाफिज' ( विद्वान ) ही पदवी दिली होती. काश्मीर यात्रेत रोज दुपारी अकरा वाजता कुराणाची तिलावत ( पाठ ) करण्याचा कार्यक्रम सुरू झाला. शेकडो मुसलमान बधू श्रद्धेनें या कार्यक्रमाला

हजर राहत. विनोबा प्रथम लोकांना कुराण म्हणायला सांगत नंतर स्वतः म्हणत व त्यावर भाष्य करीत. मोठमोठ्या मौलवींच्या कुराणपाठात विनोबांना चूक आढळे आणि विनोबांच्या कुराणाच्या अगाध ज्ञानाची साक्ष पटल्यामुळें सारे लोक आश्चर्यचकित होत. दहा-पाच दिवसातच खेडोपाडी यातमी पसरली की 'पैगंबराच्या संदेशाची पुन्हा आठवण करून द्यायला एक बाबा (संत) पायी चालत आला आहे.' कुराणातील वचने सांगून विनोबा भाषणात म्हणत की 'जमीनीचा मालक अल्ला आहे जो माणूस स्वतःला जमीनीचा मालक म्हणवेल तो खरा मुसलमान नाही, काफिर आहे जमीनीची मालकी सोडून ग्रामदान करणारा हाच सच्चा मुसलमान आहे' लोक आनंदाने माना डोलावीत म्हणत—'बाबा खरं सांगतो आहे' एका मुक्कामावर चार दोन सनातनी मौलवींनी विनोबांना विचारले 'तुम्ही कुराण अक्षरशः मानता का?' विनोबा म्हणाले 'मी कुठलाच ग्रन्थ अक्षरशः मानत नाही. वेद, कुराण, बायबल या सर्व ग्रथातून मी आवश्यक तेवढा भाग घेतो. कुठल्याहि ग्रंथाचे ओझें डोक्यावर बाळगायला मी तयार नाही.' .....'तर मग तुम्हाला कुराणाचा आधार घ्यायचा अधिकार नाही.' मौलवींनी सूचना केली. विनोबा हसले नी जाहिर सभेंत विनोदानें म्हणाले 'हे लोक मला पैगंबराचे नाव घेऊ नका म्हणतात. ठीक आहे आता मी माझेच नाव घेऊन विचार सांगेन' .यावर साऱ्या काश्मीर भर खळबळ उडाली. 'बाबाला कुराण म्हणायला बंदी घालणारे हे कोण धर्ममार्तंड? बाबा सगळ्याहून अधिक सच्चा मुसलमान आहे' कुराणातील वचनाचा आधार घेत सर्वोदय-विचार सांगण्याची विनोबाची पद्धत चालूच राहिली "खुदानं तुम्हाला जी थोडीशी भाकरी दिली आहे, त्यातील हि एक हिस्सा दान दिला पाहीजे असा पैगंबराचा आदेश आहे तेव्हा थोडी जमीन असलेल्यांनी देखील भूदान द्यावे."

जम्मू शहरातला मुक्काम आटोपून विनोबांनी युद्धबंदी-रेषेच्या जवळील प्रदेशाची यात्रा सुरू केली सारा भाग भारतीय सैन्याच्या छावण्यांनी व्यापलेला. ठिकाठिकाणी सैन्याधिकारी व शिपाई भेटत व श्रद्धेने विनोबाचे विचार ऐकत. 'सैन्यातील लोकात इतका भक्तिभाव आहे, हे पाहून मला सानंदाश्चर्य वाटले,' असे त्यानंतर विनोबा नेहमी म्हणत नौशेरा हे भारतीय सैन्याचे एक प्रमुख ठाणें. तेथें सैन्यातील लोकांच्या खास सभेंत बोलताना विनोबानी गीतेचे

तत्त्वज्ञान सांगितले "तुम्ही तुमच्या स्वधर्माचे पालन करा निर्भय आणि निर्वैर वृत्ति राखा विज्ञानाच्या या युगात हिंसेने कुठलेच प्रश्न सुटणार नाहीत आपल्याला सर्वांना विश्वनागरिक बनयाचें आहे" नौशेऱ्याच्या मागच्या लढाईत पराक्रम करणारे मेजर जनरल यदुनाथसिंग हे सेवानिवृत्त झाल्यानंतर काश्मीर सरकारच्या पब्लिक सर्विस कमिशनचे अध्यक्ष झाले होते. सरकारतर्फे विनोबाच्या यात्रेची व्यवस्था पाहण्याचे काम त्यांच्याकडे होतें विनोबाचे विचार ऐकून तेहि प्रभावित झाले व त्यांनी शांति-सैनिकाच्या प्रतिज्ञा-पत्रकावर सही केली पाकिस्तानच्या हल्ल्याचा प्रतिकार करण्याकरता खेड्याखेड्यात शांति-सेना स्थापली जावी व लोकांना आक्रमण करणाऱ्याशी असहकार करण्यास तयार करावें, हा विनोबाचा विचार अनेकांना पटे नौशेऱ्याहून पाकिस्तानची सीमा फक्त दोन मैलावर आहे तेथील जनतेला 'हमारा कौल (मंत्र) जय जगत्' चा उद्घोष करताना पाहून विनोबा म्हणाले "खूप जोरात म्हणा जय जगत्, म्हणजे पाकिस्तानात ऐकू जाईल नुसता उद्घोषच नव्हे तर त्यानुसार आचरण कराल तर त्याचा पाकिस्तानवर व सर्व जगावर परिणाम होईल"

सैन्यातील लोकांच्या तोंडी 'त्या टेकडीपलीकडे दुश्मन (शत्रू) ची फौज आहे,' ही भाषा होती ते पाहून विनोबा म्हणाले "दुश्मन नका म्हणू शेजारी किंवा दोस्त म्हणा जगात कोणीहि आपले दुश्मन नाही, सर्व दोस्त आहेत आपण निर्भय बनू, कुणाला घाबरणार नाही व कुणाला आपली भीति वाटेल असं काही करणार नाही तर जगात सगळे आपले मित्रच आहेत असं आपल्याला आढळेल . . खरे शौर्य शस्त्रावर अवलंबून नाही. मांजर उंदरावर हल्ला करते नी कुत्र्याला घाबरते त्याचप्रमाणे शस्त्रधारी माणसे, आपल्याहून अधिक शक्तिशाली शस्त्रे पाहून घाबरतात देह विनाशी आहे, आत्मा अमर आहे याचे भान झाले म्हणजेच माणूस खरा शूर बनतो आपण सीमेच्या या बाजूला खेड्याखेड्यात ग्रामदान करून प्रेमाचे व सहकार्याचे वातावरण निर्माण करू या म्हणजे त्याचा परिणाम सीमेच्या पलीकडे देखील होईल"

ईशावास्य उपनिषदात म्हटले आहे की ज्ञानी पुरुष सर्व भूतमात्रात आपले रूप पाहतो म्हणून सर्वांवर प्रेम करतो, कुणाचाहि तिरस्कार करत

नाही. विनोबाच्या हृदयात मानवमात्राविषयीच नव्हे तर भूतमात्राविषयी असलेल्या प्रेमाचे प्रतिबिंब जनमानसात दिसे. सीमेच्या पलीकडील पाकिस्तानच्या एका लहानशा खेड्यातील कथा. भारतातून गेलेल्या एका माणसाला तेथील लोकानी उत्कंठेने विचारले 'तुमच्याकडे आला तो बाबा इकडे कधी येईल?' भारतीय माणूस म्हणाला 'काय सागावें तो तर यायला तयार होईल; पण तुमचे सरकार देईल का परवानगी?' पाकिस्तानच्या ग्रामीणानी चटकन उत्तर दिले 'का नाही देणार? बाबा काय फक्त भारताचाच आहे? तो तर साऱ्या जगाचा आहे! अन् तो इथे येईल तर इथली जमीन दुसरीकडे का घेऊन जाणार आहे? इथल्या श्रीमताकडून जमीन घेईल व गरीबाना वाटेल' ..... विनोबा म्हणतात "आमची मोठी मजेदार शेती चालते. आम्ही पेरतों एका ठिकाणी नी उगवतें दुसऱ्याच ठिकाणी."

युद्धबंदी-रेषेजवळचे रजौरी हे ठाणें पाहून पुढे पूछ या शहरात मुक्काम झाला पूछ तीन बाजूनी पाकिस्तानच्या प्रदेशानें घेरलेले आहे पूछच्या लढाईचे एक प्रमुख सेनानी कर्नल हिरानन्द विनोबाच्या यात्री-दलाचे व्यवस्थापक होते तेहि शातिसैनिक झाले. खेड्याखेड्यातील लोक शातिसेनेत दाखल होऊं लागले होते. "सगळे धर्म एकच शिकवण देतात. सर्व धर्मग्रथाचे अध्ययन करा. धर्माचे नाव घेऊन झगडे करण्याइतका मूर्खपणा दुसऱ्या कशांत नाही. या नगरातून जगाला प्रेम सदेश द्या."

पूछहून हिमालयातील 'पीर पजाल' ही पर्वतमाला ओलाडून काश्मीर-घाटींत प्रवेश करायचा होता. मार्गांतले सर्वांत उच शिखर साडे तेरा हजार फूट उचीचे. अन् दिवसहि पावसाळ्याचे. विनोबानी दोन जुलैला पहाटे पूछचा निरोप घेतला तेव्हा मुसळधार पाऊस पडत होता. काळ्या ढगानी सारें आकाश व्याप्त होतें. वाटेंत एक नाला आला पावसाळ्यात पहाडातील नद्यानाल्याना अचानक पूर येतो व गावेंच्या गांवें वाहून जातात. नाल्यात गुडघाभर पाणी पाहून विनोबा आत शिरले. सोबतचे स्थानीय अधिकारी व सैन्याधिकारी एकदम ओरडले 'परत फिरा पाणी वाढतें आहे'. पण विनोबाना परत फिरणें माहीत नाही. त्याचे पाय पुढे पुढेच जातात. पाणी वाढतच होतें. काही निवडक साथी तेवढे विनोबाबरोबर होते. बाकी सारे लोक सामानासकट किनाऱ्यावर उभे होते. विनोबानी पैलतीरावर पाय ठेवला

मात्र अन् पर्वताच्या उंचीची पाण्याची लाट आली विनोबा सोबत्यासह सुरक्षित मुक्कामी पोहोचले वाटेत आणखी एका ठिकाणी 'लॅन्ड स्लाइड' ( पर्वत ढासळणें ) झाला क्षणात एक टेकडी कोसळली पण विनोबाच्या दोन पावलें मागे त्यामुळे कुणाला काही इजा झाली नाही पुढच्या यात्रेची ही नुसती चुणुक होती

पाकिस्तानच्या सीमेजवळ पर्वतमालेतील कठिण पायवाट एकीकडे उंच डोंगर व दुसरीकडे खोल नदी सोबतचे अधिकारी विनोबाच्या सोबत्यांना बजावीत 'सभाळून चला जरा पाय घसरला की नदी तुम्हाला भेट पाकिस्तानात नेईल' यावर विनोबा म्हणत "ही नदी सुद्धा सागते आहे की एक व्हा पण मूर्ख माणूस तें ऐकत नाही' उंच डोंगराच्या व छोट्याशा नदीच्या काठाशी वसलेल्या भडी राजपुर या रमणीय खेड्यात लाकडी पूल ओलाडून विनोबानी प्रवेश केला तेव्हा गाववऱ्यानी मोठ्या आनदानें त्याचे स्वागत केले अन् दुसऱ्याच दिवशी नदीचे पाणी विलक्षण वाढून गेलें व अर्धा गाव वाहून गेला पाणी वाढताना पाहून लोकानी विनोबाना एका उंच टेकडीवर नेलें पर्वताच्या उतरणीवरची छोटी छोटी हिरवी शेतें, लाकडाची सुबक घरें नी नदीकिनाऱ्या-वरचे उंच वृक्ष हे सारें काही क्षणात वाहून जाताना पाहून जीवनाच्या क्षण-भंगुरतेचे साक्षात् दर्शन घडले वायरलेसने सदेश आला की साऱ्या काश्मीरभर अभूतपूर्व पुरामुळें हाहाकार माजला आहे सगळे रस्ते तुटले आहेत पूल वाहून गेले आहेत विनोबाची पुढची पायवाटहि पावसामुळें व पर्वत ढासळल्या-मुळें असून नसल्यासारखी झाली आहे तेव्हां पुढें जाणें अशक्य आहे मागें फिरण्यावाचून दुसरा मार्ग नाही काश्मीरच्या पतप्रधानांनी मागें फिरण्या-विषयीचा आवर्जून सदेश पाठवला विनोबा म्हणाले "हा विनोबा एकदा परत फिरला तर पुन्हा कधी काश्मीरात येणार नाही विनोबा मागें फिरू शकत नाही" जनरल यदुनाथसिंगना पुढची वाट पाहण्याकरता पाठवून देऊन विनोबा ध्यानमग्न झाले

विनोबांच्या यात्रेंत यात्रेची सर्व व्यवस्था जनता करी पण काश्मीरात त्यानी सरकारचे आतिथ्य स्वीकार केले होतें पहाडावरच्या या कठिण यात्रेंत सामान वाहण्याच्या घोड्यापासून तो सर्व व्यवस्था पाहण्याच्या मडळीपर्यंत पाऊणशें लोकाची टोळी बरोबर होती त्यात विनोबाचे सोबती फक्त सात होते.

मढीला येऊन पाच दिवस होऊन गेलेले जवळचे रेशन संपत आलेले पुढच्या वाटेवर रेशन मिळण्याची काहीच शक्यता नाही सगळे चिंताग्रस्त, पण विनोबा आपल्या मस्तीत. ९ जुलैला पहाटे ते एकटेच पुढे निघाले दोन सोबती मागें धावले धावपळ सुरू झाली पाईनफरच्या उंच उंच वृक्षाच्या सान्निध्यातील डोंगरातील नद्यानाल्यांना ओलांडीत घसरड्या पाऊल वाटेवरून विनोबा लोरेन् या पुढच्या मुक्कामी कसे पोहोचले याचे सर्वांना कोडें वाटले दुपारपर्यंत सामानासकट सर्व सोबती कसेबसे तेथे पोहोचले पण रेशन अगदी संपलेले. सध्याकाळी काय खायचे हा प्रश्न तास दोन तास निघून गेले आणि पूंछच्या लोकांनी पाठवलेलें धान्य घेऊन येणारे मजूर वाट चुकत चुकत नेमके लोरेनला पोहोंचले लोरेन एक ऐतिहासिक महत्त्वाचें ठिकाण आहे गजनीच्या महमदानें याच मार्गानें काश्मीरवर स्वारी करण्याचा तीनदा प्रयत्न केला होता पण निसर्गहि प्रतिकूल झाला आणि लोरेनच्या लोकांनीं मोठें शौर्य गाजवून त्याला पिटाळून लावले अखेरीस निराश होऊन तो परतला याचा उल्लेख करून विनोबा म्हणत "तो शस्त्र घेऊन काश्मीर जिंकायला आला म्हणून त्याला परत फिरावें लागले मी प्रेम घेऊन जिंकायला आलो म्हणून पुढे जाऊ शकलो"

लोरेननंतर सर्वांत कठिण चढण आली उंच उंच पठारावर छोट्या तबूत रात्र घालवायची व सकाळी चालायचे हा कार्यक्रम थंडीमुळे रात्रीची झोपहि येणें मुश्किलच वाट चालताना विनोबा दर शंभर पावलानंतर अर्धा मिनिट थांबत व मागें वळून पाहून म्हणत "स्वर्गारोहण चालले आहे रे. आपले कोण कोण गळून पडलय् ?" . राक्षसी उंचीच्या पाईनफर आणि मग देवदार वृक्षाची सोबत दोनतीन दिवस झाली पुढें अधिक उंचीवर गेल्यावर छोटी छोटी झुडपेंच तेवढी सोबत करू लागली अकरा हजार फुटावर पोहोचल्यावर बारीक नाजुक रंगीबेरंगी फुलांचा गालीचा लागला त्याननर नुसते भले मोठे खडक नी साडेबारा हजार फुटानंतर चहूकडे बर्फच बर्फ. एका सध्याकाळी गाराचा पाऊस झाला सगळे घाबरले तंबूत जाऊन दाटी-दाटीनें बसले या भागांत कपाळमोक्ष होईल एवढे मोठे गारांचे दगड पडतात विनोबा हसले 'आता पाऊस बंद होईल घाबरू नका ' अर्ध्या तासांत पाऊस खरोखरच बंद झाला दुसऱ्या दिवशी अखेरची सर्वांत कठिण चढण लागली दोन स्थानीय गावकऱ्यांचे हात धरून विनोबा पावलें टाकीत

होते आकाश निरभ्र होतें सूर्य हळूच डोकावला नी सर्वांनी सुटकेचा निश्वास टाकला त्या दिवशी वारा किंवा पाऊस आला असता तर एकहि माणूस वाचणें शक्य नव्हतें स्वच्छ सूर्यप्रकाशात विनोबा साडेतेरा हजार फुटावर पोहोचले. बर्फाच्या शिलेवर बसले आणि वेदोपनिषदातील मन्त्र, ज्ञानदेवाची व इतर संताची भजनें गाऊ लागले प्रार्थना संपली ध्यान सुरू झाले हिमालयाच्या त्या उचीवर बर्फाच्या शिलेवर बसून विनोबानी कन्याकुमारीला सागरातल्या शिलेवर बसून केलेल्या प्रतिज्ञेचा पुनरुच्चार केला "भारतातल्या पाच लाख खेडयात ग्रामस्वराज्य स्थापन होईपर्यंत माझा संचार चालूच राहील "

पीर पजालच्या त्या उच्च शिखरावर उभे राहून विनोबानी चहूकडे दृष्टि फिरवली सोबतचे सैन्याधिकारी माहिती देऊ लागले 'त्या पर्वतापलीकडे पाकिस्तान नी तिकडे अफगाणिस्तान इकडे तिबेट, चीन आणि या बाजुला रशिया ' सगळें जग जणू डोळयात सामावले गेलें अन् समोर सूर्याच्या सोनेरी किरणात चमचमणारे निळया आकाशाच्या पार्श्वभूमिवर खुलून दिसणारे नागा पर्वताचे अठ्ठावीस हजार फूट उंचीचे धवल हिमवान शिखर ! देवानें डोळे दिले त्याचें सार्थक झाल्यागत वाटले हिमालयाच्या दर्शनानें डोळे तृप्त होतात, सान्निध्याने मन शांत होतें

अडीच हजार फुटाची चढण चढून नी नंतर दोन हजार फूट उतरून विनोबा काश्मीर घाटीतल्या तुगन गावी पोहोचले तेव्हा श्रीनगरहून औषधे व स्ट्रेचर्स घेऊन डॉक्टराचा ताडा तेथें उभा होता विनोबासकट सर्व सोबत्याना जिवंत व निरोगी अवस्थेत पाहून डॉक्टरानाच घेरी आल्यागत वाटले विनोबा स्वत:ला 'अल्लाके बन्दे' ( ईश्वराचे दास ) म्हणवीत. देवाचे काम करणाऱ्याचे रक्षण देव कसे करतो याचा साक्षात्कार घडला. पीर पजालची पर्वतमाला ओलांडून विनोबानी गुलमर्गचा राजप्रासाद गाठला अन पावसाची झड सुरू झाली विनोबा पीर पजाल ओलांडीपर्यंत जणू पाऊस वारा, वादळ या सर्वांवर कुणीतरी बंदी घातली होती विनोबा उगीच नाही म्हणत की 'मी चालत नाही, मला कुणी तरी चालवतो आहे '

काश्मीर घाटीतल्या ( खोरे ) पहिल्याच स्वागतात गावकऱ्यानी एक पारसी गीत म्हटलें " तू इथें आलास तर इथून जाण्याकरता नाही तुझ्याकडून

आम्हाला सामर्थ्य नी प्रकाश हवा आहे तू इथेच रहा" विनोबा सद्गदित झाले "अशीच प्रेमभक्तीची गीतें मी साऱ्या भारतात ऐकत आलो प्रत्येक ठिकाणी मला तुमच्यासारखे प्यारे दोस्त मिळाले आणि म्हणून प्रत्येक ठिकाण माझा 'वतन' ( स्वदेश ) आहे असे मला भासले देवानें प्रेम करण्याकरताच आपल्याला जन्म दिला आहे प्रेमाचे राज्य स्थापित करा म्हणजे मी तुमच्या म्हणण्याप्रमाणे इथेंच राहीन '

विनोबा सर्व पक्षाच्या व विचाराच्या लोकाना भेटत व सुखदु खाच्या गोष्टी करत विनोबाजवळ आपले हृदय मोकळे करताना कुणालाहि सकोच वाटत नसे विनोबाचे आईसारखें प्रेम व हट्टी मुलाना आई रागावते तसे रागावणें पाहून लोकाच्या हृदयाचे दरवाजे उघड् लागले सत्तारूढ पक्ष 'नॅशनल कॉन्फरन्स', विरोधी पक्ष 'डेमॉक्रॅटिक कॉन्फरन्स, (आता हा सत्तारूढ पक्षात विलीन झाला आहे ) प्रजा परिषद तसेच शेख अबदुल्ला याचा 'प्लेबिसाइट फ्रन्ट व पाकिस्तानात जाऊ इच्छिणाऱ्याचा 'पोलिटीकल कॉन्फरन्स' इत्यादि सर्व पक्षाचे लोक विनोबाजवळ मन मोकळें करीत आणि विनोबा त्याना 'मुक्तीच्या चार गोष्टी' सागत काश्मीरचा प्रश्न कसा सुटणार यावर विनोबा सागत "आता राजकरणाच्या (सियासत) मार्गानें कुठलाच प्रश्न सुटणार नाही आध्यात्मिक ( रुहानियत ) मार्गानेच सुटणार विज्ञानाच्या युगात राजकारण टिकणार नाही सारे राजकारणी मुत्सद्दी आता शिशिर ऋतूतील वाळक्या पानाप्रमाणे गळून पडणार आहेत त्याचे दिवस सपले आहेत राजकारण माणसाना तोडत व अध्यात्म जोडते आता तोडणारी शक्ति कामाची नाही, जोडणारी शक्ति हवी मी एक समीकरणच बनवले आहे—

"राजनीति + विज्ञान = सर्वनाश
अध्यात्म + विज्ञान = सर्वोदय"

विनोबानी जम्मूच्या जेलमध्ये जाऊन शेख अबदुल्लाची भेट घेऊन त्याची भूमिका समजून घेतली होती काश्मीरमध्ये ठिकठिकाणी त्याचे अनुयायी भेटत काश्मीरचा प्रश्न जनतेचे मत घेऊन सोडवावा असे त्याचे मत आहे विनोबाना सार्वमताचा मार्ग अयोग्य वाटे गाधीजीना काश्मीरविषयी फार आशा होती असे ते लोक अभिमानाने सागत तेव्हा विनोबा त्याना म्हणत "आज काश्मीर-मुळें भारत व पाकिस्तानात दुराव निर्माण झाला आहे पण दोन्ही देशाना

जोडणे हे काश्मीरचे मिशन आहे, हे विसरू नका " लोक विचारीत जोडण्याचा मार्ग काय ? विनोबा एक नवीनच कल्पना समोर ठेवीत "भारत व पाकिस्तानचे कॉन्फेडरेशन करायला हवे दोन्ही देशाचे प्रशासन आज सारखेच वेगवेगळे राहीले तरी चालेल पण सरक्षण, परराष्ट्रीय धोरण, चलन व आवागमन या चार गोष्टी मध्यवर्ती कॉन्फेडरेशनच्या सरकारकडे रहाव्या दोन्ही देशात खुली ये जा सुरु व्हावी यातच दोन्ही देशाचे भले आहे अर्थात् हे काम जबरदस्तीने होणारे नाही, प्रेमानेंच होणारे आहे तेव्हा प्रेम निर्माण करण्याचे काम तुम्हाला करायचे आहे " हे सर्व ऐकून लोकाना प्रथम आश्चर्याचा धक्का बसे पण विचार त्याना आवडे

पोलिटिकल कॉन्फरन्सच्या नेत्यानी विनोबाना सागितले 'काश्मीर पाकिस्तानात जावा असे आमचे मत आहे कारण त्याची आमची सस्कृति एक आहे' विनोबा म्हणाले "अरे वेड्यानो ! कुठल्या जुनाट युगात वावरताहात तुम्ही ? हे विज्ञान-युग आहे आता जगाचे एक राज्य करायचे आहे त्याचे पहिले पाऊल म्हणून भारत व पाकचे सघराज्य स्थापायला हवें हे काम राजनीतीच्या मार्गानें होणें अशक्य आहे लोकनीतीच्या, अध्यात्माच्या मार्गाने करायचे आहे" विचार तर लोकाना पटले पण हे कसे करायचे ते समजेना 'ग्रामदान, शाति-सेना हा एक आध्यात्मिक मार्ग आहे तुम्ही यात सहकार्य करा '

काश्मीरचे भयानक दारिद्र्य पाहून विनोबाना अतिशय दु ख होई निसर्ग-सौदर्याची लयलूट असलेल्या या प्रदेशात दारिद्र्य शोभत नाही जिथें दारिद्र्य आहे ती सौदर्यस्थळें, ब्यूटी स्पॉट्स् मला डर्टी स्पॉट्स् (घाणेरडी स्थळें) वाटतात असे ते नेहमी म्हणत दारिद्र्य नाहीसे करणें, एक मूलभूत कार्य आहे व त्या कार्याने सर्व पक्षानी मतभेद विसरुन एक दिलाने लागायला पाहिजे असे ते नेहमी सागत उमलल्या गुलाबासारखी काति असलेल्या दहा बारा वर्षांच्या काश्मीरी बालकाला लाकडाची मोळी घेऊन रात्रभर चालत जावें लागतें तेव्हा कुठे आणा दोन आणें मजूरी मिळे ओझ्यामुळे त्याची पाठ लहानपणापासूनच वाकते हे पाहून विनोबाना अतिशय वेदना झाल्या व त्यानी प्रायश्चित म्हणून आपले काही सामान स्वत उचलायला सुरुवात केली.

रोजच्या प्रवचनात अनेकदा धर्म व आध्यात्मिकतेवर विवेचन करीत विनोबा म्हणत "प्रत्येक धर्माचे दोन भाग आहेत, संकुचित पार्थिवता व अध्यात्म. विज्ञान-युगात पार्थिकता टिकणार नाही. अध्यात्म मात्र टिकेल व विज्ञानाला दिशा दाखवेल. पार्थिक धर्म माणसाना तोडतात, अध्यात्म जोडते. सत्य, प्रेम, करुणा हे शुद्ध अध्यात्म आहे सकाळच्या वेळी प्रार्थना करायची असल्यास हिंदू पूर्वेकडे तोंड करील व मुसलमान पश्चिमेकडे ईश्वर तर सर्व दिशात व्याप्त आहे तेव्हा कोणत्या दिशेकडे तोंड करायचे हा गौण भाग आहे. ईश्वराचे स्मरण करणे हा मुख्य भाग आहे व तेच अध्यात्म आहे. पार्थिक धर्म बाह्य गोष्टीवर जोर देतात अध्यात्म अंतरगाकडे लक्ष देण्यास सागते" विनोबा असे बोलू लागले म्हणजे काही हितेच्छू सागत 'इथे असे ऐकायची लोकाना सवय नाही. असे बोलल्याने सकट ओढवून घ्याल.' विनोबाना गमत वाटे ते म्हणत "सत्य सांगितल्याबद्दल येशूला सुळावर चढवले गेले नी गांधीवर गोळ्या झाडल्या गेल्या तसेच भाग्य मलाहि लाभले तर मला फार आनंद होईल लोक सुळावर चढवोत की गोळ्या झाडोत, मी सत्य हे सागणारच" विनोबा निर्भयतेने सत्य सागत गेले व काश्मीरी जनता स्नेह आणि फुलाचा वर्षाव करीत त्याचे समर्थन करीत गेली.

विनोबाना प्रत्येक विचाराला कुराणाचा आधार मिळे "कुराणात उम्मूल किताब व मुतशाबिहात अशा दोन गोष्टीचा उल्लेख आला आहे. उम्मुल किताब म्हणजे धर्माची मूलतत्त्वे, आध्यात्मिकता व मुतशाबिहात हा बदलणारा भाग, पार्थिवता...... कुराणात म्हटले आहे की 'प्रत्येक जमातीकरता ईश्वराने वेगवेगळे रसूल (प्रेषित) पाठवले आहेत व ईश्वर सर्व रसूलात काहीहि फरक करत नाही सर्व प्रेषिताची एक जमात आहे'... ईश्वराला रहमान रहीम, दयाळु कृपाळु म्हटले आहे करुणावान् ईश्वराची भक्ति करायची म्हणजे आपल्याहि जीवनात करुणा आणायची, दीनदु खिताची सेवा करायची, भूमिहीनाना जमीन द्यायची, गरीबाची गरीबी दूर करायची. जो खरा भक्त असेल तो समाजात दारिद्र्य राहू देणार नाही."

भारतातल्या लोकशाहीचे दोष दाखवीत विनोबा म्हणत "आपण लोकशाहीची पद्धत युरोपातून जशीच्या तशी घेतली आपल्या संस्कृति व परपरेनुसार त्यात काही फरक करायला हवे होते ते केले नाही पाश्चात्याची निर्जीव

नक्कल केल्यामुळे आमची लोकशाही केवळ औपचारिक (फॉर्मल) बनली आहे- 'आम्हाला मतें द्या म्हणजे आम्ही तुम्हाला स्वर्गात नेऊ' असे प्रत्येक पक्षवाले म्हणतात आणि जनताहि सारे काम निवडलेल्या प्रतिनिधींवर सोपवून निष्क्रीय बनते आपला स्वर्ग आणि नर्क आपल्या हातीं आहे, आमचा उद्धार आम्हीच करू शकतो, हे ओळखून जनतेने आपापल्या खेड्याचा कारभार आपल्या हातीं घेतला म्हणजे खरी लोकशाही प्रस्थापित होईल दिल्लीमध्यें तयार होणाऱ्या योजनानी खेड्याचे कल्याण होऊ शकणार नाही प्रत्येक खेड्याने आपापली योजना तयार करून त्यानुसार एकजुटीने काम केले म्हणजे देशाचा विकास होईल लोकशाहीच्या विकासाकरता नुसता सबल विरोधी पक्ष असून चालणार नाही, त्याकरता निष्पक्ष सेवकाचा असा एक वर्ग निर्माण झाला पाहीजे लोकशाहीत सरकार नोकर व जनता मालक आहे पण एखादा शिपाई खेड्यात गेला तरी लोक त्याला घाबरतात तो शिपाई म्हणजे जनतेच्या नोकराच्या नोकराच्या नोकराचा नोकर आहे आणि मालक त्याला घाबरतो !"

काश्मीरकरता भारत सरकार खूप मदत पाठवते पण ती जनतेपर्यंत पोहोंचत नाही, मधले लोक खाऊन टाकतात अशी तक्रार सर्वत्र ऐकू येई त्यावर बिनोबा म्हणत 'आमच्या पवनारला शेताना पाणी देण्याकरता एक नाली खोदली होती पण अनुभव असा आला की बरेचसे पाणी नालीच जिरवून टाकते, शेताना पोहोंचत नाही असेच इथें चालले आहे- जनशक्ति जागृत होईल तेव्हाच ही स्थिति बदलेल.' काश्मीरात विनोबा सरकारी पाहुणे असल्या-मुळें त्याची सर्व व्यवस्था चागली झाली तरी सोबत सरकारचे गुप्तचरहि असत असें कोणी सागताच विनोबा म्हणाले "माझ्या मागेच नव्हे तर चारी बाजूना गुप्तचर असले तरी मला चालेल ते लोक माझ्याबरोबर राहतील, माझे विचार ऐकतील तर आमचे कार्यकर्ते बनून जातील

प्रेम देत, घेत, प्रेम लुटीत काश्मीर यात्रा चालली होती रोज हजारो-च्या सख्येने मुसलमान बाधव 'बाबा' चे दर्शन घ्यायला येत काश्मीरात सर्वत्र हिंदु-मुसलमान एकतेचे अद्‌भुत दर्शन घडे अनतनागला एकाच आवा-रात मदिर व मशीद आहे गेली चारसों वर्षे हजारो हिंदु मुसलमान एका लहानशा दरवाजातून त्या आवारात प्रवेश करतात मीराबाईप्रमाणें काश्मीरात लल्लेश्वरीचे जनमनात विशेष स्थान आहे ती ज्ञानदेवाची समकालीन-

शैवसप्रदायातील अद्वैत विचार मानणारी भक्त, विदेहावस्थेला पोहाचलेली, नवग्नावस्थेत हिंडे पीरपजालच्या बर्फावरून चालताना विनोबाना तिचे सतत स्मरण होई ललेची गीतें आजहि काश्मीरची मुसलमान जनता मोठ्या प्रेमाने गाते

काश्मीर हे भारतमातेचे मस्तक सर्वोदय-समाजाच्या स्थापनेतहि काश्मीरनें अग्रगामी बनावे अशी विनोबाची आकाक्षा काश्मीरची चार महिन्याची यात्रा सपवून विनोबा पुन्हा पठानकोटला परतले तेव्हा काश्मीरच्या रमणीय निसर्गसौंदर्यापेक्षा सौम्य शात प्रेमळ काश्मीरी लोकाच्या हृदय-सौंदर्यानें त्याना भारावून टाकले होते विनोबा दूर दूर निघून गेले पण वातावरणात फळाफुलाच्या सुगधात स्वराची धुदहि मिसळली होती —

"तू आमच्याकडे आलास, तो परत जाण्याकरता नव्हे माणूस पोपटाला बोलायला शिकवतो पण जगलातल्या मैनेला प्रेम करायला कोणी शिकवले? आम्ही हि त्या मैनेप्रमाणेच कुणी न सागता, शिकवता प्रेम करीत आहोत प्रेमाच्या दुनियेच्या बादशाहानें आपला जरतारी मुकुट फकीराच्या स्वाधीन केला आहे"

* * *

# अहिंसेचा साक्षात्कार : ९ :

वेदामध्यें विश्वामित्र ऋषि 'विपाट शतद्रु' च्या संगमावर गेले व तिथे नदीचे खूप वाढलेले पाणी पाहून त्यानी प्रार्थना केली अशी कथा आहे. झेलम (वितस्ता), चिनाब (चन्द्रभागा), रावी, बियास (विपाट) व शतद्रु (सतलुज) या पंच नद्यांच्या पंजाबात वैदिक संस्कृतीचा विकास झाला. 'दरिया सिंध' ( सिंधु नदी ) वरून या देशाला सिंधुस्तान ( हिन्दुस्तान ) हे नाव मिळाले

पठानकोट ( प्रस्थान कोट ) मधून भारत पाक व काश्मीर या तिन्ही ठिकाणी प्रस्थान करता येतें अशा या केन्द्रस्थानी तिन्ही प्रदेशांची सेवा करण्याकरतां व स्नेह निर्माण करण्याकरता विनोबानी 'प्रस्थान-आश्रमाची' स्थापना केली

हिमाचल प्रदेश हा हिमालयाच्या कुशीतल्या लहान लहान संस्थानांचा मिळून बनलेला प्रदेश अजून यावर केन्द्र सरकारची सत्ता आहे हिमाचल प्रदेशांत काही दिवस हिंडून विनोबा अमृतसरला—शिखांच्या पवित्र तीर्थ-स्थानी—पोहोंचले तेथील प्रसिद्ध सुवर्ण मंदिरात जाऊन त्यानी प्रार्थना केली राजकारणातील झगड्यामुळें धर्मकारणहि बिघडत चालले होते. अकालीदलाचे नेते मास्टर तारासिंग विनोबांना अनेकदा भेटत विनोबा त्या सर्वांना सांगत की "गुरुद्वाऱ्यात प्रवेश करताना जोडे बाहेर काढून ठेवण्याची पद्धत आहे त्याचप्रमाणें 'सियासत के जूते' (राजकारणाचे जोडे) हि बाहेर काढून ठेवीत चला धर्मांत राजकारणाची मुळीच ढवळाढवळ नको" ....

अमृतसरहून पाकिस्तानचे लाहोर अवघे वीस बावीस मैल दुभगलेल्या पंजाबातील जोडीची शहरेंहि दुभगली गेली होती।

पंजाबातील सभांना स्त्रियांची पार गर्दी असे अमृतसरला तर स्त्रियांच्या वेगळ्या सभेला जाहीर सभेचेंच स्वरूप आले "स्त्रियांनी 'सर्वोदय-पात्रा' चे काम हाती घ्यावें शांतिसेनेच्या, अहिंसक क्रांतीच्या कामात त्यांनी पुढाकार घ्यायला पाहीजे हिंसेच्या कामात पुरुष पुढे जातात, जगाला वाचवण्याच्या कामात स्त्रियांनी पुढें यावें, अहिंसेची शक्ति निर्माण करून जगाचे नेतृत्व त्यांनी हाती घ्यावें" असें विनोबा नेहमी सांगत

देशातल्या एखाद्या कोपऱ्यात दूरच्या कुठल्या तरी खेड्यात राहूनहि विनोबांचे सर्व जगाशी मानसिक अनुसंधान असे रोजची वर्तमानपत्रे ते काळजीपूर्वक वाचतात व त्यांचे संवेदनाक्षम चित्त जगातल्या प्रत्येक घटनेवर थर्मामिटरप्रमाणे अचूक निर्णय देतें रोजच्या प्रवचनांत ते सर्व जागतिक घटनांवर बोलतात तिबेटमध्यें चीनने केलेले अत्याचार, दलाई लामाचे आगमन, चीनचा जळफळाट इत्यादीवर त्यांच्या तटस्थ बुद्धीने निर्णय दिला की "भारतभूमीनें आजवर सर्व शरणागतांना आश्रय दिला आहे त्याच परंपरेनुसार दलाई लामानांहि आश्रय दिला चीनवाल्यांनी यामुळे रागावण्याचे काहीं कारण नाही भारताच्या मनात सर्व जगाविषयी, चीनविषयी देखील स्नेहभाव आहे, हे त्यांनी लक्षात ठेवावें" "तिबेटची दुःखदायी कथा सांगत आहे की यापुढें जगात लहान लहान राष्ट्रे टिकू शकणार नाहीत सर्वांचे स्वातंत्र्य व व्यक्तित्व अबाधित रहावें असे वाटत असल्यास अहिंसेवर आधारित समाज-रचना निर्मायला हवी व जगाचे सयराज्य स्थापायला हवें"

भाखरा नांगलला भारतातले सर्वांत मोठे धरण बांधले जात आहे तेथील पाण्यानें पंजाब-राजस्थानची शेकडो एकर जमीन सुपीक बनेल म्हणून तें आधुनिक तीर्थस्थान आहे, असे पं नेहरू नेहमी म्हणत याचा उल्लेख करून विनोबा सांगत की "आज भाखरा-नांगलच्या पाण्यानें ज्यांच्याजवळ जमीन आहे, त्यांना खूप लाभ होईल पण भूमिहीन बिचारे तसेच राहतील सरकारनें जर अशी योजना केली की ज्यांना पाणी मिळेल त्यांनी आपल्या जमीनीचा सहावा हिस्सा भूमिहीनांकरता दान द्यावा तर देणाऱ्यांचे तर काहीच नुकसान होणार नाही कारण सहा एकर कोरडवाहू जमीनीतून जें

पीक मिळेल तेवढें त्याना एक एकर ओलिताच्या जमीनीतून मिळेल पण भूमिहीनाना जमीन मिळाल्यामुळे त्याचे जीवन बहरेल व त्याचा आशीर्वाद भाकरानागलला मिळेल आणि मग ते तीर्थस्थान बनेल ज्या कामाला गरीबाचा आशीर्वाद मिळत नाही ते तीर्थस्थान होऊ शक्त नाही"

पजाबातून उत्तर प्रदेशाचे मीरत आले वाटेंत दिल्ली होती पण विनोबानी दिल्लीला प्रदक्षिणाच तेवढी घातली दिल्लीचे वडे वडे लोक त्याना तेथे येण्याविषयी आग्रह करीत तर विनोबा थट्टा करीत "तेथे गेलें नाही आलें परतोनी" माणूस दिल्लीला एकदा गेला की तिथून परतच येत नाही!' राष्ट्रपति व पतप्रधान यानी जवळील पट्टीकल्याणा या गावी जाऊन विनोबाची भेट घेतली साधारण वर्षातून एक्दा तरी विनोबाची भेट घेण्याचा त्या दोघाचा शिरस्ता होता

काश्मीरच्या यात्रेत गुलमर्गला भिडहून दोन प्रमुख कार्यकर्ते विनोबाना विनवायला आले होते—"आमच्या भागात डाकूचा धुमाकूळ चालला आहे, हा प्रश्न लष्कर किंवा पोलिसाच्या मार्गानें सुटणार नाही, तरी तुम्ही तिकडे यावें" विनोबा फक्त एवढेंच म्हणाले—"करू विचार" त्यानतर नुकत्याच मारल्या गेलेल्या डाकु मार्नसिगच्या मुलाचे तहसिलदारसिगाचे नैनी जेलमधून पाठवलेले एक पत्र विनोबाकडे आले त्यात त्यानें लिहीले की "मला फाशीची शिक्षा झाली आह मरण्यापूर्वी एकदा आपले दर्शन घ्यायची उत्कठा आह आपण आमच्या भागात जावें व आमच्या मुलाबाळाना कुमार्गापासून वाचवावे ही माझी प्रार्थना आह" विनोबानी जनरल यदुनाथसिगना नैनीला पाठवले आणि घटनाचक्र सुरू झाले विनोबानी चबळच्या खोऱ्याची, डाकुग्रस्त प्रदेशाची यात्रा करावी अशी अनेकाची इच्छा होती पण विनोबा विनोदानें म्हणत 'जगातले सगळेच प्रश्न सोडविण्याचा मी काही ठेका घेतला नाही!'

मध्यप्रदेश, राजस्थान, व उत्तर प्रदेशातून वाहत जाऊन यमुनेला मिळणाऱ्या चबळ नदीनें सुमारे आठ हजार वर्गमैल भूमीवर आपले अधिराज्य स्थापले आहे तिच्या वेगवान् व चचल प्रवाहामुळे काठची माती वाहून जाऊन मोठमोठ्या कपारी पडल्या आहेत वाकडी तिकडी उच टेकाडें व गुहा तयार झाल्या आहेत हींच डाकूची लपण्याची ठिकाणें अकबराच्या काळापासून हा भाग डाकुक्षेत्र म्हणून कुख्यात आहे बंदुकीच्या मार्गानें डाकूना नेस्तनाबूत

करण्याचे आजवर अनेक सरकारानी प्रयत्न केले होते. पण बंदुकीनें डाकू मरत; डाकुवृत्ति कशी नष्ट होणार ? उलट अहिरावणाच्या रक्ताच्या थेंबातून आणखी अहिरावण प्रकट होत त्याप्रमाणें एक डाकू मारला गेला की अनेक उत्पन्न होत. आर्थिक कारणापेक्षा वैयक्तिक हेवेदावे, स्वाभिमानाच्या व शौर्याच्या अजब कल्पना आणि पोलिसाचा जाच यामुळें डाकू अधिक निर्माण होत.

काश्मीरातून इंदूरला जायचे जाहीर झाले होतें. पण चंबळ खोऱ्याच्या मार्गानें जायचे की नाही ते ठरविण्यापूर्वी विनोबानी जनरल यदुनाथसिंगना सांगितले की 'चंबळ खोऱ्याशी संबंध येणाऱ्या तिन्ही प्रांतीय सरकाराशी व केन्द्रीय सरकारशी बोलणी करून त्याची परवानगी घ्या. माझ्या तिथें जाण्यानें त्याना काही अडचण होणार असल्यास मी तो रस्ता टाळून दुसऱ्या मार्गानें इंदूरला जाईन मी सत्य हे सांगणारच एवढें लक्षात ठेवून त्यानी आपले मत कळवावें.' सर्व सरकारातर्फे एकच उत्तर आले. 'तुम्ही अवश्य या. तुमच्या येण्याने आम्हाला फार मदत होईल.' चंबळच्या प्रदेशात प्रवेश करण्यापूर्वी आगरा मुक्कामी भारताचे गृहमंत्री पं. पंत व उ. प्र चे मुख्यमंत्री संपूर्णानंद विनोबाना भेटायला आले. त्यानी जाहीर सभेंत सांगितले की विनोबाच्या या यात्रेने प्रश्न सुटण्यास मदत होईल

आगऱ्याच्या जाहीर सभेंत विनोबानी आपली भूमिका मांडली. "लोक मला विचारतात तुम्ही आता डाकू-प्रदेशात जाणार का ? मी उत्तर देतो की मी डाकूच्या नव्हे, सज्जनाच्या प्रदेशात जात आहे. भिंड-मुरेनाचा प्रदेश हा हि इतर प्रदेशाप्रमाणे सज्जनाचाच प्रदेश आहे कोण डाकू आहे, आणि कोण नाही, हे देवाच्या घरीच ठरेल. जगात काही लोकाना डाकू म्हटलें जातें. पण तेच तेवढे डाकू आहेत असे नाही. डाकू तर दिल्ली व मुंबईतहि आहेत आणि ते प्रतिष्ठित म्हणून मिरवीतहि आहेत. कदाचित् देवाच्या दरबारात तेच अधिक गुन्हेगार ठरतील.......... मी कुठलाहि प्रश्न सोडवायला जात नाहीं. मी ईश्वराचा सेवक या नात्यानें सज्जनाच्या सेवेला जात आहें."

चंबळच्या खोऱ्यात प्रवेश करून विनोबानी सर्वांना आवाहन केले. "तुलसीदास म्हणतात—'सुमति कुमति सबके उर बसई" प्रत्येकाच्या

हृदयात चागली नी वाईट वृद्धि असते...... 'बिगडी जनम अनेक की सुधरत पल न लगे आध' .. .अनेक जन्माचे पापहि पश्चात्तापाच्या अग्नीने एका क्षणात दग्ध होऊन जातें. एखाद्या गुहेत दहा हजार वर्षापासूनचा अंधार असला तरी छोटीशी पणती नेल्यास एका क्षणात अंधार दूर होतो...... महाकवि वाल्मीकि हा कोण होता? डाकू वाटमाऱ्याच ना? ....महापापी हा महापुण्यवान् बनू शकतो. डाकूला साधु बनायला वेळ लागत नाही. जो मनापासून पश्चात्ताप करेल त्याला देव चटकन जवळ घेईल... ..जो क्रूरहि नाही आणि कायरहि नाही तोच खरा वीर "

विनोबाचा प्रेमाचा संदेश घेऊन जनरल यदुनाथसिंगाच्या नेतृत्वाखाली कार्यकर्त्यांच्या टोळ्या चंबळच्या दऱ्याखोऱ्यात गेल्या डाकूशी विनोबाची भेट करून देणे हे त्याचे काम. पुढे बाबा जाणे नी देव जाणे! एक दोन दिवसातच रामऔतारसिंह नावाचा डाकू शरण आला. विनोबाचे पाय धरून म्हणाला "बाबा, आजवर मी पापें केली. आता करणार नाही.' सात दिवसानी तीन डाकू आले 'बाबा, क्षमा करा आजवर केलेल्या अपराधाबद्दल पश्चात्ताप वाटतोय् आम्हाला!' चहूकडे गोंधळ, 'बागी आया'. डाकू स्वत ला 'बागी' बडखोर म्हणवतात. लोकहि त्याना त्याच नावाने ओळखतात. बागींना पहायला लोकाची गर्दी होऊ लागली विनोबा बागींना म्हणाले 'तुम्हीहि बागी नी मी पण बागी परतु माझी बडखोरी वेगळी आहे. गरीबी, विषमता, अन्याय नाहीसा करण्यासाठी म्हणून मी आजच्या समाजा-विरुद्ध बड पुकारलें आहे. तुम्ही असें काम कराल तर स्वतःचे नी जगाचे भले कराल." रोजच्या प्रवचनात विनोबा लोकाना सागत "सग्रह वाढला की चोरी वाढते. उदार मनानें दान देऊ लागा, भय सोडा, करुणा ठेवा म्हणजे डाकू आपोआप कमी होतील."

म. प्र. सरकार व पोलिसखातें त्याची या कामाकडे पाहण्याची दृष्टि सहानुभूतिपूर्ण व आदराची असल्यामुळें काम सुकर होत गेले विनोबा पोलि-सांच्या सभामध्यें म्हणाले 'पोलिसाचे काम फार कठिण. त्याना योग्यासारखेंच काम करावें लागतें. मृदुताहि राखावी लागते व प्रसगी कठोरहि बनावें लागते. माझे सारेच मित्र आहेत, पोलिसहि मित्र आहेत व डाकूहि मित्र आहेत."

त्याला भोगावेंच लागतें  तुम्ही केलेल्या वाईट कर्मांचे फळ तुम्ही इथें नाही भोगलें तर पुढच्या जन्मात भोगावें लागेल  तेव्हा आताच भोगून टाका नी मुक्त व्हा "

१९ मे हा दिवस चवळ खोऱ्यात सर्वांत महत्त्वाचा ठरला  लुक्का (लोक्मन) च्या नेतृत्वाखाली डाके घालणारी अकरालोकांची टोळी रात्रीच्या घनदाट काळोखात कनेरा गावी विनोबाकडे आली  पहाटे अडीचला विनोबा उठले अन् पाहतात तो सगळे डाकू त्याच्या सभावती बसलेले  प्रत्येकानें बाबाचे पाय धरले 'बाबा आम्ही आलो ' बाबा वीस मिनिटपर्यंत त्यांच्याशी एकांतात बोलले  यात्रा नेहमीपेक्षा उशीरा सुरु झाली  त्या दिवशींच्या यात्रेंत विनोबाचे नवे बागी मित्र सामील होते  त्यांपैकी सात जणाजवळ बंदूकाहि होत्या  सोबत पोलिस अधिकारीहि होते  बाबा बागी नी पोलिसाची ही विलक्षण पदयात्रा पहायला शेंकडो लोकाची गर्दी लोटली

सध्याकाळच्या सभेत विनोबा म्हणाले "परमेश्वराच्या कृपेनें इथें एक फार मोठें काम होऊन राहिले आहे  डाकू तुमच्या-आमच्यासारखीच माणसें आहेत, त्यांच्याहि हृदयात परमेश्वराची ज्योत तेवत आहे, आज आपल्या पूर्वकर्मांबद्दल जाहीर सभेंत पश्चात्ताप करून ते आपली हत्यारें आमच्या स्वाधीन करीत आहेत   परमेश्वरानें माणसाला तीन महान् देणग्या दिल्या आहेत, रामनाम घेण्याकरता वाणी, सेवा करण्याकरता हात नी प्रेम करण्याकरता सहानुभूतीनें भरलेलें हृदय  आपण सर्वांविषयी सहानुभूति बाळगावी ही त्याची इच्छा आहे"

एक बन्दुक दुर्बीण असलेली, १७ हजार रुपये किमतीची होती डाकू मारावलेल्या मनाने बोलले 'आजपासून आमचे नवे जीवन सुरू झाले '

नवजीवनाचे नवे संस्कार मिळावे म्हणून डाकूंना पोलिसांच्या ताब्यात देण्यापूर्वी दोनचार दिवस सत्संनिध्यात ठेवायचे जनरल साहेबांनी ठरवले. मध्यप्रदेश सरकारनेंहि संमति दिली ती यात्रा सर्वांनाच अपूर्व वाटली विनोबा-यात्रीदलातील सदस्यांसोबत जेवताना वागी बधु प्रथम बावरले 'साधूंचे अन्न आम्ही कसे खायचे ?' पक्तीत बसून जेवण्याचा त्यांच्या जीवनातला हा पहिलाच प्रसंग रानावनात, दऱ्यात नी गुंफात लपायचे, हातावर भाजीपोळी घेऊन खायचे, दूधाचा पेला घशात ओतायचा हेच त्यांचे आजवरचे जीवन होतें साधूंचे अन्न त्यांना गोड तर लागले पण दुधातुपाची उणीव मात्र भासली. त्यांचा सभ्य व शालीन व्यवहार पाहून यात्रीदलातल्या भगिनींना आश्चर्य वाटे लोक सांगत की हे डाकू बायकांवर हात टाकीत नाहीत, सहसा गरीबांना त्रास देत नाहीत, श्रीमंतांना लुटतात, किंवा ज्यांच्याशी त्यांचे वैर आहे त्यांना लुटतात

विनोबांचे सगळेंच काही त्यांना नवे वाटे विनोबा सांगत "दोष बदुकीचा नी सजा मात्र माणसाला मिळते माणसाच्या हाती शस्त्र असले म्हणजे तो रागाच्या भरात खून करतो ही असली शस्त्रेंच नाहीशी करावीत. शस्त्रांचे नागर बनवावे जग फार झपाट्याने या विचाराकडे येत आहे"

भिंड शहरात पोहोचताच गर्दी विलक्षण वाढली डाकू कसे असतात हे पहायला हजारो लोक जमले आजवर ज्यांच्या नावानें माणसे थरथर कापत, ते डाकू संतांच्या मागून शांतपणें पायी चालत आहेत, हे दृश्य पाहून हि लोकांचा त्यावर विश्वास बसेना पण अशक्याला शक्य करून दाखविण्याची किमया अहिंसेला माहित आहे अहिंसा म्हणजे आत्मशक्ति

सध्याकाळी शरण आलेल्या वीस डाकू बधूना सासरी ( जेलमध्ये ) पोहोचवण्याचा कार्यक्रम होता रात्री आठला प्रार्थना होते आणि विनोबा 'निद्रा समाधि स्थिति।' मध्यें जातात त्यापूर्वी निरोपाचा समारंभ झाला डाकू म्हणाले "बाबा कीर्तन करू का ?" बाबांनी होकार देताच 'रघुपति राघव राजाराम' चा गजर सुरू झाला सगळेजण त्यात रगले लुटालूट व कत्तली करणारे हे लोक रोज पूजा करतात, रामायण-पाठ करतात, तुळशीची

माळ गळयात घालतात कीर्तन संपलें आणि सगळे एकामागून एक पुढे येत बाबाचे पाय धरू लागले 'बाबा, आशीर्वाद द्या' विनोबानी आशीर्वाद देत म्हटले "सद्भावना ठेवा देवावर श्रद्धा ठेवा" डोळे पुसत प्रत्येकजण बाजूला होई यात्रीदलातील एक भगिनी त्याना कुकुमतिलक लावी दुसरी हातात राखी बाधी "आम्ही पापी अपराधी आणि तरीहि तुम्हा बहीणीनी भावानी आमच्यावर स्नेह-वर्षाव केला, त्याची आठवण कधीहि विसरणार नाही ! वाणी बघूना जास्त बोलवेना बाहेर पोलिसाची गाडी तयार होती सारे गाडीत जाऊन बसले जेलचे फाटक येताच उतरले विनोबाच्या सोबतच्या नव्या भाऊबहीणीचा अखेरचा निरोप घेत म्हणाले, "पत्र पाठवून बाबांच्या गोष्टी कळवीत जा म्हणजे जेलच्या जीवनात आधार मिळेल आम्हाला देवाच्या दयेनें कधी काळी जेलच्या बाहर येता आले तर आम्ही बाबाचेच काम करू !"

मध्यप्रदेशाच्या राज्यपालानी भिंडला येऊन विनोबाचे अभिनदन केलें. दिल्लीहून राष्ट्रपतीची अभिनदाची तार आली, 'तुमच्या कार्याकडे आज सारें राष्ट्र आशेच्या व आनदाच्या दृष्टीनें पाहत आहे ' देशोदेशीच्या वृत्तपत्रात अहिंसेच्या चमत्कारावर लेख लिहिले गेले बुद्धदेवानी अगुलीमाल राक्षसाचे परिवर्तन केलें त्याची अनेकाना आठवण झाली विनोबा म्हणाले—"येथें जे काही घडले, ती प्रभूची कृपा आहे तेव्हा १६ आणे श्रेय त्याचे आहे पण त्या श्रेयाची वाटणीच करायची झाली तर शरण आलेल्या डाकूकडे श्रेयाचा मोठा वाटा जाईल दुसरा नबर येईल पोलिसाचा त्यानी मनात आणले असते तर हं काम होऊ दिले नसतें तिसरे श्रेय आहे, दूरदूर जगलात जाऊन डाकूना भेटणाऱ्या कार्यकर्त्यांना आणि चौथें श्रेय मला आहे, अन् तें रुपयात एक नव्या पैश्याइतके तेंहि ईश्वरचरणी अर्पून मी मुक्त होऊन जात आहे'

'धर्मक्षेत्रे भिण्डक्षेत्रे समवेता युयुत्सव
पोलीसा डाकशश्चैव किमकुर्वत सजय'

असें म्हणत विनोबानी चवळ-यात्रा आरभ केली तेव्हा पुढें काय घडणार याची त्याना कल्पनाहि नव्हती जें काही घडले त्याला त्यानी 'अहिंसेचा साक्षात्कार' म्हटलें "मला असा सामूहिक साक्षात्कार तीनदा झाला आहे पहिला तेलगणात पोचमपल्लीला, दुसरा बिहारमध्ये आणि हा तिसरा"

* * *

## मैत्री : १० :

इग्रज इतिहासकारानी देवी अहिल्याबाई होळकर याचेविषयी लिहिले आहे की 'मराठ्यानी, एका सत महिलेच्या हाती राजसत्ता देण्याचा धाडसी नी यशस्वी प्रयोग करुन दाखवला ' अहिल्याबाईविषयी विनोबाना विलक्षण आदर आणि त्यामुळेंच इदूर नगराचेहि अधिक आकर्षण सान्या भारत-यात्रेंत 'रैन बसेरा कर ले डेरा, उठ चलना परभात रे' हा त्यांचा दिनक्रम. दहा-पाच लाखाचे मोठें शहर येवो की पाच-दहा झोपड्याचे लहान गाव येवो, विनोबाचा एक दिवसाचा मुक्काम ठरलेला क्वचित् कुठें सभासमेलनामुळे ते चार-दोन दिवस अधिक राहत पण इदुरात ते महिनाभर राहिले इदूर हे भारतातील एक मध्यवर्ती स्थान, महाराष्ट्र गुजरात व राजस्थानच्या सीमे-पासून जवळ असलेले, सस्कृति-सगमाचे, विनोबाच्या भाषेंत 'सौम्य नगर ' अहिल्याबाईच्या पुण्याईनें पावन झालेल्या या शहरातच अखिल भारतीय कस्तुरबा ट्रस्टनें आपले प्रधान केन्द्र कस्तुरबाग्राम वसविले आहे त्यामुळें शातीची शक्ति, अहिंसेची शक्ति निर्माण करण्यात इदूरच्या स्त्रियानी पुढाकार घ्यावा व स्त्री शक्तीचे मातृशक्तीचे मगल दर्शन जगाला घडवावें ही विनोबाची आकाक्षा

इदूरात घरोघरी सर्वोदय-पात्र स्थापित व्हावें, विश्वशातिकरता, अहिंसक क्रातिकरता हे मतदान आहे, असे समजून मातानी आपल्या बालका-कडून मूठभर धान्य नित्यनेमानें सर्वोदय पात्रात टाकावें शकराच्या पिंडीवर थेंब थेंब अभिषेक हृतो तसा सर्वोदय पात्रातहि न चुकता धान्य टाकावें

रुक्मीणीने एका तुळशीपत्राने श्रीकृष्णाला तराजूत तोलले त्याप्रमाणे भक्ति व विचारपूर्वक टाकलें गेलेले धान्य विश्वकल्याणकारी मंगल अहिंसक शक्ति निर्माण करेल विनोबांच्या आकांक्षेनुसार इंदूरच्या महिलांनी व पुरुषांनी शहरातील दहा हजार घरात सर्वोदय-पात्रें स्थापन केली

अंतर्बाह्य शुचिता, स्वच्छता हें आध्यात्मिक जीवनाचें अधिष्ठान आहे बाह्य स्वच्छतेकरता 'स्वच्छ इंदूर सप्ताह' चालवून विनोबांसोबत इंदूरच्या शेंकडों नागरिकांनीं नगर स्वच्छ करण्याच्या कामात भाग घेतला महाराष्ट्रातील अप्पासाहब पटवर्धन यांनी भंगीमुक्तीच्या वैज्ञानिक प्रक्रीयेचे नागरिकांना दर्शन घडवलें प्रत्येक मुट्टयात प्रार्थना व स्वाध्याय याचा नित्यक्रम सुरू व्हावा म्हणजे आतरिक शुचितेला सहाय्य होईल असेहि विनोबांनी सुचवले

नगराशी विनोबांचा परिचय कमीच त्यामुळे इंदूरात रोज पहाटें हिंडताना त्यांनी प्रथमच सिनेमाची पोस्टर्स पाहिली अशी पोस्टर्स पाहून लहान मुलांवर किती वाईट सस्कार होत असतील या कल्पनेनें त्यांना दु ख झालें व त्याविषयी त्यांनी तीव्र शब्दात निषेध प्रकट केला शहरातील सर्व समजस नागरिकांचा व विशेषत महिलांचा या कामाला एकदम पाठिंबा मिळाला व पोस्टर आंदोलनाला सुरवात झाली शहरातील सर्वमान्य प्रतिष्ठित नागरिकांची एक समिति नेमून कोणतें पोस्टर अशोभनीय आहे हें ठरविण्याचे काम त्यांच्याकडे सोपवलें समितीच्या निर्णयानुसार जें पोस्टर अयोग्य ठरेल, तें काढून टाकण्याविषयी सबधित व्यक्तीशी चर्चा करायची व समजावून सागण्याचे सर्व प्रयत्न थकल्यावर सत्याग्रह करायचा असें ठरविले गेले

स्थानिक स्वराज्य सस्थामध्यें पक्षीय राजकारण घुसले म्हणजे त्या सस्थाद्वारें जनतेचा लाभ होण्याऐवजी नुकसान होतें म्हणून त्यांचा कारभार पक्षमुक्त भूमिकेवरून चालावा स्थानिक प्रश्न सोडविण्याच्या कामात सर्वांनी एकजुटीने सहयोग करावा, अशी विनोबांनी इंदोर नगरनिगमच्या सदस्यांना सूचना केली तसेच नगरनिगमचा कारभार टॅक्स बसवून नव्हे तर दानाच्या प्रक्रियेनं चालविण्याचा प्रयोग करावा असंहि सुचवलें स्वातत्र्यानतर जनता अधिकाधिक सरकाराभिमुख बनत चालली आहे प्रत्येक काम सरकारनें करावें असें म्हणून स्वत निष्क्रीय बनत चालली आहे लोकशाहीच्या विकासाच्या

ही अत्यंत घातक गोष्ट आहे. जागृत, सक्रिय व स्वतंत्र जनतेवर लोकशाही टिकू शकते. आजच्या मंत्र्याच्या हातीं जी सत्ता केंद्रित झाली आहे, ती पूर्वीच्या मोठमोठ्या बादशाहांच्या हातीं देखील नव्हती. औरंगजेबाचा हुकूम आसामपर्यंत पोहोंचायलाच चार महीने लागत. आज काही मिनिटांच्या आंत एक हुकूम साऱ्या देशभर पोहोचतो. अशा स्थितींत जनतेनें आपलीं अधिकाधिक कामें आपल्या अभिक्रमानें व आपल्या शक्तीनें करावयास सुरवात केली तरच लोकशाही व स्वातंत्र्य टिकेल.

इंदूर सर्वोदय नगर व्हावें यासाठी तेथें एका नवीन आश्रमाची—विसर्जन आश्रम—स्थापना १९६० च्या स्वातंत्र्यदिनाच्या सुमुहूर्तावर झाली. विसर्जन म्हणजे जुन्या मूल्यांचे विसर्जन व नव्या मूल्यांचे विशेष सर्जन असे विनोबांनी सांगितले. इंदूरातील सर्वोदय-कार्य चालविण्याकरता तीन सदस्यांची एक 'शून्य समिति' स्थापन केली. आपल्या कार्यकर्त्यांनी शून्यवत् निरहंकारी बनून काम करावें, स्थानिक लोकांनी एकाच्या आकड्याची भूमिका घ्यावी व सर्वोदय कार्यकर्त्यांनी त्यांच्यामागे शून्याप्रमाणें उभें राहून त्यांची शक्ति वाढवावी, असे विनोबा नेहमी सांगत.

प्राचीन आश्रमव्यवस्थेनें समाजाला व व्यक्तीला विकासाची सर्वोत्तम संधि मिळे. ब्रह्मचर्याश्रमांत गुरुगृही राहून अध्ययन केल्यानंतर गृहस्थाश्रम व गृहस्थाश्रमानंतर संसाराच्या जबाबदारीचा मुलांवर सोपवून वानप्रस्थ बनून समाजसेवा आणि जीवनांतीं ईश्वरचिंतनांत लीन होण्याकरतां संन्यास अशी ही फार सुंदर योजना होती. ही आश्रम-व्यवस्था मोडली आणि जीवनांतहि विस्कळितपणा आला. आश्रमव्यवस्थेची पुनःस्थापना करावी, काही दिवस गृहस्थाश्रम केल्यानंतर व्यक्तींनी वानप्रस्थ बनावें म्हणजे समाजाला उत्तम सेवक मिळतील अशा कल्पनेनें विनोबांनी इंदूरांत 'वानप्रस्थ मंडळा' ची स्थापना केली. रिटायर (सेवानिवृत्त) झालेल्या लोकांना ते म्हणत 'तुम्हाला री-टायर करायचें आहे, पुन्हा कामाला लावायचें आहे, तुमच्या ज्ञानाचा व अनुभवाचा लाभ समाजाला मिळायला हवा.'

इंदूरातील सर्व व्यवसायांच्या लोकांशी हितगुज करून विनोबांनी त्यांना आपापला स्वधर्म सांगितला. व्यापाऱ्यांनी करुणामूलक क्रांतीच्या सर्वोदय-कार्यांत सहकार्य करावें, शिक्षक, विद्यार्थ्यांनी बुद्धीची गुलामगिरी कधीहि

देत विनोबानी बिहारला पुन्हा जागविले 'बीघेमें कट्ठा, दान दो इकट्ठा' चा नवा मत्र दिला प्रत्येक माणसाने एक बिघ्यामागे एक कट्ठा म्हणजे विसावा भाग द्यावा व उत्तम जमीनीचा भाग द्यावा, प्रत्येक खेड्यातील लोकानी सामूहिक रूपाने अशा रीतीनें जमीन देऊन भूमिहीनता नाहीशी करावी जमीन वाटपाचे काम आजवर भूदान कार्यकर्ते करीत पण कार्यकर्त्यांच्या अल्प सख्येमुळे बिहारात बरीच जमीन वाटायची राहिली होती यापुढें दात्याने स्वत च आपल्या गावच्या भूमिहीनाला जमीन वाटावी असेहि त्यानी सागितले

बिहारमधील बोधगयेच, समन्वयाश्रम, मुगेरचा खादीग्राम आश्रम, व पूर्णिया जिल्ह्यातील रानीपतरा या आश्रमाना भेटी देत भूदान प्राप्त करीत व वाटीत, विनोबा पश्चिम बगालातील हिमालयाच्या पायथ्याशी असलेल्या सिलीगुडीला पोहोचले हिमशिखराचे दर्शन घेत चहाच्या मळ्यातून यात्रा करीत १९६१ च्या पाच मार्चला त्यानी आसामात प्रवेश केला

प्राचीन प्राग्ज्योतिषपुर किंवा कामरूप म्हणजे आजचा आसाम भारताच्या या पूर्व प्रदेशात सूर्य सर्वांत आधी उगवतो नी पाऊस सर्वांत जास्त पडतो ओसरत्या काळोखासोबत विनोबा चालू लागत अन् काही वेळाने ऊन तापायला लागलें म्हणून घड्याळ पहावे तो अवघे पाच साडेपाच वाजलेले आढळायचे पावसाला तर तिथें वेळकाळ माहितच नाही डोळ्याना सुखविणारी आसामची हिरवीगार सृष्टि सागते की, पावसाला सारे ऋतु सारखेच प्रिय वाटतात आसामच्या नैऋत्येकडील चेरापुजी येथें जगात सर्वांत जास्त पाऊस पडतो तिबेटातून येणारी व पूर्व पाकिस्तानात जाणारी ब्रह्मपुत्रा नदी आसामला उत्तम पीकहि देते व पुराच्या पाण्यानें नुकसानहि करते विनोबाना ब्रह्मपुत्रा फार आवडे 'ही आतरराष्ट्रीय नदी आहे तिन्ही देशाना जोडते व माणसानाहि एकत्र येण्याचा सदेश देते' गोहत्तीला ब्रह्मपुत्रेच्या तीरावरील एका टेकडीवरचे कामाख्या देवीचे मदिर पुरातन काळापासून तत्रविद्येचे केंद्रस्थान मानले जाई कामरूपात आलेल्या बाहेरच्या माणसाना कामाख्यादेवी परत जाऊ देत नाही, अशी एक आख्यायिका आहे विनोबानाहि तिनें पुरेपूर दीड वर्ष अडकवून ठेवले होतें ब्रह्मदेशाकडून झालेल्या थायलडच्या आक्रमणामुळें आसामवर अनेक वर्षे थायलडच्या अहम

राजाचे राज्य होतें. सर्व परदेशी आक्रमकाना आपलें रूप देण्याची भरतभूमीची कला इथेंहि प्रकट झाली अहम लोकानी वैष्णवधर्म स्वीकारला व ते स्थानिक जनतेंत मिसळून गेले

विनोबा आसामात पोहोचले तेव्हा भाषिक दंगे थावले होते पण बंगाली व आसामी लोकाच्या मनातील कटुता कायम होती विनोबानी ग्रामदानाचा, प्रेमाने एकत्र येण्याचा कार्यक्रम माडून भाषिक प्रश्नाला कुशलतेने हाताळले. 'तुम्ही इथें कुणाकरता आला आहात' असा प्रश्न जेव्हा त्याना विचारला जाई तेव्हा त्याना ते म्हणत 'मी आपल्या ग्रामदानाच्या कामाकरता आलो आहे' आसामी व बंगाली लोकाची तुटलेली मनें जुळवणें हें एक आनुषंगिक कार्य झाले आसामी लोक सौम्य शात स्वभावाचे व सुपीक जमीनीमुळें आळशी व अल्पसंतुष्ट आसामात बंगाली लोकाचे प्रमाण बरेंच जास्त पाकिस्तानातून आलेल्या निर्वासितामुळें तें आणखीच वाढलेले शिक्षणात पुढारलेले असल्यामुळें बंगाली लोकानी आजवर अनेक महत्त्वाच्या जागा व्यापलेल्या होत्या आसामचा सारा व्यापार मारवाडी लोकाच्या हातीं व चहाच्या मळ्यातील मजूर बाहेरच्या बिहार ओरिसा वगैरे प्रातातील. मुसलमानाची संख्या जवळ जवळ निम्यापर्यंत पोहोचलेली. आदिवासीच्या अनेक जाती आसामचा सर्व डोंगराळ प्रदेश हजारो वर्षे व्यापून आहेत नाग लोकानी तर एक तुकडा तोडून आपले स्वतंत्र राज्य स्थापन केलेंच आहे कामेंग, सुवर्णश्री, सिआंग, लोहित, टिरप या पाच डिवीजन्सचा उत्तरेकडील नेफा प्रदेश भारत सरकारच्या प्रशासनाखाली आहे तिथें कुणालाहि परमिटशिवाय प्रवेश नाही खासी, जेंतीया, गारो, लुशाई, कछारी वगैरे सर्व आदिवासी रोमन लिपीत आपापली भाषा शिकतात म्हणजे खुद्द आसामात आसामी भाषा बोलणारे लोक अल्पसंख्य आहेत. आसामात आसामी भाषेचेच प्रभुत्व चालावे ही त्याची इच्छा आहे व त्यातूनच भाषिक दंगे उद्भवले १९६० च्या जुलैंत बंगाली लोकाची घरें जाळणें, त्याना बाहेर हुसकावून लावणें वगैरे दुखद प्रकार घडले यात शहरातील लोकानी व विशेषत विद्यार्थ्यांनी पुढाकार घेतला खेड्यातील लोक कित्येक ठिकाणी आपल्या बंगाली शेजाऱ्याना वाचवण्याकरता धावले.

आसामात विनोबा येण्यापूर्वी हि काही ग्रामदाने झाली होती विनोबा लोकाना सागत "ग्रामदान हा सामूहिक उत्थानाचा कार्यक्रम आहे पूर्वी सहभजनाचा कार्यक्रम चाले त्यासोबत सहभोजनच नव्हे तर सहजीवन हवे आहे या विज्ञानयुगात लहान कुटुंबें व लहान देश टिकणार नाहीत विज्ञान आपल्याला व्यापक व्हायला सागते तेव्हा आता आपण सबध खेड्याचे कुटुब, गावचे गोकुळ करू या व देशाना एकत्र आणून विश्वराज्य स्थापू या ग्रामस्वराज्य व विश्वराज्य ही आमची दोन उद्दिष्टें आहेत दोन बिंदूंची रेघ बनते *आतापर्यंत आपण म्हणत असू की 'ही माझी जमीन, हे माझें घर, हे माझें कुटुब' आता यापुढे 'माझें' म्हणायचे नाही, 'आपलें सर्वांचे' म्हणायचे* 'मी' ची भाषा आता चालायची नाही विज्ञान आणि आत्मज्ञान या दोहोंचे 'मी व माझें' यावर जोरदार प्रहार होताहेत माणसाला सुख हवें असते व दुःख नको असते दोहोंचीहि एकच युक्ति आहे—वाटून द्या, *सुख वाटलें म्हणजे वाढते व दुःख वाटलें म्हणजे कमी होतें* माणसाला खाण्यात जेवढा आनद होतो त्यापेक्षा खाऊ घालण्यात जास्त होतो स्वत उपाशी राहून दुसऱ्याला खाऊ घालणें, दुसऱ्याची सेवा करणें या गोष्टी जनावरात आढळत नाहीत जे आपल्याच सुखदुःखाकडे लक्ष देतात, आपल्या सुखानें सुखी व आपल्या दुःखाने दुःखी होतात त्याना मी जनावर म्हणतो व जे दुसऱ्याच्या सुखदुःखाकडे लक्ष देतात, दुसऱ्याच्या सुखाने सुखी व दुःखाने दुःखी होतात त्याना मी माणस म्हणतो "

आसामात पाचशे वर्षांपूर्वी शकरदेव नावाचे महान् सत्पुरुष होऊन गेले त्यानी वैष्णव धर्माचा प्रचार केला व 'एकशरणीया' पथ स्थापन केला माधवदेव हे त्याचे पट्टशिष्य शकरदेव माधवदेव या दोघाचें आसामच्या हृदयावर आजहि राज्य चालते कीर्तनघोषा, नामघोषा हे त्याचे ग्रंथ अतिशय लोकप्रिय आहेत त्या दोघानी नामसकीर्तनावर विशेष भर दिला आसामात प्रत्येक खेड्यात 'नामघर' असते गावचे सर्व लोक तेथें एकत्र जमतात व नामसकीर्तन करतात हे लोक मूर्तिपूजा मानत नाहीत त्यामुळें नामघरात मूर्ति नसते कृष्ण हे त्याचे आराध्य दैवत 'चला रे चला, आपण वृंदावनात जाऊ, कृष्णलीला पाहू' अशा आशयाची शेकडा गीतें लोकाच्या मुखात घोळत असतात विनोबानी आसाम यात्रेत

शकरदेव व माधवदेव याच्या ग्रथाचे सखोल अध्ययन करून 'नामघोषा-सार' हा ग्रथ प्रकाशित केला. मूळ नामघोषा या ग्रथातील निवडक साररूप अश घेऊन त्याचे वर्गीकरण करून आसामला सर्वोत्तम देणगी दिली. ज्ञानदेव, एकनाथ, रामदास, तुकाराम इत्यादि सताच्या भजनाचेहि असेच सार त्यानी मराठी जनतेला दिले आहे 'नामघोषा-सार' चा आसामच्या मनावर खोल आध्यात्मिक परिणाम झाला. विनोबा रोजच्या प्रवचनात शकरदेव व माधवदेवाची वचनें सागून ग्रामदानाचा विचार सागत. ते नेहमी म्हणतात "मी नवे असे काहीच सागत नाही जुन्या सतानी जें सागून ठेवले आहे त्यावर फक्त भाष्य करतो. त्याचा युगानुकूल असा अर्थ सागतो " आसामचे नामघर विनोबाना फार आवडे पण त्यासोबत 'कामघर' हि हवे. सर्व लोकानी मिळून काम करावें व वाटून खायला शिकावे असे ते सागत. "वैष्णव लोक विष्णूला सर्व सृष्टीचा स्वामी मानतात. तेव्हा जो स्वत ला जमीनीचा मालक म्हणवेल तो अवैष्णव ठरेल जमीनीची व्यक्तिगत मालकी नाहीशी करून ग्रामदान करणें हे प्रत्येक वैष्णवाचे कर्तव्य आहे "

पाकिस्तानातून बेकायदेशीर मार्गानें येणाऱ्याचा प्रश्न हा आसामचा एक ज्वलत प्रश्न आहे पूर्व पाकिस्तानात लोकसख्या फार व जमीन कमी आणि त्या मानाने आसामात जमीन बरीच अधिक आहे. पूर्व पाकिस्तानचे मुसलमान लोक आसामात येऊन मजूरी करतात व पैसे मिळवून जमीन खरेदी करून राहतात. अशाची सख्या सारखी वाढते आहे विनोबा म्हणाले की "या प्रश्नावर ग्रामदान हाच एक सोपा उपाय आहे ग्रामदान झाले म्हणजें जमीन ग्रामसभेच्या मालकीची होईल कुणालाहि जमीन विकता येणार नाही की विकत घेता येणार नाही मग जमीनीच्या लोभानें येणाऱ्या बाहेरच्या लोकाना सहजच आळा बसेल ग्रामदानानतर ग्रामसमाज बनेल, सर्व लोक परस्पराची काळजी करू लागतील. जर आपल्या गावात बाहेरून कोणी आला तर चटकन् लक्षात येईल " आज आसामचे नागरिक कोणते व बाहेरून आलेले कोणते हे ठरविणें फार कठिण होऊन बसलें आहे व त्यामुळें दोन देशात तेढहि वाढते आहे

आसामचे वातावरण ग्रामदान-ग्रामस्वराज्याला अधिक अनुकूल आहे-लोक साधारण खाऊन पिऊन सुखी आहेत फारशी विषमता नाही, फार

गरीबीहि नाही. लोकांत परस्पर सहकार्य करण्याची प्रवृत्ति अजूनहि कायम आहे. बाहेरच्या वाईट गोष्टींचा अजून फारसा प्रभाव नाही. लोक बहुतेक सर्व गरजांच्या बाबतीत स्वावलंबी आहेत. घरोघर विणाई चालते. रेशमी किडे पाळण्यापासून तो कपडा तयार करण्यापर्यंतच्या सर्व क्रिया घरातच चालतात. आजकाल सुती कपडा बाहेरून येऊ लागला आहे तरीहि सूत घेऊन घरी विणाई करण्याचा प्रघात चालू आहे. जंगल भरपूर. इकडची घरे लाकडाची व बांबूची असतात. शेतकरी दिवसभरात आपले घर उभारतो. "प्रत्येक खेड्यानें आपापले प्रश्न स्वत: सोडवून आपल्या खेड्याच्या विकासाकरता योजना तयार करावी व ती अमलात आणण्याकरता एक होऊन कामाला लागावें. खेडें स्वावलंबी, स्वयपूर्ण व एकरस झाले म्हणजे अभेद्य किल्ल्याप्रमाणें बनेल. देशाच्या संरक्षणाकरता ग्रामदान आवश्यक आहे. ग्रामदानाला मी 'डिफेन्स मेझर' (संरक्षण योजना) म्हणतो. आसामांत तर त्याची विशेषच गरज आहे खेड्यामध्यें परस्पर प्रेम, सहकार्य नसेल, आपापसांत भांडणें, मनोमालिन्य द्वेष राहील, गरीबांची अशीच उपेक्षा होत राहील तर देशाचे स्वातंत्र्य धोक्यात येईल." असा इशारा विनोबा नेहमी देत

— आसामच्या यात्रेतील महत्त्वाची घटना 'मैत्री आश्रमा' ची स्थापना ही आहे. चीन व भारताच्या सीमेजवळील हा भाग आंतरराष्ट्रीय दृष्टीने महत्त्वाचा केन्द्रबिंदू आहे, असे विनोबा १९६१ च्या जानेवारी पासून सारखे सांगू लागले. "विज्ञानाच्या प्रगतीमुळें पूर्वीच्या तोडणाऱ्या गोष्टीहि आता एकमेकांना जोडू लागल्या आहेत. समुद्र व हिमालय हे आजवर देशांना एकमेकांपासून दूर राखत पण आता प्रशांत महासागराच्या दोन तीरावरील जपान आणि अमेरिका आणि हिमालयाच्या अलीकडील नी पलीकडील भारत व चीन कायमचे शेजारी बनले आहेत. काळाच्या अंतापर्यंत त्यांना शेजारी म्हणून रहायचे आहे. चीन-भारताचा हा असा प्रथम संपर्क घडतो आहे प्रथम संपर्क हा आरंभी कधी कधी संघर्षाचेंहि रूप घेऊन येतो. पण आम्ही लक्षात ठेवले पाहिजे की या संपर्कांतून मधुर संबंध निर्माण झाले तर विश्वशांति स्थापित होईल व कटुता निर्माण झाल्यास विश्व-विनाश ओढवेल. विज्ञानामुळें माणसाचे बाह्य जीवन बदललें आहे पण आंतील चिंतन मात्र अजून पूर्वीचेच कायम आहे इंग्लंड नावाचा एक देश आहे, याची अशवर

-बादशाहाला कल्पना देखील नव्हती आणि आज शाळकरी पोराना साऱ्या जगाची माहिती असते या प्रमाणें बुद्धि व्यापक होत चालली आहे पण हृदय अजून पूर्वीसारखेच संकुचित आहे. व्यापक बुद्धि व संकुचित मनाच्या या संघर्षात सारें जग होरपळून निघेल की काय अशी भीति निर्माण झाली आहे तेव्हा आपल्याला आता हृदयहि व्यापक करायला हवें, विश्वमानव विश्वनागरिक बनायला हवे

दोन देशाच्या सीमेवर देशरक्षणाकरता दोन्ही देशाच्या फौजा ठेवण्याचा जुन्या जगाचा प्रघात आजहि कायम आहे विनोबानी नव्या युगाला अनुरूप असे पाऊल उचलले आणि चीन–भारत सीमेवरील नेफाच्या सुवन्सरी डिवीजनजवळ उत्तर लखीमपुर शहरात हिमालय–पुनाच्या छायेत ५ मार्च १९६१ रोजी मैत्री आश्रमाची स्थापना केली 'या आश्रमाचा उद्देश मैत्री, नियम मैत्री व कार्यक्रमहि मैत्री, हा राहील' असे सागून आश्रमामागील भूमिका स्पष्ट केली–"सीमेवर गुडविल मिशनचे काम व्हावे, स्नेहभाव निर्माण व्हावा, भारताच्या भावनात्मक एकीकरणाचे काम व्हावे, आसपासच्या ग्रामदानी गावाच्या क्षेत्राशी संपर्क रहावा व स्त्री-शक्तीचा विकास व्हावा म्हणून हा आश्रम स्थापला आहे हा स्त्रियाचा आश्रम आहे" आसामात स्त्रीशक्ति जागृत दिसते आसामातील सर्वोदय कार्याचे नेतृत्व अमलप्रभा दास याचेकडे आहे त्याच्याजवळ त्यागी निष्ठावान भगिनीची एक सेना आहे यापुढें अहिंसेच्या क्षेत्रात पराक्रम करायचा आहे व त्यात स्त्रिया स्वाभाविकच पुढाकार घेऊ शकतील ही अपेक्षा आहे भारतातल्या भिन्न भिन्न प्रांताच्या भगिनींनी मैत्री आश्रमात एकत्र राहून मैत्रीची सामूहिक साधना करावी, परस्पराच्या भाषा शिकाव्या, सर्व भाषातील सर्वोत्तम ग्रथाचे सर्व भारतीय भाषात भाषातर करावे व जीवनाद्वारे मैत्रीचे वातावरण निर्माण करावे अशी कल्पना आहे आसामच्या यात्रेत तेथील कार्यकर्त्या भगिनींना 'गीताई' द्वारे मराठी भाषा शिकवून विनोबानी स्वत भावनात्मक एकीकरणाच्या कार्यास प्रारभ केला व पदयात्रेंत अनेक वर्षे राहून त्याचे विचार अक्षरबद्ध करणारी त्याची मानसकन्या कुसुम देशपाडे हिला त्यानी मैत्री आश्रमात ठेवले उत्तर लखीमपुर जिल्ह्यात बरीच ग्रामदानें झाली होती व सघन कार्याची योजना तयार करण्याचे काम चालले होते. इकडे ग्रामदानाद्वारें

करणामूलक शांतीचा विचार प्रतिष्ठित करण्याचे काम चालू होतें तर सीमेपलीकडील चीनमध्यें मत्सरमूलक शांति होऊन चुकली होती व त्याची कडूगोड फळें चाखायलाहि मिळाली होती. दोन देशाच्या वैचारिक संघर्षात आसामला फार मोठे काम करुन दाखवायचे होतें. मैत्री आश्रमाच्या जवळ भारतीय सैन्याची छावणी व विमानतळ होता. काश्मीरात जनरल यदुनाथसिंग यांनी शांति-सैनिक बनून चंबळच्या खोऱ्यांतील डाकूंना प्रेमाचा संदेश देऊन, सैन्यासमोर एक आदर्श ठेवला होताच. 'निर्भय व निर्वैर असून व हातीं शस्त्र घेऊन लढतात ते वीर व निर्भय निर्वैर असून शस्त्र न घेता लढतात ते महावीर. वीर हा फार लवकर महावीर होऊ शकतो' असें विनोबा नेहमी सांगत. विश्वमैत्रीकरता जवळील विमानतळ उपयोगी पडेल अशी विनोबांची वैज्ञानिक दृष्टि होती. 'मैत्री आश्रमा' ची स्थापना करुन विनोबांनी चीन–भारत प्रश्नाच्या मूलभूत स्वरूपाकडे सर्वांचे लक्ष वेधलें.

गोहत्ती नगरातील महिला-समेच्या भगिनींनी विनोबांच्या सल्ल्यानुसार 'महिला लोकसेवक संघा' ची स्थापना करुन नवा उपक्रम सुरू केला. विनोबा त्यांना म्हणाले की "स्वराज्यानंतर कांग्रेसचे विसर्जन करुन लोकसेवक-संघाची स्थापना करण्याचा गांधीजींचा सल्ला कांग्रेसनें मानला असता तर देशात सेवा-संस्था बलशाली झाली असती व सत्ता-संस्थेवर तिचा प्रभाव पडला असता. ज्ञानी ऋषींच्या सल्ल्याने राज्यकारभार चालविण्याची प्राचीन भारतीय परंपरा नव्या आशयासकट पुनरुज्जीवित झाली असती. पण कांग्रेसनें गांधीजींचा सल्ला मानला नाही त्यामुळे कांग्रेस हा एक केवळ राजकीय पक्ष बनला आणि देशात सत्तेचे राजकारण सुरू झाले. आता महिलांनी गांधीजींच्या आदेशानुसार पुढचे पाऊल उचलून लोकसेवक-संघ स्थापित करावा. सर्व महिलांनी पक्षमुक्त होऊन सेवाकार्यास लागावें, व पुरुष भांडत राहतील तर त्यांना लगाम घालण्याचे काम करावे. आजवर पुरुषांच्या हाती जगाचा कारभार राहिला तर त्यातून दोन विश्वयुद्धें निर्माण झाली व तिसऱ्याची तयारी चालली आहे. तेव्हां आतां स्त्रियांनी आपल्या हाती कारभार घेऊन जगाला शांतीचा मार्ग दाखवावा. . . . महिला लोकसेवक संघानें आपली वैचारिक भूमिका नीट लक्षात घ्यावी. माणसा-माणसात भेद निर्माण करणाऱ्या, एकमेकापासून तोडणाऱ्या सर्व भेदाच्या भिंतीवर



नावेंत बसून शरयू नदी ओलांडताना



कन्याकुमारीला सागराच्या सान्निध्यात शिळेवर बसून, भारतात ग्रामस्वराज्याची स्थापना होईपर्यंत अखंड पदयात्रा चालू ठेवण्याची प्रतिज्ञा करीत असताना

प्रहार करून त्याना तोडण्याचे, म्हणजेच जगाला जोडण्याचे काम आपल्याला करायचे आहे पॉवर पॉलिटिक्स (पक्षीय राजकारण) मुळे देशाचे फार नुकसान होतें आहे म्हणून आपल्याला तें खतम करून लोकनीतीची स्थापना करायची आहे "

विनोबा जियें जातात तियें नद्याहि त्याच्या मागोमाग वेगानें धावू लागतात विहारमध्ये विनोबाच्या विचारसरितेसोबत सर्व नद्याना पूर आला काश्मीरात तर विनोबा जलप्रलयच घेऊन गेले कुराणात 'तूफाने-नूह' ची कहाणी आहे नूह नावाचा परमेश्वराचा एक प्रेषित होता. त्याचा संदेश लोकानी ऐकला नाही म्हणून परमेश्वरानें जलप्रलय घडवून आणला त्याचा उल्लेख करून विनोबा म्हणत "नूह की तूफानें-नूह यापैकी काय हवे आहे तुम्हाला ? प्रेमानें एक व्हा नाहीतर देव प्रलय पाठवील " आसामात ब्रह्मपुत्रा व तिच्या उपनद्या धुमाकूळ घालत असताना विनोबा लोकाना सांगत 'ग्रामदानालाहि असाच पूर येऊ द्या नद्याचे पूर पाठवून ईश्वर आपली परीक्षा घेतो आहे संकटात देव आठवतो म्हणून कुंतीनें देवाजवळ वर मागितला की मला नेहमी संकटें दे नदीला भेदभाव माहीत नाही ती सर्वांचें सारखेंच नुकसान करते व आपल्याला भेदभाव विसरून प्रेमानें एक होण्याचा, करुणा व सहकार्याच्या पायावर नवा समाज उभारण्याचा संदेश देते जनतेनें पुरुषार्थी बनावें हसत हसत संकटाचा मुकाबला करायला शिकावें म्हणून देव अशा आपत्ति निर्माण करतो ' काही खेड्यात गमतीदार घटना घडल्या विनोबाचें न ऐकता जमीनीची मालकी घट्ट पकडून ठेवणाऱ्याची जमीनच ब्रह्मपुत्रेनें वाहून नेली अन् मग त्याना हळहळ वाटली, 'अरेरे, साधुबाबाचें ऐकलें असतें तर किती बरें झाले असतें ' विहारमध्यें काही कांही ठिकाणी नेमके याच्या उलट घडले काही दात्यानी पडित जमीन दान दिली तिचें वाटप झाले अन् लगेच पूर आला पुराबरोबर आलेल्या गाळामुळें ती पडित जमीन चागली झाली आणि ज्याना मिळाली त्या गरीबाच्या शेतात भरघोस पिकें उभी राहिली.

आसाम प्रादेशिक काँग्रेस कमीटीनें ग्रामदानाचे कार्य करण्याचा ठराव पास केला "स्वराज्यापूर्वीच्या जुन्या पुण्याईवर तुम्ही किती दिवस

जगणार ? स्वराज्यानंतर सत्ता हातीं घेतल्यामुळें तुमचा पुण्यक्षयाचा कार्य-क्रम सुरु झाला आहे 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकम् विशन्ति' तेव्हा आता ग्रामदानाचे काम हातीं घेऊन गावोगाव हिंडाल, सेवा कराल तर तुमचीहि प्रतिष्ठा वाढेल" विरोधी पक्षाच्या लोकाना विनोबा आवाहन करीत की कुस्ती खेळायची असेल तर आधी काही व्यायाम नको का करायला ? जनतेची सेवा करा, दुःखी लोकाची दुःखे दूर करा म्हणजे तुम्ही सत्ताधारी पक्षाशी कुस्ती खेळायला समर्थ व्हाल" राजकीय पक्ष ठराव करीत, पत्रके काढत पण पत्रकानी का कुठें काम होते ? विनोबा म्हणत एक पत्रक दुसऱ्या पत्रकाना जन्म देते काही व्यक्तींच्या हृदयाना विनोबा-विचार स्पर्श करी आणि त्याना चालवी आसामच्या असेंब्लीचे स्पीकर यातीलच एक होते ग्राम-दानाचा विचार सागत ते खेडोपाडी हिंडू लागले पण विनोबाचे एवढयाने समाधान कुठून होणार! 'तुमचे स्वतःचे गाव ग्रामदान झाले पाहिजे' विनोबानी त्यांच्या मागे लकडा लावला त्यांचे 'नगाव' हे १०० वस्तीचे मोठे गाव व त्यात अनेक प्रश्न ! पण ऋषींनी सागितले आहे, 'आत्मा सत्यकाम सत्य सकल्प' सत्य कामना, सत्य सकल्प सुफलित करण्याची शक्ति आत्म्यात आहे माणसाला त्याचे भान नसतें म्हणून त्याला वाटतें की आपण दुबळें आहोत नगावचे ग्रामदान झाले तेव्हा विनोबा सोडून इतर सर्वांना भलतेंच आश्चर्य वाटले

माधवदेवाच्या एका भजनाचा विनोबा वारवार उल्लेख करीत त्यात म्हटले आहे की 'दुसऱ्याचे दोष पाहणारा अधम पुरुष, गुणदोष दोन्हीहि पाहणारा मध्यम पुरुष, गुणच पाहणारा उत्तम पुरुष व दुसऱ्याच्या थोडयाशा गुणाचा विस्तार करून पाहणारा उत्तमोत्तम पुरुष असतो' विनोबा कार्यकर्त्यांना नेहमीं सागत की माणसातील दोष म्हणजे भित नी गुण म्हणजे दरवाजा आहे दरवाज्यातून प्रवेश केला म्हणजे कुठल्याहि घरात सहज शिरता येतें भिंतीकडून प्रवेश करण्याच्या प्रयत्नात आपलेंच डोकें आपटले जाते 'ईश्वरानें त्रिगुणात्मक सृष्टि निर्माण केली आहे, आणि तुम्ही रज-तमाला नाहीसे करू इच्छिता' असे विनोबाना लोक म्हणत तेव्हा विनोबा सागत की प्रभूची सृष्टि आहे तशीच राहणार रजोगुण व तमोगुण नाहीसे व्हावे असे मी म्हणत नाही तिन्ही गुणाची माणसाला गरज आहे मी फक्त एवढेंच

सांगतो की सत्त्वगुणाचे रूळ असावेत व रूळ नेतील तिकडे रजोगुणाच्या इंजिनानें तमोगुणाच्या डब्यासकट जावे.

उत्तर प्रदेशातले तुलसीदास असोत, तमिळनाडचे भारतीयार असोत, गुजरातचे नरसी मेहता असोत की आसामचे माधवदेव असोत, सर्वांची अनुभूति सारखीच आहे. भारतभूमीच्या गौरवाचे व वैशिष्ट्याचे सर्वांना सारखेंच भान आहे भारताने आधुनिक काळात जगाला चार मोठ्या देणग्या दिल्या असे सांगून विनोबा म्हणाले की "सत्याग्रह-दर्शन, अधिचित्तावर आरोहण, सर्वोपासना आणि समन्वय या भारतात प्रकटलेल्या चार गोष्टींची आजच्या जगाला फार गरज होती"

ज्या भारताने जगाला युद्धाचा अहिंसा-करणेचा विचार दिला, अहिंसेच्या मार्गानें स्वराज्य मिळविण्याचा अभिनव प्रयोग केला आणि आता करुणामूलक क्रांतीचा प्रयोग करीत आहे, त्या भारताने गोव्याला स्वतंत्र करण्याकरता सेना पाठवली या घटनेमुळें जगभर खळबळ उडाली भारताकडून विशेष अपेक्षा ठेवणाऱ्या जगभरच्या शांतिवाद्यांना धक्का बसला. जपानच्या अहिंसाप्रेमी लोकांनी तर हे कसे घडले हे विचारण्याकरता तावडतोब एका भिक्षूला विनोबाकडे पाठवले. विनोबांनी परिस्थितीचे अविवश वृत्तीने विश्लेषण करीत सांगितले की "आज जगातल्या सर्व सरकारांचा आधार सैन्य हाच आहे. सैन्य असले म्हणजे त्याचा उपयोगहि केला जाणारच. तेव्हा शांतताप्रेमी लोकांनी जनशक्ति जागृत करून सर्व सरकारांपासून जनतेला मुक्त करण्याचा कार्यक्रम हाती घेतला पाहिजे . . . . . मला आण्विक अस्त्राचे भय वाटत नाही. ती अस्त्रें अहिंसेच्या अगदी जवळ आहेत. आजच्या लढाईत क्रूरता नसते मूर्खता असते. तीत संहार भयंकर होतो पण तलवारीनें एखाद्याचा गळा कापण्यात जी क्रूरता आहे ती नीट हिशोब करून नेमक्या दिशेने आकाशातून बॉंब टाकण्यात नाही. बॉंब टाकणाऱ्याला थंड, शांत डोक्याने काम करावें लागतें; नाहीतर बॉंब चुकीच्या ठिकाणी पडेल माझी विज्ञानावर फार श्रद्धा आहे. विज्ञान माणसाला अहिंसेकडे आणील."

आसामात नयनरम्य सृष्टिसौंदर्य असेल, सौम्य सोज्वळ प्रेमळ लोक असतील, नऊशेंहून अधिक ग्रामदानें झाली असतील, एका भागात गावोगावी

ग्रामसभा स्थापन करून जमीन वाटण्याचे काम झाले असेल म्हणून काय झाले, विनोबानी आसामला अठरा महिन्याचा प्रदीर्घ कालावधि दिला तो अधिकच झाला. विनोबा इतके दिवस हिंदुस्थानच्या अगदी सुदूर पूर्वेच्या कोपऱ्यात राहिले त्यामुळें देशभरच्या कार्यकर्त्यांना त्यांच्याकडे पोहोंचणें हि अशक्य झाले असे अनेकानी म्हटले पण ऋषि ज्ञानदर्शी असतो, त्याला दूरवरचे दिसतें विनोबाची दृष्टि ईशान्येच्या हिमशिखराकडे होती हिमालयानें एक प्रश्न टाकला होता आणि विनोबाना त्याचे उत्तर सापडले होतें—'मैत्री'।

* * *

# पाकिस्तानांत सोळा दिवस : ११ :

"तुझी हाक ऐकून तुझ्यामागून कोणीच आले नाही तरीहि तू एकटाच पुढें जात रहा. अधाऱ्या रात्री पाऊस कोसळतोय झंझावात सुटला आहे, सारे दीप विझून गेले तरीहि तू आपला हृदय-दीप पेटवून एकटाच पुढें जात रहा" कवि रवीन्द्रांचे हे अनेक वर्षांपूर्वीचे गीत जणू गांधीजींकरताच लिहिले होतें. भारतात भेदाचा भस्मासुर मैमान घालत होता. माणसाला आपला विसर पडला होता, भाऊ भावाला मारीत होता, सगळे विवेकदीप विझले होते पण गांधीजींनी आपले जीवन जाळून मानवतेची ज्योत जागवली. पूर्व पाकिस्तानातील नोआखालीत ते एकटेच पायी चालत गेले, भंगलेली मनें जोडत गेले, तुटलेल्या तारा जुळवत गेले, उजाड जीवन फुलवीत गेले.

पाच सप्टेंबर १९६२ ला आसामच्या सीमेवरून विनोबांनी समोरचा मार्ग पाहिला. आजवर त्यांनी कित्येकदा एका प्रांताची सीमा ओलांडून दुसऱ्या प्रांतात पाऊल टाकले होतें, पण आज ते दुसऱ्या प्रांतात नव्हे तर दुसऱ्या देशात पाऊल टाकणार होते. दुभंगलेल्या देशातल्या दुसऱ्या शकलाचे दर्शन घेणार होते. आसामातून पश्चिम बंगालात जायचे म्हणजे उत्तरेकडून चांगलाच वळसा घेऊन जावे लागतें व सोपा सरळ मार्ग घ्यायचा म्हणजे वाटेंत पूर्व पाकिस्तान येतें. काही महिन्यांपूर्वी विनोबांनी पाकिस्तान सरकारला ह्या सोप्या सरळ मार्गावरून जाऊ देण्याविषयी परवानगी मागितली. पाकिस्तान सरकार फकीराला कसे अडवणार? परवानगी मिळाली आणि भारताच्या पंतप्रधानांनी जाहीर केले की "विनोबाची ही पूर्व पाकिस्तानची पदयात्रा थोड्या दिवसा-

पुरती असली तरी उभय देशामध्ये सौहार्द स्थापन करण्यास सहायक होईल" हें प्रसिद्ध होताच पश्चिम पाकिस्तानातील वृत्तपत्रांनी विनोबांना प्रवेश दिल्याबद्दल पाकिस्तान सरकारवर टीकेचा भडीमार सुरू केला पाकिस्तानचे परराष्ट्रमंत्री श्री महंमद अली यांनी टीकेला उत्तर देत म्हटले की "विनोबांना पूर्व पाकिस्तानातून जाण्याची परवानगी केवळ मानवतेच्या दृष्टीनेंच देण्यात आलेली असून पाकिस्तान सरकारच्या या कृतीचे फक्त भारतातच नव्हे तर साऱ्या जगात अभिनंदन करण्यात आले आहे विनोबाजी आपल्या पदयात्रेच्या द्वारें शुभेच्छेचाच प्रचार करतील व त्यामुळे उभय देशात मैत्री स्थापन होण्यास मदत होईल आम्ही तर भारताशी बंधुत्वपूर्ण संबंध राखू इच्छितो"

सोनारहाट या सीमेवरील गावातून विनोबांनी पाकिस्तानात प्रवेश केला तेव्हा पाकिस्तानच्या जनतेनें व अधिकाऱ्यांनी त्यांचे उत्साहानें स्वागत केले. विनोबांनी पाक भूमीवरील प्रथम प्रवचनात म्हटले की "मी पाकिस्तानच्या जनतेकडे प्रेम व शांतीचा संदेश घेऊन आलो आहे येथें मला काहीच वेगळेपणा भासत नाही तीच हवा तेंच आकाश, तीच माती, तीच माणूस, तेंच स्नेहानें भरलेले मन भारतातील जनतेच्या दर्शनानें माझें हृदय प्रेमानें उचंबळून येई, तसेच आजहि येत आहे सर्व दुनिया माझी आहे आणि मी तिचा सेवक आहें मी 'जय जगत्' म्हणतो त्याचा अर्थ असा की दुनिया एक आहे, सर्व मानव एक आहेत" भुरूगामारी हा पाकिस्तानातील पदयात्रेचा पहिला पडाव दर्शनार्थींच्या जमावाने फुलून गेला होता भारतातून हजारो मैल पायी चालून आलेल्या साधुबाबाच्या आगमनाची वार्ता त्यांना कुणीहि न सांगता कळली होती विनोबा कधी कधी कार्यकर्त्यांना म्हणत 'तुम्ही काय माझा प्रचार करणार? माझ्या हृदयीचे भाव ही हवा दशदिशेला घेऊन जाते, पाखरे माझा संदेश घेऊन दूरदूर उडतात आकाश माझे विचार सगळ्यांना सांगतें' पाकिस्तानात विनोबांच्या ह्या साऱ्या अव्यक्त प्रचारकांनी खूप प्रचार करून ठेवला होता त्यामुळें त्यांच्या मुक्कामाच्या आसपासच्या पांचपन्नास खेड्यांतील मुसलमान व हिंदू बांधवांचे थवे त्यांच्याभोवती गोळा होत सारे प्राण कानात आणून त्यांचे नवनवे विचार ऐकत

फक्त श्रोते बदलले होते पण विनोबा तेच व त्यांची भाषाहि तीच होती. "खेड्यापाड्यांत राहणाऱ्या बांधवांना भेटतां यावें म्हणून मी या विमानाच्या

युगातहि पायी यात्रा करीत तुमच्याकडे आलो पाकिस्तान सरकारनें मला येथून जाण्याची परवानगी दिल्याबद्दल मी अंतःकरणपूर्वक आभार मानतो हा फकीर आहे, गरीबाचा सेवक आहे असे मानून सरकारनें परवानगी दिली गरीब लोक भारतात आहेत व पाकिस्तानमध्येंहि आहेत गरीबाची गरीबी मिटावी, दुखिताची दुःखें दूर व्हावी, म्हणून आपण सर्वांनी काय करायला हवे तें मी तुम्हाला सांगत आहें देवानें आपल्याला या जगात पाठवले तें सर्वांना समानभावानें पाठवले श्रीमंताच्या घरी जन्माला येणारें मूल दागिनें घालून जन्म घेत नाही गरीब असो की श्रीमंत असो, प्रत्येक घरात जन्माला येणारें मूल नागवेंच येतें बरोबर काहीहि घेऊन येत नाही आणि आपण देवाघरी जातो तेव्हाहि काही घेऊन जात नाही मेल्यानंतर सर्वांच्या देहाची मातीच होते एकाच्या देहाचे सोनें नी दुसऱ्याची राख असे होत नाही याचा अर्थ असा की आपण समानतेचा आदर्श राखावा असे देव आपल्याला शिकवतो हवा, पाणी आणि सूर्यप्रकाश या देवानें दिलेल्या गोष्टी सर्वांकरता आहेत. त्याच प्रमाणें जमीनहि देवानें दिली आहे, ती सर्वांकरता आहे, तिचा मालक अल्लाह (देव) आहे. माणूस जर म्हणेल की मी जमीनीचा मालक आहें तर तो देवाची जागा घेण्याचा प्रयत्न होईल, ईश्वरद्रोह ठरेल तुमच्या गावात भूमिहीन आहेत व भूमिवानहि भूमिहीनाना तुम्हीच जमीन द्यायची आहे दानाचे महात्म्य सर्वच धर्मांनी सांगितले आहे कुराणात म्हटले आहे की 'देवाने तुला जे काही थोडेंफार दिले आहे त्यातून तू दान दे' परमेश्वर रहमान रहीम, दयाळू कृपाळू आहे तर आपण निष्ठुर बनून कसे चालेल? आपल्यालाहि दुःखिताविषयी दया करणा राखायला हवी सर्वांवर समभावानें प्रेम करायला हवें देवाने पशु-पक्षाना वाणी दिली नाही, फक्त माणसालाच दिली आहे म्हणून त्या वाणीचा उपयोग सत्यवचनात, प्रेमानें मधुर बोलण्यात करावा इतर कशात करू नये'

सभेनंतर मौन प्रार्थना झाली हिंदु मुसलमान ख्रिस्ती या सर्वांनी मिळून एकत्र मौन प्रार्थना करण्याचा पाकिस्तानच्या इतिहासातील तो पहिलाच प्रसंग होता पाच मिनिटें सारी सभा ध्यानस्थ बसली सामूहिक ध्यानाचा सर्वांवर अद्भुत परिणाम झाला सभेनंतर विनोबानी गावात कुणाला कुराण म्हणता येते का म्हणून विचारले कुराण-पाठ झाल्यानंतर ते यात्रेची व्यवस्था

करणाऱ्या स्थानिक लोकांना म्हणाले 'तुम्ही मला खाऊ पिऊ घातलेंत पण गावच्या भूमिहीनांना आज काय मिळालें? त्यांना कोण खाऊ घालणार?' भारताप्रमाणें पाकिस्तानांतहि विनोबा-यात्री-दलाची सारी व्यवस्था गावकरी करीत तेथे विनोबा सरकारी पाहुणे असल्यामुळें, पोलीस विभागाचे, वार्ता-विभागाचे वगैरे काही सरकारी लोकहि यात्रेबरोबर राहत

तिन्हीसांजा होऊन गेल्या दिवेलागणीची वेळ एका मुसलमान बंधूच्या अंतरींचा देव जागला तो परत विनोबांकडे येऊन म्हणाला 'माझ्या-जवळ चार एकर जमीन आहे घरी खाणारेहि बरेच आहेत तरी पण एक बीघा जमीन भूमिहीनांकरता द्यायची इच्छा होते आहे' दानपत्रावर सही करताना तो पुन्हा म्हणाला 'एक बीघा नको, एक एकर लिहून घ्या एक बीघा त्याला कसा पुरेल? रजिस्ट्रेशन फी देखील मीच देईन' दात्यानें अश्रु-नयनांनी विनोबांच्या हातीं दानपत्र दिलें विनोबांनी त्याच्या खांद्यावर हात ठेवीत म्हटलें की 'तुम्हांला आशीर्वाद दे अशी मी अल्लाजवळ प्रार्थना करतो' दोघांच्याहि डोळ्यांतून आसवें ओघळली पाकिस्तान-यात्रेच्या पहिल्या दिवशीच्या पावन मुहूर्तावर प्रथम भूदान मिळालें आणि पाकिस्तानात भूदानाची गंगोत्री प्रकटली अब्दुल खालिक मुनशी हा पाकिस्तानचा रामचन्द्र रेड्डी झाला आणि भुरुंगामारी हें पोचमपल्ली झालें

आरंभीच्या एक दोन दिवसांत जनता 'पाकिस्तान जिंदाबाद' च्या घोषणेनें विनोबांचें स्वागत करी विनोबा सांगत की "जय जगत् मध्यें जगातल्या सर्व देशांचा विजय येऊन जातो 'पाकिस्तान जिंदाबाद' व 'जय हिंद' हे दोन्हीहि 'जय जगत्' च्या पोटांतच आहेत" पुढच्या मुक्कामापासून पाकि-स्तानच्या जनतेनें 'जय जगत्' चा उद्घोष सुरू केला विश्वराज्याचा विचार वाणींत आला शब्दानंतर कृति येते, विचारानंतर आचार येतो एका पत्र-काराने विचारलें की 'ब्रह्मपुत्रेच्या पुराचें नियंत्रण कसं करायचें' विनोबा म्हणाले 'त्या करता भारत व पाक या दोन्ही देशांना एकत्र यावें लागेल दोन्ही देशांचें कॉन्फेडरेशन केल्यानें असे अनेक प्रश्न सुटू शकतील पुढे आपल्याला जगाचें फेडरेशन करायचें आहे भारत व पाकचें कॉन्फेडरेशन हें वर्ल्ड फेडरेशनचें पहिलें पाऊल ठरेल'

"पाकिस्तान या राष्ट्राचा विजय व्हावा अशी आपली इच्छा असेल तर राष्ट्राच्या इमारतीचा पाया म्हणजे खेडी मजबूत बनली पाहीजेत पाया कमजोर असेल तर वरचे मजले ढासळल्यावाचून राहणार नाहीत खेड्यातील लोक गरीब, दुःखी व असंतुष्ट राहतील तर राष्ट्राची उन्नति होणें अशक्य आहे म्हणून सर्वांनी आपले लक्ष खेड्यावर द्यावें जमीनीचा प्रश्न प्रेमाच्या मार्गाने सोडवावा, खेड्यांतल्या सर्व लोकांना काम मिळावे म्हणून ग्रामोद्योग सुरू करावे घरोघरी चर्खे चालवावे, जातिभेद, धर्मभेद नाहीसे करुन प्रेमाच्या आधारावर ग्रामपरिवार निर्माण करावा, परस्पर सत्कार्याने काम करण्याची वृत्ति निर्माण करावी धान्याचे उत्पादन वाढवल्याशिवाय सर्वांना पोटभर खायला कसे मिळणार? त्याकरता विज्ञानाचे सहाय्य तर घेतलेच पाहीजे पण मजूरालाहि संतुष्ट ठेवले पाहीजे आज मजूर मन लावून काम करीत नाही कारण त्याला दुसऱ्याच्या शेतावर काम करावें लागतें मालक त्याला मजूरी देण्यात कजूषी करतो व मजूर काम करण्यात कजूषी करतो जरा लक्ष नसलें की बसून राहतो दोघेहि मिळून राष्ट्राचे नुकसान करतात. मजुराना स्वतःची अशी जमीन मिळाली तर ते जीव लावून काम करतील म्हणून राष्ट्रहिताच्या दृष्टीने भूमिहीनांना जमीन देणें आवश्यक आहे मजूर असंतुष्ट राहील तर कम्युनिझम वाढेल तलवारीच्या जोरावर कम्युनिझमला अडवता येणार नाही"

विनोबाच्या मुक्कामाभोवतीची गर्दी सारखी वाढत होती पाकिस्तानची जनता मुक्तमनानें साधुबाबावर प्रेम-वर्षाव करीत होती दानवर्षाहि थोडी थोडी होऊं लागली होती हिंदू लोक अनेक वर्षांनंतरें रस्त्यावर 'रामकृष्ण-हरि' चा जयघोष करीत होते चरणधूलि घ्यायला येणाऱ्या भाविकांच्या रांगेमुळे विनोबाची वाट अनेकदा अडविली जाई कधी कुणी जवळच्या मंदिरात चलण्याचा आग्रह केला तर विनोबा चार दोन फर्लांग अधिक चालून देवदर्शनास जात "मी मंदिरात गेलो नाही तर मंदिराच्या प्रतिष्ठेला धक्का लागेल मंदिराची प्रतिष्ठा कायम रहावी म्हणून मी मंदिरात जातो" असे ते सांगत लोकांनी भय सोडावें, हे रोजच्या प्रवचनांत ते सांगत असत

'मी देह आहे—असे मानणारा कधीच निर्भय होऊं शकत नाही मी देह नसून आत्मा आहे, हे ओळखल्यानें निर्भयता सहजपणे साधते अशा माणसाला

कुणाचे भय वाटत नाही व इतर कुणाला हि त्याचे भय वाटत नाहीं लोक ज्याला घाबरतात तो खरा निर्भय नाही, जो दुसऱ्याना गुलाम बनवतो तो खऱ्या अर्थाने स्वतंत्र नाहीं निर्भयता व प्रेम हा इस्लामचा पाया आहे तेव्हा सर्वांना निर्भय बनविणारा, प्रेम शिकविणारा भूदानाचा कार्यक्रम हाती घेणें हे इस्लामी राष्ट्राचे कर्तव्य आहे कुराणात स्पष्ट निर्देश आहे की धर्माच्या बाबतीत जबरदस्ती होऊच शकत नाहीं सर्वांवर प्रेम करणें, नम्रतेने प्रेमानें आपला विचार समजावून सांगणें, शांति राखणें ही इस्लामची शिकवण आहे इस्लामचा अर्थच मुळीं आहे, शांति तेव्हा विश्वशांति स्थापन करण्याकरता इस्लाम मानणाऱ्यांनी भूदानयज्ञात सहकार्य केले पाहिजे "

पगलापीर हें ल्हानसें गाव पण पाच दात्यांनी भूदान दिलें बाहेरून आलेल्या एका तरुणानें विनोबाचे खूप फोटो घेतले नंतर तो त्यांना भेटला आणि म्हणाला " मी सिनेमेंट आहें डाक्यात राहतों वर्तमानपत्रात तुमच्या पदयात्रेचे वृत्त वाचल्यापासून तुम्हाला भेटावेस वाटू लागले तुमच्या कामा-बद्दल मला फार आदर व श्रद्धा वाटते त्या श्रद्धेचें प्रतीक म्हणून मी माझ्या मालकीच्या तीन एकर जमीनीचे दान अर्पण करीत आहे " विनोबांनी प्रेमानें त्याच्या पाठीवरून हात फिरवला फकीराच्या झोळीत श्रद्धेनें भारलेले भूदान टाकून तो तरुण डाक्याला परतला माणसाच्या मनात सद्भावना असते, जागवल्याने ती जागते, हृ जगाला सांगून गेला चणेफुटाणे विकणारा एक गरीब पोऱ्या विनोबाकडे आला आणि म्हणाला ' माझ्या जवळ जमीन नाही, दान द्यायला संपत्तिहि नाही, पण चणेफुटाणे विकून हे पाच रुपये जमवले आहेत ते श्रद्धेनें अर्पण करीत आहे आपण स्वीकार करावा ' विनोबा सद्गदित झाले माणसाच्या हृदयाचा प्याला प्रेमानें भरलेला आहे, प्रेम दिले की प्रेम मिळतें, देव सगळयाच्याच हृदयमंदिरांत राहतो, हृ सारें त्यांना माहीत होतें आणि तरीहि पाकिस्तानच्या जनतेचे अपार प्रेम पाहून त्यांना वाटे कीं 'देणारा अनंत हस्तांनी देत आहे नी घेणाऱ्याजवळ फक्त दोनच हात आहेत.'

रंगपूरला विनोबांचा मुक्काम पाकिस्तानच्या राष्ट्रीय परिषदेचे सदस्य मसीहूर रहमान याच्या घरी होता शहरातील सुशिक्षित लोकांनी नाना प्रश्न विचारले व अनपेक्षित उत्तरें ऐकून ते थक्क झाले एकाने विचारलें

पाकिस्तानच्या बेसिक डेमॉक्रसीबद्दल तुमचे काय मत आहे? विनोबांनी उत्तर दिले की "तो एक चांगला प्रयोग आहे पण त्याकडे सत्तेच्या दृष्टीनें न पाहता प्रेम व करुणेच्या दृष्टीनें पाहिले पाहिजे सत्तेबरोबर येणारे ईर्षा, द्वेष नी झगडे, सत्तेच्या विकेन्द्रीकरणाबरोबर खालपर्यंत येतील तर त्यातून फायद्याऐवजीं नुकसानच होईल म्हणून प्रेम व करुणा यावर आधारित अशी लोकशाही निर्माण केली पाहिजे खेड्यातील लोक आपली एक समिति-ग्राम-सभा-स्थापतील प्रत्येक माणूस गावाच्या कल्याणाकरता ग्रामसभेला आपल्या उत्पन्नाचा एक भाग देत राहील गावातील झगडे गावातच मिटवले जातील, बाहेरच्या कोर्टात जाणार नाहीत. भूमिहीनांना जमीन दिली जाईल गावाचे ग्रामदान होऊन मालकी नाहीशी होईल तर लोकशाहीचा पाया मजबूत होईल. आज देशावर संकट उभे झाले म्हणजे लोकशाही असलेल्या राष्ट्रांतहि संकट-निवारणाच्या नावानें लोकशाही खतम केली जाते म्हणजे संकटकालात लोक-शाहीचा स्वत वरच विश्वास नाहीं याचे मुख्य कारण हे आहे की सरकारचा आधार सैन्यशक्ति हा आहे जोपर्यंत लोकशाही अहिंसेच्या पायावर उभारली जाणार नाही, तावर खरी लोकशाही येणार नाही"

दुसऱ्याने कम्युनिझमविषयी प्रश्न विचारला विनोबा म्हणाले की "कम्युनिझममध्ये हिंसक साधनाचा उपयोग केला जात असला तरी कम्यु-निझमची मुख्य शक्ति करुणा ही आहे गरीबांच्या दु खाचे निवारण झाले पाहिजे अशी त्यांच्यात तीव्र भावना असते ती आपल्यातहि असायला हवी ज्यांचा अहिंसेवर शांतीवर विश्वास असतो ते 'जैसे थे' चाहतात व समाज-व्यवस्थेंत परिवर्तन चाहणारे हिंसेचा आश्रय घेतात मार्क्सच्या डायलॅक्टिक्सच्या भाषेत बोलायचे झाल्यास मी असे म्हणेन की अहिंसा आणि 'स्टेटस को' (जैसे थे) हा झाला थिसिस, हिंसा आणि क्रांति हा ॲन्टी थिसिस व अहिंसक क्रांति हा सिंथेसिस आहे" प्रश्नकर्त्यांची जिज्ञासा वाढली 'अहिंसक क्रांति कशी घडवून आणायची, तें सांगा' विनोबा पुढे सांगू लागले "त्याकरता पाच गोष्टी केल्या पाहीजेत—(१) सत्तेचे विकेन्द्रीकरण केले पाहिजे खेड्यात सर्वांत खालच्या घटकांत सर्वांत अधिक भौतिक सत्ता व सर्वांत वरच्या घटकात सर्वांत कमी भौतिक सत्ता आणि अधिकाधिक नैतिक सत्ता रहावी (२) सहयोगी समाजाची संघटना केली पाहिजे (३) प्रत्येक व्यक्तीच्या सर्वांगीण

विकासाला पूर्ण संधि मिळाली पाहिजे (४) समाज-कल्याणासाठीं आपली सेवा समर्पण करण्याची बुद्धि प्रत्येक व्यक्तीत विकसित झाली पाहिजे (५) शिक्षण-क्षेत्रात ज्ञान व कर्म याचा समन्वय झाला पाहिजे

पहाटे चारच्या ठोक्याला विनोबा नागेश्वरीहून भीतरबदला जायला निघाले तेव्हा वाटेंत अंधारात एक गृहस्थ उभा असलेला दिसला त्याच्या हातात एक बाटली होती विनोबांना पाहताच तो पुढें होऊन म्हणाला, "माझा मुलगा आजारी आहे, पुष्कळ औषधें केली पण गुण काही येत नाही आपण या बाटलीतले पाणी मंतरून द्या म्हणजे माझा मुलगा बरा होऊन जाईल" विनोबांनी त्याचा हात धरला, बाटली हातात घेत ते म्हणाले "अल्लावरती श्रद्धा असेल तर मुलगा निश्चित बरा होईल" तो माणूस सलाम करून निघून गेला भारतातून आलेल्या फकीराच्या स्पर्शानें आपला मुलगा बरा होईल ही पाकिस्तानच्या मुसलमानाची श्रद्धा सागते की कुठेंहि जा, माणसाचें हृदय सारखेंच आढळतें

प्रत्येक गावात विनोबाचा मुक्काम बहुधा शाळेंत असे ते शाळेची सर्व पाठ्यपुस्तके मागवीत व वाचीत पूर्व पाकिस्तानात बंगाली भाषाच चालते लोकाचं बंगालीवर अतोनात प्रेम उर्दू लादली जाऊ नये, बंगाली रहावी म्हणून येथें फार मोठी चळवळहि झाली होती रवीन्द्रशताब्दीचा उत्सव भारताप्रमाणेच पूर्व पाकिस्तानात उत्साहाने साजरा झाला रवीन्द्राची विश्वव्यापक दृष्टि असल्यामुळें त्याच्या साहित्याचे आकर्षण जगभर आढळते अस विनोबा सागत पाकिस्तानच्या पाठ्यपुस्तकात संस्कृतनिष्ठ बंगाली आढळे '*आमची बंगाली शुद्ध आहे, पश्चिम बंगालची बंगाली ही कलकत्याच्या* हिंदी वगैरे इतर भाषाच्या प्रभावामुळे बिघडली आहे' असे तेथील लोक म्हणत रवीन्द्रनाथ व शरदबाबू हे पूर्व बंगालचेच त्याच्या साहित्यात येथील सुरम्य सृष्टीची सुंदर वर्णन आहेत दोन्ही बंगाल मिळून बंगाली बोलणाऱ्याची संख्या आठ कोटीहून अधिक आहे बंगाली ही संख्येन नव्हे तर गुणान देखील जगातील दहा-पाच सर्वोत्कृष्ट भाषातील एक आहे रंगपूरला पाकिस्तानच्या साहित्यिकासमोर बोलताना विनोबा म्हणाले की ज्याचे चित्त स्थलकालाच्या बंधनातून मुक्त असतें तोच उत्तम साहित्यिक होऊ शकतो साहित्यिक स्वत विकारमुक्त असेल तरच इतराच्या विकाराचे योग्य मोजमाप घेऊ शकेल

ससारविमुख असलेला मुक्त होऊ शकेल पण साहित्यिक नव्हे साहित्यिक अलिप्त असूनहि ससाराभिमुख असतो ...... जी भाषा विश्वशांति स्थापन करेल तीच साऱ्या जगाची भाषा होईल. ..... विज्ञानाला मार्गदर्शन करण्याचे काम साहित्यिक करतील. . ... यापुढे साहित्यिकाचे महत्त्व फार वाढणार आहे .. ... शब्द-शक्ति कुठित होईल तर शस्त्र-शक्ति वाढेल साहित्यिकानी जगाला जोडण्याचे काम करावें.... जगभरच्या सर्व साहित्यिकाची एक जमात आहे."

११ सप्टेंबरला तिस्ता या मुक्कामावर विनोबाचा अडुसष्टावा वाढ-दिवस साजरा झाला जिल्ह्यातील बरेच अधिकारी शुभेच्छा व्यक्त करण्या-करतां आले. पूर्व पाकिस्तान सरकारनें तार पाठवून शुभकामना व्यक्त केल्या व विनोबाना दीर्घायुष्य लाभावें अशी प्रार्थना केली. कुराण व गीतेचा पाठ करून आणि काही भाषातली भजनें म्हणून यात्रीदलानें समारंभ साजरा केला विनोबानी अल् फातिहा म्हणून दाटलेल्या गळयानें चार शब्द सांगितले —"मी एका विशिष्ठ देशात जन्माला आलो व विशिष्ठ देशात मरेन, ही एक आकस्मिक घटना आहे. आता मी पाकिस्तानात आहे तर हा माझाच देश आहे असे मला वाटतें मला जर इथें मरण आले तर माझी हाडें भारतातल्या नद्यात जावी असे मला वाटणार नाही. सारी पृथ्वी माझी नी मी पृथ्वीचा आहें. समाजाचे माझ्यावर अनत उपकार आहेत मी सध्या जें काम करीत आहें, त्यात विशेष काहीच नाहीं. मी फक्त समाजाचे ऋण फेडीत आहें ..... आज जिन्नासाहेबाचा मृत्युदिन आहे म्हणून तुम्ही त्याच्या नावानें अधिक भूदान द्यायला हवें."

गेल्या दोन अडीच वर्षांपासून विनोबानी कुराणाचे अध्ययन करून कुराणातील निवडक भाग घेऊन 'कुराण-सार' हे पुस्तक तयार केले होतें. तें पुस्तक प्रकाशित होण्यापूर्वीच पाकिस्तानच्या काही वृत्तपत्रानी त्यावर टीकेचा हल्ला चढविला होता. 'इस्लामच्या तेराशे वर्षांच्या इतिहासात आजवर कुराणातील काही भाग निवडून काही टाकण्याची हिंमत कुणीहि केली नव्हती असाहि एक आक्षेप होता. पण भारतातील सर्व उर्दू पत्रानी मात्र विनोबाचे समर्थन केले व विनोबानी इस्लामची सर्वोत्तम सेवा केली असे लिहिले. पाकिस्तानातील काही मौलवीनीहि विनोबाची बाजू घेतली टीकेच्या

भडीमारामुळें पाकिस्तानात सर्वत्र त्या पुस्तकाविषयी उत्सुकता निर्माण झाली होती पण पुस्तक अजून प्रकाशित व्हायचें होतें तिस्ताला एक वृद्ध मुसलमान डॉक्टर विनोबांना म्हणाले ' तुमचें ' कुराण-सार ' पहायची उत्कट इच्छा आहे '

'पुस्तक तर अजून छापून झालें नाही ' विनोबा

' माझ्या आयुष्याचा शेवट जवळ आला आहे मरण्यापूर्वी तुमचें कुराण-सार वाचावयाला मिळेल तर फार समाधान होईल मला त्याची एक प्रत जरूर पाठवा आणि मला आशीर्वाद द्या '

गंगा यमुना आणि मेघना ( ब्रह्मपुत्रा ) यांच्या वाढत्या प्रवाहाप्रमाणे विनोबांच्या पाक-यात्रेंत जनप्रवाह रोज वाढत होता तीस्ताची विराट सभा जनसागराला आलेल्या भरतीचें दर्शन घडवीत होती विनोबा बोलू लागले— "तुमचें अपार प्रेम मला रोज दिसतें आहे त्या प्रेमाचा प्रकाश कृतीद्वारे प्रकटावा अशी माझी इच्छा आहे इस्लामनें ईमान आणि अमल, श्रद्धा आणि कृति अशा दोन गोष्टींची आवश्यकता सांगितली आहे नुसती श्रद्धा असून चालणार नाही त्यानुसार आचरण झालें पाहिजे एका गृहस्थानें मला औद्योगीकरणाविषयी प्रश्न विचारला आहे मोठमोठे कारखाने काढले गेले तर मला त्यात वावगें काहीच वाटत नाही पण स्वातन्त्र्य मिळून इतकीं वर्षें होऊन गेली तरीहि अजून भारत व पाकिस्तान या दोन्ही देशात सर्वांना काम देता येईल, इतके कारखाने उघडले नाहीत उपाशी आणि बेकार लोकांना तुम्ही किती दिवस वाट पहायला लावणार आहात ? तुमचा औद्योगिकरणाचा विचार हा उधार धर्म आहे व भूदान ग्रामोद्योग हा नगद धर्म आहे कारण त्याद्वारें लोकांना आजच खायला मिळू शकेल पोटात शांति असेल तर चित्तात नी जगतात शांति राहणार म्हणून भुकेचा प्रश्न सर्वांत आधी सोडवला पाहिजे "

'तुम्ही इथून गेल्यानंतर आपले काम कुणाला सोंपवून जाणार ? एखादी संस्था उभारणार का ?' असा प्रश्न लोक नेहमी विचारीत विनोबा उत्तर देत की " मी कोणतीहि संस्था स्थापन करणार नाही येथील लोकच भूदानाचें काम चालवितील तुमच्या बेसिक डेमॉक्रसीच्या सदस्यांनी हे काम हाती घ्यायला पाहिजे त्यांनी स्वत दान द्यावें व इतरांकडून दान मागण्याचे काम करावें प्रेमाचें, करुणेचे काम केल्यानें च ते त्या पदाला योग्य ठरतील .

हे काम अल्लाहचे आहे, आणि म्हणून ते पुढे चालविणारे 'अल्लाह के बन्दे' (ईश्वराचे सेवक) या देशात सापडतील अशी माझी श्रद्धा आहे"

पगलापीरच्या मुक्कामावर एक उच्च सरकारी अधिकारी आपल्या मुलाला घेऊन आले व म्हणाले 'हा मला नेहमी विचारी की साधु कुणाला म्हणायचे मी त्याला शक्य तितके सर्व समजावून पाहिले शेवटी विचार केला की याला खरा साधुच दाखवावा म्हणजे कळेल की साधु कुणाला म्हणायचे' बापाने मुलाला खऱ्याखुऱ्या साधुजवळ बसविले आणि मुलगा चालत्या बोलत्या महापुरुषाकडे अनिमिष नेत्रांनी पाहू लागला

एका वकीलाने विनोबाला म्हटले की 'पूर्व पाकिस्तानात जमीन फार कमी आहे, तर भारत सरकारने आम्हाला काही जमीन दान द्यावी असे तुम्ही का सांगत नाही?' विनोबांनी स्मित करीत म्हटले "तिकडे पश्चिम पाकिस्तानातहि पुष्कळ जमीन आहे तिथे प्रथम दान मागू या.... खरे म्हणजे जमीनीचा प्रश्न साऱ्या आशियाचा प्रश्न आहे तो प्रेमानेच सुटू शकेल त्याकरता जगाचे फेडरेशन व्हायला पाहिजे"

करावें, अशी देवाची इच्छा आहे स्त्रियांना पडद्यात बंद ठेवणें चूक आहे त्यांनी बाहेर यावें, समाज-सेवा करावी "

खुशालपूरला महाराष्ट्रातून इकडे आलेले एक मुसलमान गृहस्थ विनोबांना भेटायला आले त्यांनी मागे चळवळीत भाग घेतला होता, व नागपूर जेलमध्ये विनोबांसोबत ते सहा महीने राहिले होते विनोबांनी आपल्याला ओळखले हें पाहून त्यांना अत्यानंद झाला ते विनोबांना म्हणाले की 'सगळे झगडे मिटविण्याचे सामर्थ्य बापूंच्या नंतर तुमच्यापाशीच आहे तुमच्या कुराणाच्या पुस्तकावर इकडच्या वृत्तपत्रात टीका झाली तेव्हां मी लोकांना सांगत असे की ही टीका चूक आहे, कुराणाच्या शिकवणीशी विरोधी असलेला असा एकहि शब्द विनोबांच्या मुखातून निघणें अशक्य आहे मी त्यांना चांगलें ओळखतो' यावर विनोबा म्हणाले "त्या पुस्तकाद्वारें मी इस्लामची सेवाच केली आहे तुम्ही त्या पुस्तकाचा प्रचार करा "

दिनाजपुरला एका स्थानिक अधिकाऱ्याची पत्नी आपल्या मुलाला घेऊन विनोबांकडे आली व म्हणाली की 'आज जगात किती अशांतता आहे! हिंसा प्रतिहिंसेचे दुष्टचक्र चालू आहे यातून मुक्त होण्याचा मार्ग सांगा' विनोबा तिला म्हणाले की "जगाला हिंसेच्या दुष्टचक्रातून सोडविण्याचे काम स्त्रियांनी हाती घ्यायला हवें" निरोप घेताना तिनें आपल्या मुलाला विनोबांच्या पुढ्यात ठेवीत म्हटलें की 'मी आपला मुलगा तुम्हांला अर्पण करीत आहे मोठा झाल्यावर यानें तुमचेच काम करावें अशी माझी फार इच्छा आहे'
एक मुसलमान शिक्षिका शेवटचे दोन दिवस पदयात्रेंत राहिली आणि तिनें नवविचाराची दीक्षा घेतली विनोबांच्या यात्रेंत वाट दाखवण्याचें काम नेहमी एखाद्या स्थानिक कार्यकर्त्याकडे सोपविले असतें विनोबा त्याला 'नेताजी' म्हणतात पूर्व पाकिस्तानच्या यात्रेंत इतर व्यवस्था करण्यात, गांधीजींच्या काळात स्थापलेल्या विधायक कार्य करणाऱ्या संस्थांच्या कार्यकर्त्यांचा मोठा भाग असला तरी विनोबांना वाट दाखवण्याचे 'नेताजी' चे काम स्थानिक कार्यकर्त्री कल्पनादीदी हिनें केले

पाकिस्तानच्या सोळा दिवसाच्या यात्रेंतील शेवटचे गाव 'बिरल' हे होतें प्रेमसागरात पोहत पोहत विनोबा अखेरच्या दिवशी दोन देशांना दूर ठेवणाऱ्या सीमेकडे जाऊ लागले चिखलपाण्यानें भरलेल्या रस्त्यावर



आपले सामान स्वत वाहण्याचे हि अनेक प्रसंग यात्रेत येतात (उत्तर प्रदेशातील एक प्रसंग)

पावले टाकू लागले तेव्हा 'अजान' चे सूर ऐकू आले. पहाटेच्या प्रशांत वेळी सर्वांना जागविणारा अजानचा गंभीर ध्वनि विनोबांना फार प्रिय आहे "ईश्वर एक आहे, मशीदीतून असा ध्वनि चहूकडे निनादे. विनोबा लोकांना सांगत 'ईश्वर एक आहे' तसा मानवहि एक आहे. जाति, धर्म, पंथ, देश या सर्वांपेक्षा मानवता अधिक श्रेष्ठ आहे".

विनोबांच्या पाकिस्तान-यात्रेनें सर्वांना गांधीजींच्या नोआखालीच्या यात्रेचे स्मरण होई अत्यंत विषम नी कठिण परिस्थितीत गांधीजींची ज्योत तेवत ठेवण्याचे काम पाकिस्तानातील मूठभर विधायक कार्यकर्ते गेली कित्येक वर्षे करीत होते श्री चारु चौधरी हे त्यातील एक प्रमुख कार्यकर्ते. पाकिस्तान सोडण्यापूर्वी विनोबांनी या सर्वांना जीवनाची शिदोरी देत म्हटले की "कार्यकर्त्यांनी आपली तपश्चर्या वाढवीत रहावें म्हणजे जनतेकडून प्रतिसाद मिळत जाईल कार्यकर्त्यांनी सतत संचार करीत रहावें. 'घोडा अडला का ? पानें सडली का ? पोळी जळली का ?' या सर्व प्रश्नांचे एकच उत्तर आहे की, फिरवले नाही म्हणून पदयात्रा हें चित्त-शुद्धीचे एक उत्तम साधन आहे. कार्यकर्त्यांत ऐक्य असणें आवश्यक आहे त्याकरता परमेश्वरानें तुम्हाला फार मोठी देणगी दिली आहे—आपत्ति ! सर्वत्र नारायणाचे दर्शन घेण्यास शिका. कार्यकर्त्यांनी आपले सर्वांचे मिळून एक कुटुंब आहे, असें मानावें"

पाऊस किंचित थांबला, चिखलाच्या रस्त्यावर विनोबांची पावलें झपझप पुढें पडत होती वाटेंत एक नाला लागला नावेची व्यवस्था होती पण फार खोल पाणी नाही, हे कळताच विनोबा पायीच पुढें निघाले छाती-पर्यंतच्या पाण्यानें त्यांना पूर्ण भिजवले चिखलाच्या कठिण वाटेवरून ते पाक-भारत सीमेकडे जाऊ लागले

दोन्हीकडच्या माणसांच्या समुदायानें सारी सीमारेषा व्यापून टाकली होती मध्यें मोकळी जागा ( नो मॅनस् लॅन्ड ) होती तिथे मंच उभारला होता पाकिस्तानची जनता व अधिकारी जड अंत:करणानें निरोप द्यायला आले होते तिकडे पश्चिम बंगालच्या मुख्यमंत्र्यासोबत शेकडो लोक उत्सुकतेने वाट पाहत होते फोटो व फिल्म घेणाऱ्या अनेक देशांच्या पत्रकारांची गर्दीमुळें तारांबळ उडाली होती इकडे पाकिस्तानचा हिरवा झेंडा फडकत होता व

त्याच्या जवळच्या कमानं।५१ ५।।कंस्तान पाइन्दाबाद' 'विनोबाना दीर्घायुष्य लाभो' 'विनोबाना निरोप' अशी अक्षरें लिहिली होती. तिकडे भारताचा तिरंगी झेंडा फडकत होता व त्याच्या जवळ 'विनोबाचे स्वागत' 'जय जगत्' लिहिलेली कमान होती निरोपाच्या भाषणात विनोबा म्हणाले "पाकिस्तान सरकारने प्रेमानें परवानगी दिली व आमच्या यात्रेची उत्तम व्यवस्था ठेवली याबद्दल सरकारचे व अधिकाऱ्याचे मी विशेष आभार मानतो गांधीजीच्या नोआखाली यात्रेपासून पाकिस्तानची एकनिष्ठ सेवा करणाऱ्या विधायक कार्य-कर्त्यांचे आभार मी कसे मानू? त्यानी गेले सोळा दिवस अविश्रांत परिश्रम करून आमची यात्रा सफल केली. त्याच्या सेवेचा स्पर्श पाकिस्तानी जनतेच्या हृदयाला होईल, असा मला विश्वास आहे. पाकिस्तानच्या जनतेच्या प्रेमाचे वर्णन मी कोणत्या शब्दात करू? कुराणाच्या भाषेत बोलायचे तर मी म्हणेन की इथें प्रेम मिळेल असा माझा 'इल्मुल यकीन' (ज्ञानजन्य विश्वास) होता पण इथें प्रेमाचा जो साक्षात्कार झाला, त्याला 'अय्नुल यकीन' (प्रत्यक्ष दर्शनाने विश्वास) म्हणता येईल. गंगा यमुना आणि मेघनेचा इथें संगम होतो या नद्या राष्ट्रभेद मानत नाहीत. लोकहृदयातहि हे भेद राहू नयेत.... वंगभूमीतील महापुरुषाचे माझ्यावर फार मोठे ऋण आहे. या भूमीची थोडी-फार सेवा करायला मिळाली तर माझें जीवन सार्थकी लागेल."

जनसागराला भरती आली. पूर्व-पश्चिम बंगालचे लोक जुने, चिर-परिचित चेहेरे न्याहाळू लागले. चौदा वर्षे लोटून गेली पिता-पुत्रानें एक-मेकाना प्रेमानें आलिंगन दिले भाऊ भावाला भेटले, मित्र मित्राना भेटले. चौदा वर्षे पाखरासारखी उडून गेली. पूर्व बंग व पश्चिम बंगाचा संगम झाला. क्षणभरच का होईना पण दुभंगलेले देश नी भंगलेली मनें जुळली गेली.

* * *

# बारा वर्षे तेरा महीने : १२ :

गीतेत म्हटले आहे 'मी स्थिरात हिमालय'. ईश्वराची विभूति असा तो हिमालय हादरला आणि भारतात सर्वत्र प्रक्षोभ निर्माण झाला भारताच्या ईशान्य सीमेवरील नेफा आणि उत्तर सीमेवरील लडाखच्या भागातून चिनी फौजा पुढे सरकू लागल्या, भारत खडबडून जागा झाला स्वातन्त्र्याच्या रक्षणाकरता त्याग, बलिदान करायला तयार झाला सारे मतभेद विसरून एकदिलाने काम करण्याची भाषा बोलू लागला पण स्वातन्त्र्यरक्षणाकरता काय केलं पाहीजे ? बिहार व बंगालच्या लहान लहान खेडयात हिंडत विनोबा अक्षुब्ध चिंतनातून प्रकटलेले सार सांगत होते चाणक्याने म्हटले आहे की 'बुद्धिस् तु मा गान् मम' माझे सारे काहा जावो पण बुद्धि न जावो हिमालय हादरला तरी भारताची बुद्धि विचलित होऊ नये याकरता विनोबाचा सतत प्रयत्न चालू होता

नेफा आणि लडाखच्या सीमेवरील संघर्षाची बातमी येताच विनोबानी स्पष्ट भूमिका मांडली "तटस्थ वृत्तीने विचार करताना असे दिसते की भारतावर ही लढाई लादली गेली आहे भारताची युद्धाची तयारी नव्हती कारण भारताला युद्ध नको होते, शांति हवी होती यात भारताचा दोष नसून गुणच आहे सीमेवरील काही भाग आमचा आहे, असे भारत व चीन या दोघांचेहि दावे आहेत पण भारताची वाटाघाटी करण्याची तयारी असूनहि चीनने वाटाघाटींना नकार दिला भारताच्या सबंध इतिहासात त्याने कधीहि बाहेरच्या मुलुखावर आक्रमण केले नाही आजहि भारतामध्ये राज्यविस्तार-तृष्णा

नाही पण चीनमध्ये ती दिसते हे चीनचे आक्रमण आहे असे मला वाटते आणि आक्रमणाचा प्रतिकार करणे हा धर्म आहे असे समजून भारताने सीमेवर सैन्य पाठवले पण तरीहि भारताने आपली निर्वैर वृत्ति कायम राखावी हा संघर्ष फार दिवस टिकणार नाही कारण संघर्ष टिकेल तर दुनिया टिकणार नाही चीन व भारत कायमचे शेजारी म्हणून रहायचे आहेत याचा या क्षणीहि विसर पडू देता कामा नये धर्मयुद्ध समजून भारत आज लढत असला तरीहि विज्ञानयुगात हिंसेला स्थान नाही व वेगवेगळी राष्ट्रें टिकणार नाहीत, जगाचे एक राज्य होणार आहे, हे सर्व लक्षात ठेवावे"

विनोबाच्या या भूमिकेवर चोहीकडून हल्ले झाले पश्चिमेच्या शांतिवादी मित्रांना वाटले की विनोबा जयजगत्‌ची भूमिका सोडून राष्ट्रवादी बनत आहेत सर्वोदय कार्यकर्त्यांनाहि या परिस्थितीत नक्की काय करायचे तें कळेना पण भारतीय जनतेला विनोबाची भूमिका समजत होती, पटत होती 'वीर कायरहि नसतो आणि क्रूरहि नसतो आपली सेना क्रूरतेने लढून विजयी झाली तर ती आपल्यावरच अत्याचार करेल त्याचप्रमाणे देशात भित्रेपणा राहील तर देश रसातळाला जाईल . म्हणून सैन्याने खरी वीरवृत्ति राखावी या काळात कोणताहि देश नुसत्या सैन्याच्या जोरावर लढू शकत नाही सैन्याच्या मागे जनतेची शक्ति हवी आळस, विलासप्रियता, स्वार्थ, कलह कायम ठेऊन आपण आपल्या देशाचे रक्षण करू शकणार नाही'

ऋषि हे कालदर्शी असतात, त्यांना दूरचे दिसते असे म्हणतात १९४४ साली जेलमध्ये असताना विनोबांनी आपल्या सहकाऱ्यांना सांगितले होतें की यापुढे भारतावर आक्रमण ईशान्य दिशेकडून होणार आहे १९५१ पासून भारताच्या खेड्यापाड्यात अखंड संचार करीत ते जनतेला जागवीत होते, पुढे घडणाऱ्या घटनेची सूचना देत होते तेलंगणाच्या यात्रेंतच त्यांना दिसले होते की चीनकडून विचाराचे आक्रमण होणार आहे त्या आक्रमणाचा प्रतिकार विचाराच्या पातळीवरच होऊ शकेल भारताने अहिंसेच्या करुणेच्या मार्गाने भूमिसमस्या, गरीबी, विषमता इत्यादींचे निराकरण केले तरच भारत टिकेल-१९५७ साली देशात सर्वत्र 'हिन्दी चिनी भाई भाई' चा उद्‌घोष होत असताना देखील त्यांनी येलवालच्या ग्रामदान परिषदेंत सांगितले की ग्रामदान हे डिफेन्स

मेझर आहे देशाच्या रक्षणाकरता काय काय केले पाहिजे ते विचार वा कृतीद्वारे अखंड सांगत असताना जेव्हा लोक त्यांना विचारीत की तुम्ही कशाला एवढे पायी हिंडण्याचे कष्ट घेता ? तेव्हा ते उत्तर देत की, ' मला समोर संकट दिसते आहे त्याचा प्रतिकार आतापासून करायला हवा हे तुम्हाला सांगण्याकरता मी पायी हिंडतो आहे ' भारत व चीनच्या संघर्षाचे स्वरूप वैचारिक आहे, आणि या दोन देशांच्या संबंधावर विश्वशांति किंवा विश्वविनाश अवलंबून आहे याची ते सतत जाणीव करून देत.

त्याचवेळी तिकडे क्युबात भयंकर परिस्थिति निर्माण झाली होती. रशिया आणि अमेरिका दंड थोपटून समोरासमोर उभे होते. जराशी ठिणगी पडली की आणविक अस्त्रे फेकली जाणार नी जग भस्मसात होणार अशी भीति निर्माण झाली होती तेवढ्यात रशियाचे राष्ट्रपति क्रुश्चेव्ह यानी पाऊल मागे घेतले आणि जगाने सुटकेचा निश्वास टाकला याबद्दल क्रुश्चेव्हचे अभिनंदन करीत विनोबा म्हणाले, "लढाईच्या मैदानात उतरायलाहि हिंमत लागते आणि शांतीच्या मैदानात उतरायलाहि हिंमत लागते क्रुश्चेव्ह हिंमतीने शांतीच्या मैदानात उतरला"　　भारताच्या उत्तर सीमेवर लढाई थांबल्याची व चीनची विजयी सेना परत जात असल्याची बातमी आली. कुणाचा यावर विश्वास बसेना विनोबा म्हणाले, "आज जगाची एक विवेकबुद्धि ( वर्ल्ड कान्शन्स ) तयार झाली आहे सुवेझ कालव्याच्या प्रश्नावर इंग्लडने इजिप्तवर हल्ला केला तेव्हा सारे जग खवळून उठले, इंग्लंडमध्येंहि जनमताने विरुद्ध कौल दिला आणि इंग्लंडला पाऊल मागे घ्यावे लागले. मागच्या शतकात इंग्लडने भारताला गिळून टाकले तरी कुणाला पत्ताहि लागला नाही पण आता जगात कुठेहि जराशी घटना घडली तरी त्याचा संबंध जगावर परिणाम होतो चीन रणांगणावर जिंकला पण जागतिक जनमताच्या फटवर हरला. जागतिक जनमत त्याच्या विरुद्ध गेले म्हणून त्या फटवरहि विजय मिळवण्याच्या हेतूने तो परत जात आहे रणांगणातील विजयापेक्षा जगाची सहानुभूति मिळवण्याच्या फटवरचा विजय अधिक महत्त्वाचा आहे"

लोक विचारीत आता तुमची अहिंसा काय कामाची ? विनोबा उत्तर देत, " हिंसा-शक्ति तारक देवता आहे असे तुम्हाला वाटते तर मग देशाच्या

आतले प्रश्न सोडविण्यात हिंसेचा उपयोग करू नये असे तुम्ही का म्हणता ?

अतर्गत क्षेत्रात अहिंसा हवी ह सर्वमान्य आहे, आतरराष्ट्रीय क्षेत्रात अजून अहिंसा मान्य व्हायची आहे अहिंसेचे पाच दावे आहेत—(१) अहिंसा अतर्गत क्षेत्रात शातता राखू शकते (२) अहिंसेद्वारा देशात भिन्न भिन्न पक्षात एकता व अविरोध स्थापन होऊ शकतो (३) उत्पादन, उद्योग वाढवणे, गरीबाना मदत देणे इत्यादि कामें करु शकते (४) शेजारी, मित्र राष्ट्रे किंवा शत्रु समजल्या जाणाऱ्या राष्ट्राशीहि अहिंसा कुशलतेनें वाटाघाटी करुन त्याना डिस् आर्म (निरुत्तर) किंवा विन ओव्हर (जिंकू) करू शकते. (५) लढणाऱ्या वीराना क्रूर वनू देत नाही (६) शत्रूच्या आक्रमणाचा मुकावला करून त्याला थोपवू शकते यापैकी पहिले पाच दावे मान्य आहेत, सहावा अजून मान्य व्हायचा आहे आतरराष्ट्रीय क्षेत्रात अहिंसेच प्रयोग आता करायचे आहेत ग्रामदान शातिसेनेचे काम असे आहे की त्यायोगें सरकारच्या राष्ट्ररक्षणाच्या कामात मदतहि मिळू शकते व त्या कामाद्वारे युद्ध थाबून मैत्रीहि होऊ शकते आज सर्वोदय विचार सर्वस्वी अकुंठित आहे"

बगालच्या यात्रेत विनोबा रवीन्द्रगीताचे सतत अध्ययन करीत असत. रोजच्या सभाचा आरभ सुरेल रवीन्द्रगीताने होत असे सर्वोदयाचा विचार रवीन्द्रानी आपल्या गीताद्वारे आधीच सागून ठेवला आहे, असे ते नेहमी म्हणत व रवीन्द्रगीतावर भाष्य करीत ' रवीन्द्रनाथ हे भारताचे सेंटिनल (प्रहरी) होते भारताने सकुचित राष्ट्रवादाच्या जाळ्यात अडकू नये, विश्वव्यापक दृष्टि राखावी व विश्वाची सेवा करावी असे त्यानी शिकवले 'मोरे डाकिल्ये जा, मुक्तद्वारे, तोमार विश्वर सभाते' या गीतात त्यानी 'जय जगत्' चा विचार माडला आहे 'अतर मम विकसित करो, अतरतर हे' या गीताद्वारे त्यानीं एक सूक्ष्म आध्यात्मिक विचार माडला आहे-अतर, अतरतर व अतरतम ही एक बाजू व बाह्य, बाह्यतर व बाह्यतम ही दुसरी बाजू आहे आम्ही दोहाच्या मधोमध आहोत फक्त आध्यात्मिक विकास किंवा फक्त भौतिक विकास हें आमचे ध्येय नसून दोहाचा विकास ह ध्येय आहे आत्मा व शरीर या दोहाचाहि विकास झाला म्हणजे माणसाचा पूर्ण विकास होतो भूदानयज्ञाद्वारे असा उभयविध विकास होईल" रवीन्द्रनाथाचे 'शाति निकेतन'

हे विनोबाच्या दृष्टीने एक आधुनिक तीर्थस्थान तेथील 'विश्वभारती' विद्यापीठात देशोदेशींचे लोक येत नी मानवतेची, विश्वात्मक दृष्टि घेऊन जात. तेथे जाऊन विनोबानी, गीतांजलि वाहून परमेश्वराची आराधना करणाऱ्या आनंदब्रह्माच्या उपासकाला, आधुनिक देवर्षीला, श्रद्धांजलि वाहिली

'स्वातंत्र्याच्या रक्षणाकरता हाती शस्त्र घेऊन लढावें लागले तरी वृत्ति निर्वैर राखावी' असे भारताचे राष्ट्रपति व पंतप्रधान सतत सांगत शांतिनिकेतनमध्ये पं नेहरूनी म्हटले की 'वैर किंवा द्वेषभाव न राखता लढायला पाहिजे' या विचाराचे विनोबानी स्वागत केले १९६२ च्या डिसेंबरमध्ये पं नेहरूनी विनोबांची भेट घेतली जाहीर सभेंत दोघांचीहि भाषणें झाली तेव्हा पं नेहरूनी म्हटले की 'दारिद्र्य हा आपला सर्वांत मोठा शत्रू आहे त्या शत्रूला खतम करण्याकरता सर्वांनी लढले पाहिजे' विनोबानी म्हटले की "ग्रामदान ग्रामस्वराज्य हा राष्ट्र-रक्षणाचा सर्वोत्तम उपाय आहे खेड्या-खेड्यात जमीनीची मालकी नाहीशी होऊन लोक एकदिलानें उत्पादनवाढीच्या व इतर विकासाच्या कार्याला लागतील, आपल्या गरजांच्या बाबतीत स्वावलंबी बनतील, आपल्या रक्षणाची जबाबदारी स्वतः उचलून शांतिसेना स्थापतील व निर्भयतेनें सर्व आक्रमणांशी असहकार करायला तयार होतील तर प्रत्येक खेडें अभेद्य किल्ल्याप्रमाणें बनेल जनतेंत निर्भयता, एकोपा, उद्योगप्रियता नसेल तर नुसत्या सेनेनें देशाचे रक्षण होऊं शकणार नाही"

नवद्वीप हें चैतन्य महाप्रभूंचे जन्मस्थान वंगालला वैष्णव धर्माची दीक्षा देऊन भक्तीचा धडा शिकवणाऱ्या चैतन्याच्या नवद्वीपात अखिल भारतातील सर्व प्रमुख खादीकार्यकर्त्यांचे संमेलन झाले खादी ग्रामोद्योग कमिशन द्वारें सरकार खादीकार्याला गेली काही वर्षें मदत देत आहे पण सरकारी मदतीच्या भरोशावर खादी कार्य चालेल तर तें निस्तेज होईल कमान बांधताना आधी आधार देतात व कमान तयार झाल्यावर आधार काढून घेतात त्याप्रमाणें सरकारी मदतीच्या आधारावर खादीकार्य वाढवून पुढे त्या मदतीविना, जनतेच्या पाठिंब्यावर खादीचे काम चालविले पाहीजे असे विनोबा नेहमी सांगत असत. नवद्वीपच्या सभेंत त्यांनी सांगितले की "चरख्याच्या आधारानें प्रत्येक खेडें वस्त्रासारख्या अत्यंत महत्त्वाच्या गरजेबाबत स्वावलंबी बनू शकेल अन्न-वस्त्रासारख्या आवश्यक वस्तूंचा लोकांना पुरवठा करण्यात सरकारची

शक्ति खर्च न होणें हें रक्षणाच्या दृष्टीनें आवश्यक आहे म्हणून खादी हें डिफेन्स मेझर आहे असे मी मानतो. बेकारीचा व वस्त्राचा प्रश्न सोडवून खादी राष्ट्ररक्षणात फार मोठी मदत करते. जनतेनें खादीचें काम उचलावें व गावोगावच्या लोकांनी आपापली खादी तयार करावी असे प्रयत्न झाले पाहिजेत."

सौम्य–सौम्यतर–सौम्यतम ही अहिंसक क्रांतीची दिशा आहे. ह्या दिशेनें चालताना बिहारमध्ये दात्यांनी स्वतः जमीनवाटप करावें, हें पुढचें पाऊल पडलें व पश्चिम बंगालात 'सुलभ ग्रामदाना'चें त्याहून पुढचें पाऊल पडलें. आरंभीच्या वर्षांत एखाद्या खेड्यातील सर्व लोकांनी आपल्या सर्व जमीनीची मालकी सोडली व प्रत्येक कुटुंबातील लोकांच्या गरजेप्रमाणें गावच्या सर्व भूमीचें पुर्नवितरण झालें म्हणजे त्याला ग्रामदान म्हणत. पुढें त्यात फरक होऊन खेड्यातील लोकांपैकी निदान ऐंशी टक्के लोकांनी ग्रामदानपत्रावर सह्या केल्या आणि गावच्या सर्व जमीनीचा निदान शेकडा एक्कावन टक्के भाग त्यात आला तर तें ग्रामदान झालें असे जाहीर होई. निरनिराळ्या राज्यांतील सरकारांनी केलेल्या ग्रामदानाच्या कायद्यात या शेकडा प्रमाणात थोडेंफार फरक केले. ग्रामदानाच्या विचाराला अधिक सरल व लोकग्राह्य करीत 'सुलभ ग्रामदाना'चा विचार प्रकटला. विनोबा त्याविषयी म्हणाले की "ग्रामदानाचा विचार समाजप्रेरणेला पूर्णपणे अनुकूल असा आहे पण स्वार्थप्रेरणेला तितकासा अनुकूल वाटत नाही, असे आढळून आल्यामुळें दोन्ही प्रेरणांचा मेळ साधण्याची युक्ति मी शोधू लागलो. त्यातूनच सुलभ ग्रामदानाची कल्पना ध्यानात आली. यांत दोन्ही प्रेरणांचा, समन्वय असल्यामुळें सारा देश हें काम आनंदानें उचलून घेईल असा मला विश्वास आहे."

सुलभ ग्रामदानात खालील गोष्टी येतात. (१) खेड्यातील निदान ऐंशी टक्क्याहून अधिक लोकांनी आपल्या जमीनीची मालकी सोडावी (२) त्यात गावची कमीत कमी शेकडा एक्कावन टक्के जमीन यावी (३) प्रत्येकानें आपल्या जमीनीचा विसावा हिस्सा गावच्या भूमिहीनाकरता दान द्यावा. (४) उरलेली एकोणीस हिस्से जमीन पूर्वीप्रमाणें मालकाजवळ राहील व तो ती जमीन कसेल. त्याच्या व त्याच्या मागून त्याच्या वारसाच्या संमतिविना त्या जमीनीचे हस्तांतरण होणार नाही. (५) लहान गाव असल्यास गावच्या

सर्व प्रौढांची मिळून एक ग्रामसभा बनेल. मोठे गाव असल्यास प्रत्येक कुटुंबातला एक व्यक्ति ग्रामसभेचा सदस्य राहील. गावाचा सर्व कारभार ग्रामसभा पाहील. (६) प्रत्येक व्यक्ति दरवर्षी आपल्या उत्पन्नाचा एक हिस्सा (साधरणतः विसावा हिस्सा ) ग्रामकोष निर्माण करण्याकरता म्हणून ग्रामसभेला देत राहील. ग्रामसभा याधून बेकाराना काम देण्याकरता उद्योग सुरु करणें, अनाथाची व्यवस्था , शिक्षण व उपचाराची व्यवस्था, गावाचा आर्थिक विकास इत्यादि सर्व सामूहिक उत्थानाची कामें करील

ग्रामदानाचा विचार लोकाना पटे पण अनेक व्यावहारिक प्रश्न निर्माण होत. जमीनीची मालकी सोडल्यानतर कर्ज कसे मिळणार हा एक महत्वाचा प्रश्न आहे यावर विनोबा सागत की " ग्रामदानी गावातल्या लोकावर पूर्वीचें जे कर्ज आहे, ते परत करण्याची जबाबदारी आम्ही नाकारीत नाही. पण सावकाराना आमची अशी विनति आहे की लोकानी मालकी सोडून एवढा त्याग केला तर तुम्हीहि काही त्याग करा व कर्जाच्या रकमेंत शक्य तितकी सूट द्या. कधी कधी मूळ मुद्दलाच्या रकमेहून अधिक व्याज दिलेले असतें आणि तरीहि कर्ज कायमच राहते असा कर्जाची परत फेड मागू नका. तसेच ग्रामदानी गावाच्या विकासासाठी बिनव्याजी कर्ज देऊन या पवित्र कार्यांत हातभार लावा. कर्ज देण्याच्या कामी सरकारहि काही मदत करील." लोक विचारीत 'आमच्या मुलींच्या लग्नाला पैसा कुठून आणायचा नी मुलाची शिक्षणें कशी व्हायची ? कारण जमीनीची मालकी सोडल्यावर जमीन विकण्याचा किंवा गहाण ठेवण्याचा अधिकार राहत नाही मग काय करायचे ?' विनोबा यावर तोड सुचवीत " आज तुम्ही आपली जमीन विकू शकता. तुमची जमीनीची मालकी म्हणजे जमीन गमावण्याचा अधिकार आहे. ग्रामदानानतर तो अधिकार राहणार नाही पण पैशाची गरज पडली तर गावातल्या गावात जमीन गहाण ठेवली जाऊ शकेल पण गावची जमीन बाहेर मात्र जाऊ देता कामा नये. .... .आज लग्नकार्यांत वाटेल तसा पैसा उधळण्याची वाईट चाल आहे ती बदलली पाहिजे. गावातील सर्व घरातील लग्नें सामूहिक रीतीनें करावीं. ज्याच्या घरीं लग्न असेल त्याच्या घरची कवडीहि खर्च होऊ नये. प्रत्येक कुटुंबाने थोडी थोडी मदत करावी व सर्वांनी मिळून लग्न पार पाडावे.......शिक्षणाच्या पद्धतींतहि आपल्याला बदल करावा लागेल.

माझी तर इच्छा आहे की 'ग्रामे ग्रामे विद्यापीठम्' व्हावे प्रत्येक खेड्यात विद्यापीठ स्थापले जावें पण आज गावातील जी मुले बाहेर शिकत असतील त्याचे शिक्षण पूर्ण करण्याची जबाबदारी घ्यायला हवी"

आर्थिक विकासाच्या दृष्टीने विनोबा अनेक सूचना करतात पण निर्णय घेण्याचे काम गावकऱ्यानीच करावें, त्याच्यावर कोणाचेहि मत लादले जाऊ नये, सत्ता कोणत्या बाबूचीहि नको की बाबाचीहि नको, गावकऱ्याचीच हवी- गावातील कारभार कोणत्या वादानुसार चालेल असा प्रश्न विचारला जाई तेव्हा विनोबा सागत की गावात साम्यवाद नको की सर्वोदयवाद नको, ग्रामवाद हवा गावकऱ्यानी सल्ला अनेकाचा घ्यावा पण स्वतंत्र बुद्धीने विचार करून आपल्या गावाची योजना तयार करावी विनोबा गावकऱ्याना सल्ला देत "ग्रामदानी गावात एक सामूहिक दुकान असावें खाजगी व्यापाऱ्याचे पूर्वीचे दुकान असेल तर त्यालाच गावाच्या वतीनें सामूहिक दुकान चालविण्याची विनति करावी दरवर्षी दुकानाद्वारे कोणकोणत्या वस्तु किती खपल्या याचा हिशेब करून ग्रामसभेने असे ठरवावे की या वर्षी इतका कपडा खपला, पुढच्या वर्षी आपण गावात चर्खे आणून इतका हिस्सा कपडा गावातच निर्माण करू यावर्षी इतके तेल लागले आता पुढच्या वर्षी गावातच घाणी चालवून तेल काढू म्हणजे चागले शुद्ध तेल मिळेल व गावात एक उद्योगहि सुरू होईल याप्रमाणें गावाच्या शक्य तितक्या सर्व गरजा गावातच भागविण्याचा व गावाला लक्ष्मी- वान् समृद्ध करण्याचा प्रयत्न करावा आर्थिक उन्नतिसोबत नैतिक,आध्यात्मिक उन्नतिहि व्हायला पाहिजे तुम्ही कितीहि जोर मारलात तरी अमेरिकेइतकी समृद्धि काही इथे येणार नाही तरीहि अमेरिकेतले लोक तुमचे काम पाहण्या- करता इथे का येतात ? तुम्ही नैतिक मार्गानें आपले प्रश्न सोडवीत आहात- आर्थिक उन्नति करीत आहात, याचे त्याना आकर्षण वाटतें कारण आज जगाला त्याची गरज आहे"

बगालच्या मुर्शिदाबाद जिल्ह्यातील प्लासीच्या नावाचा भारताला कधी विसर पडणार नाही १७५७ मध्ये प्लासीच्या लढाईत इग्रजानी आपल्याला हरवले आणि भारताच्या गुलामगिरीचा आरभ झाला प्लासीमध्ये लागलेला हा कलक धुऊन टाकण्याकरता प्लासीचे ग्रामदान झाले पाहिजे असा विनोबानी जप सुरू केला 'प्लासीचे एक ग्रामदान मला शभर गावाच्या योग्यतेचे वाटते,

पण कार्यकर्ते म्हणत की प्लासीचे ग्रामदान होणें अशक्य आहे प्लासी हे चार हजार वस्तीचे एक मोठें गाव आहे तिथें हिंदु व मुसलमानाची समिश्र वस्ती आहे, लोक शिक्षित आहेत ग्रामदानात अजून एवढी मोठी गावें मिळाली नव्हती विनोबानी सेनापति या नात्याने प्लासीवर सर्व बाजूनी हल्ला चढविण्यास सागितलें सगळ्या प्रमुख विधायक कार्यकर्त्यांची फौज प्लासीवर स्वारी करायला गेली कस्तुरबा ट्रस्टच्या भगिनी गावच्या महिला-मोर्चावर लढू लागल्या, खादी कार्यकर्ते आर्थिक विकासाच्या मोर्चावर चढाई करू लागले आणि भूदान कार्यकर्त्यांनी विचाराच्या फटवर आक्रमण केलें अहिंसेची लढाई हृदयक्षेत्रात होते विनोबाची आई सागे 'देतो तो देव नी राखतो तो राक्षस, दानात् देव रक्षणात् राक्षस ' प्लासी निवासीयाच्या हृदयक्षेत्रावर देव आणि राक्षसाचा घनघोर सग्राम सुरू झाला अखेरीस देवाचा विजय झाला, जुने प्लासी पडले, नवें प्लासी नवजीवन घेऊन उठून उभे राहिले प्लासीला जाण्याकरता विनोबानी आपल्या ठरलेल्या कार्यक्रमात बदल केला प्लासीचे ग्रामदान विनोबाना अर्पण झाले इग्रजाना शरण जाऊन पूर्वी प्लासीनें गुलामीचे बीज पेरले होतें, आता त्याच प्लासीने खऱ्या स्वातंत्र्याचे, ग्रामस्वराज्याचे बीजारोपण करून बगालला मुक्तीचा मार्ग दाखवला

मुर्शिदाबाद जिल्ह्यातले एक मोठें गाव सुशिक्षित ब्राह्मणाची वस्ती. आपापसातल्या भाडणामुळें गावात दोन तट पडलेले कितीतरी दिवसापासून कोर्टांत केस चाललेली या गांवांत ग्रामदान होणें अशक्य आहे, असेच सर्वांचे मत विनोबांनी सांगितले की "गावागावात अशी भाडणें नी द्वेष मत्सर चालू राहील तर या देशाचे स्वराज्य कसे टिकेल ? राष्ट्रांच्या इमारतीचा पहिला मजला म्हणजे गाव शहरें म्हणजे वरचे मजले खालचा मजला कोसळला तर वरचे टिकतील का ?" गावकरी विचार करू लागले ग्रामदानांत गांवाचे हित आहे, हें त्याना पटू लागले विनोबा म्हणाले आधी भाडण मिटवा, केस कोर्टांतून काढून घ्या गावकरी तयार झाले गावाचे ग्रामदान जाहीर झाले विनोबा म्हणतात काल प्रवाह ग्रामदानाला अनुकूल आहे, जे कालची राखून ठेवू पाहतील, झगडे चालू ठेवतील ते कालप्रवाहाच्या विरुद्ध दिशेनें पोहण्याचा प्रयत्न करतील आणि म्हणूनच मार खातील नी हार खातील.

गांधीजींच्या काळांत बंगालनें अहिंसा-विचार मान्य केला नव्हता बंगालमध्यें पूर्वीपासून दहशतवादाचे, हिंसक कर्मयोगाचे आकर्षण होतें आतां वाढत्या असंतोषाबरोबर साम्यवादाचा जोरहि वाढत होता फाळणीमुळें बंगालचें चित्त अस्थिर अशांत व अस्वस्थ झाले होतें अशा बंगालमध्यें ग्रामदानाचा विचार वेगाने पसरू लागला, असंख्य वाटणाऱ्या गांवांचे ग्रामदान होऊं लागलें वैचारिक पातळीवर ग्रामदानाच्या विचाराला फारसा कुणाचाच विरोध राहिला नाही हे सर्व पाहून विरोधकांच्या मनात मंथन सुरू झाले १९५७ पर्यंत सर्वोदय कार्यकर्त्यांत दिसणारा क्रांतीचा उत्साह पुढें ओसरू लागला होता भूमिसमस्या अजून सुटली नाही या भावनेनें पुढें पुढें निराशाहि भासू लागली होती. भूदान-ग्रामदानाचे काम पुरेसें नाही, क्रांतीचे नवें तंत्र शोधून काढलें पाहिजे असाहि सूर निघू लागला होता विनोबा 'एकहि साधे सब सधे, सब साधे सब जाये' या वचनानुसार भूदान-ग्रामदानाचा अखंड जप नी त्याकरतां तप करीत राहिले ते जिथें जिथें जात तिथें तिथें ग्रामदानें मिळतहि होती पण देशभरचें काम मंदावले होतें बंगालच्या ग्रामदानानीं सर्व कार्यकर्त्यांना नवी चेतना दिली त्यातच चीनच्या वैचारिक आक्रमणाला, अहिंसेच्या, लोकशाहीच्या मार्गानें नवी समाज-रचना उभारून च उत्तर देता येईल, भूमिसमस्या,दारिद्र्य कायम राहील तर केवळ सेनेच्या बळावर चीनचा मुकाबला केला जाऊं शकणार नाही. हेंहि तीव्रतेनें जाणवल्यामुळें जयप्रकाशजींनी देश विदेशांतली त्यांची इतर सारी कामें हमीत कमी करून बिहारच्या गया जिल्ह्यात ग्रामदानाच्या कामात 'सोनपत पानपत' होऊं द्या, अशा निर्धारानें आपली शक्ति लावण्याचा संकल्प केला, तेव्हां विनोबा प्रसन्न होऊन म्हणाले "सेकंड फ्रंट उघडला गेला गेली दोन तीन वर्षें माझ्या एकट्याच्याच फ्रंटवर लढाई चालू होती"

बंगालच्या कम्युनिस्टांना विनोबांनी आवाहन केले की "ग्रामदानाद्वारें क्रांतीचें प्रत्यक्ष दर्शन इथें घडतें आहे, तेव्हां तुम्हीहि या कामात भाग घ्या आज देशात तुमच्यावर कुणाचा विश्वास नाही आणि त्याला कारणेंहि तशीच आहेत तरी पण मी तुमच्यावर विश्वास ठेवून तुम्हाला आवाहन करीत आहे चीनच्या आक्रमणाच्या प्रतिकाराच्या कामात सरकारशी सहकार्य करण्याचा तुम्ही जो ठराव केला आहे त्याबद्दल मी तुमचे अभिनंदन करतो

व त्यावर विश्वास ठेवून तुम्हाला ग्रामदानाच्या कामात सहकार्य देण्याविषयी विनंति करतो तुम्ही माझ्याकडे या व मला आपला विचार पटवून देण्याचा प्रयत्न करा आणि माझा विचार तुम्हाला पटल्यास माझे काम करा. तुम्ही मला कनव्हर्ट करा नाहीतर स्वत कन्व्हर्ट व्हा " या आवाहनानंतर अनेक कम्युनिस्ट नेते व कार्यकर्ते विनोबाना भेटले व पुष्कळानी ग्रामदानाचे कामहि केले विचाराच्या फटवर विनोबाचे सतत हल्ले चालूच असत. "जगातला अंतिम संघर्ष साम्यवाद व सर्वोदय या दोन विचारात होणार आहे-कारण ते दोनच 'समग्र जीवन-दर्शन' या संज्ञेस पात्र ठरणारे विचार आहेत इंग्लंड-अमेरिकेजवळ शस्त्रास्त्रे व साधनसामग्री भरपूर आहे; पण विचार नाही करुणेच्या मार्गाने साम्य येऊ शकतें, शासनमुक्त समाज स्थापित होऊ शकतो हा सर्वोदयाचा दावा आहे तो सिद्ध करून दाखविल्या-शिवाय साम्यवादाला पराभूत करता येणार नाही "

हुगळी जिल्ह्यातले कामारपुर हे रामकृष्ण परमहंसाचे जन्मस्थान अमेरिकेंत वेदांताची गर्जना करणाऱ्या विवेकानंदाच्या गुरूचा जन्म एका लहानशा तळ्याच्या काठी झोपडीत झाला. शारदामातेचें जन्मस्थान तेथून दोन मैलावर सहस्र धारानी सागराला भेटायला निघालेल्या गंगेच्या या प्रदेशात रामकृष्णाचे सतत स्मरण करीत विनोबा जनतेला सांगत की " आपल्याला सर्वोदय-विचाराचे गंगाजळ घेऊन पीकिंगला जायचे आहे ग्रामदान-ग्रामस्वराज्याद्वारे करुणामूलक साम्याचा, सर्वोदयाचा विचार देशात प्रतिष्ठित करून मग तो जगभर न्यायचा आहे पीकिंग, मास्को, लंडन, न्यूयॉर्क या सर्व ठिकाणी सर्वोदय विचाराचे गंगाजल घेऊन जाण्याचा व त्या गंगाजलाने तेथील जनतेला शांति व समाधान देण्याचा नवा पराक्रम करायचा आहे " चीनच्या आक्रमणाचा प्रतिकार व स्वातंत्र्याचे रक्षण करणें एवढेच आपलें काम नाही, आपल्याला चीनवर विचार व प्रेमाचे प्रतिआक्रमण करायचे आहे, सर्वोदय विचार साऱ्या जगात न्यायचा आहे" असे सांगून विनोबा भारत-वासीयाना त्यांच्या स्वधर्माचे भान करून देत मनुने हजारो वर्षांपूर्वी लिहून ठेवले होतें—

'एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मन ।
स्व स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्व मानवा ।'

"या देशात जन्मलेल्या ज्ञान्याकडून पृथ्वीवरचे सर्व मानव आपापल्या धर्माचे शिक्षण घेतील.' विज्ञान-युगाच्या समस्या सोडविण्याचे सामर्थ्य भारतांत प्रकटलेल्या सत्याग्रह-दर्शनात च असल्यामुळे ईश्वराने भारतावर एक विशेष जबाबदारी टाकली आहे.

गंगासागर हे बंगालचे फार मोठे तीर्थस्थान. संक्रातीला तिथे यात्रा भरते. येथेच गंगा सागराला भेटते आणि आपले स्वतंत्र अस्तित्व सागरात लीन करते. जणू भक्त भगवतात विलीन होऊन जातो. पदयात्रेच्या मार्गात, गंगासागर येत नव्हतें पण विनोबा थोडी वेगळी वाट घेऊन गंगासागराला गेले. दक्षिणेंत कन्याकुमारीला नी काश्मीरात हिमशिखरावर ध्यान केल्यानंतर त्यानी गंगासागराचें तिसरे टोक गाठले. आणि ग्रामस्वराज्याच्या संकल्पाचा त्रिवार जप केला वाटेंत चोवीस परगणा या कलकत्त्याजवळच्या जिल्ह्यात ग्रामदाने मिळत गेली. गंगासागराची यात्रा आटोपून विनोबांनी कलकत्त्यात प्रवेश केला. कलकत्ता हे भारतातले सर्वांत मोठे नगर, सुमारे साठ लाख लोकवस्तीचे, असंख्य समस्याचे माहेरघर. माणसाला तेथे जगावे लागणारे भयानक जीवन पाहून पाषाणातूनहि करुणा फुटेल! राजा राममोहन रॉय पासून सुभाषबाबूपर्यंत अनेक थोर पुरुषाच्या सहवासाचा लाभ या नगराला घडला होता स्वामी विवेकानंद, रवीन्द्रनाथ, चित्तरंजन दास वगैरे कितीतरी नावे घेऊन विनोबा म्हणाले 'मी नावें तरी किती घेऊ ? या कलकत्त्यावर अनेक सत्पुरुषाचा, नेत्याचा वरदहस्त राहिला आहे. अशा या नगरीत अहिंसक क्रांतीच्या कार्यालाहि गति मिळाल्यावाचून कशी राहील ? कलकत्त्यातील मुक्कामात विनोबानी ग्रामदान व शांतिसेनेची वैचारिक बैठक समजावून सांगितली. व्यापारी, अध्यापक, वैज्ञानिक, चित्रपट-व्यवसायी, साहित्यिक इत्यादि सर्व भिन्न भिन्न वृत्ति, प्रकृति व व्यवसायातील लोक विनोबाना भेटले. व्यापाऱ्याच्या बैठकीत विनोबानी सांगितले की "आज व्यापारी दडपणामुळे व लोभामुळे राजकीय पक्षाना पैसा देतात व त्यामुळे स्वत चा आणि समाजाचा घात करतात. व्यापाऱ्यांनी राजकीय पक्षाना पैसा देऊ नये व त्यामुळे होणारा त्रास निर्भयतेनें सोसावा म्हणजे सामाजिक जीवन सुधारेल. व्यापाऱ्यानी सरकारला पैसा द्यावा कारण सरकारचा पैसा सर्व जनतेसाठी खर्च होतो व सर्वोदयासारख्या सर्वांच्या कल्याणाच्या कामा करता दान द्यावे.

ग्रामदानाद्वारें होत असलेल्या करुणामूलक क्रांतीच्या कामाला सहाय्य देणें हें व्यापाऱ्याचे कर्तव्य आहे त्यानी तें कर्तव्य पार न पाडल्यास मत्सरमूलक क्रांति होईल ग्रामदानी गावाच्या विकासाची जबाबदारी व्यापाऱ्यानी घ्यायला हवी त्या गावाना मदत व बिनव्याजी कर्ज द्यावें निदान खाद्य वस्तूत व औषधात तऱ्हे मिश्रण न करण्याची व समाजाला शुद्ध वस्तु पुरवण्याची त्यानी प्रतिज्ञा करावी खाद्य वस्तूत व औषधात भेसळ करण्याइतका भयकर अपराध दुसरा कोणताच नसेल " अशा तऱ्हेची भेसळ न करण्याची प्रतिज्ञा व्यापाऱ्याकडून घेवविण्याची चळवळ विनोबानी बगालयात्रेत सुरू केली सुमारे दान अडीचशे व्यापाऱ्यानी त्या प्रतिज्ञापत्रकावर सह्या केल्या

गो सेवा सघाच्या कार्यकर्त्यांना नवी दृष्टि देत विनोबानी सागितले की "भारताने गायीला आपल्या कुटुबात दाखल केले आहे गायीचे रक्षण करणें हा भारतीय समाजवादाचा एक भाग आहे गोरक्षणाच्या कार्यात वैज्ञानिक दृष्टि ठेवली पाहिजे " इथें कालीमातेच्या देवळात बकऱ्याचे बळी रोज दिले जातात मुक्या जनावराच्या रक्ताने मदिर माखले जाते या पद्धतीवर विनोबानी विचाराचा प्रहार करीत म्हटले की "या विज्ञानयुगात धार्मिक अधश्रद्धा व खुळचट कल्पना टिकणार नाहीत विज्ञानाच्या कसोटीवर प्रत्येक धर्म घासला जाईल व त्यातून खरा धर्म— आध्यात्मिकता–उज्ज्वल रूप घेऊन बाहेर येईल कालीमातेसमोर दुबळ्या पशूचा बळी देणें अत्यत चूक आहे कालीमाता ही सर्व विश्वाची माता आहे आपल्याच मुलाना खाणारी आई कोणी कधी पाहिली आहे का? तेव्हा तिला बळी पाहिजे असता असे मानण्यात विचारदोष आहे " विनोबाच्या या भाषणाचा वृत्तान्त काही स्थानीय वृत्तपत्रानी अतिशय विकृत करून छापल्यामुळे सगळीकडे खळबळ उडाली हावडयाच्या मुक्कामात काही जातीयवाद्यानी विनोबावर दगडफेक केली व सभा उधळून लावण्याचा प्रयत्न केला विनोबानी भाषण न देता नुसतीच मौन प्रार्थना केली पण प्रार्थनेनंतरहि त्या लोकानी घोषणा चालू ठेवल्या

विनोबानी कुराणातील निवडक वेचे निवडून त्याचे वर्गीकरण करून तयार केलेल्या 'कुराण-सार' या पुस्तकाचा प्रकाशन-समारभ कलकत्त्यात

झाला. नगरातील सर्व प्रमुख मुसलमान पुढाऱ्यांची एक सभा झाली व त्यांनी या पुस्तकाचे स्वागत करीत म्हटले की 'विनोबांनी इस्लामची फार मोठी सेवा केली आहे." पुस्तक प्रकाशित करण्याचा उद्देश हृदये जोडणें हा आहे. विज्ञान-युगात संकुचित धर्म सोडून शुद्ध आध्यात्मिकता घ्यायची आहे. धर्मांतील असार टाकून सार घ्यायचें आहे " या नंतर भाषेविषयीं आपले विचार व्यक्त करीत म्हटले की "उर्दू ही मुसलमानांची भाषा आहे असे मानणें चूक आहे. उर्दू ही या देशातील इतर भाषाप्रमाणें एक भाषा आहे. हिंदी व उर्दू या दोन भाषा नाहीत, दोन्ही मिळून एकच भाषा आहे दोन्हींचें व्याकरण सारखें आहे. फरक एवढाच आहे की हिंदीत संस्कृत शब्द अधिक येतात तर उर्दूत अरबी फारसी शब्द अधिक येतात... मुसलमानांनी स्थानीय भाषा आत्मसात् करून लोकांत मिसळून जावें. ... प्रत्येकानें आपल्या धर्मग्रंथासोबत इतरहि धर्मग्रंथाचें अध्ययन करावें "

कलकत्यात सुमारे दहा हजार चिनी लोक राहतात. त्यांतील बहुतेक सर्व शंभर वर्षांपासून इकडे आलेले आहेत. त्यांतील बरेचसे जोडे तयार करण्याचा धंदा करतात. चीन भारत संघर्षाच्या काळातहि भारतीय जनतेची वागणुक अनुदार नव्हती; याविषयीं त्यांना फार कृतज्ञता वाटते. 'चायना टाऊन' भागातून विनोबांची यात्रा झाली तेव्हा चिनी समाजातर्फें शेकडों बालकांनी व प्रौढांनी विनोबांचे स्वागत केलें. हा पायीं चालणारा संत पाचला येणार म्हणून अर्ध्या रात्रीपासून ती चिनी बालके प्रतीक्षा करीत उभी होती. विनोबांनी त्यांना सांगितले की "ह्या भारतभूमीनें हजारो वर्षांपासून सर्वांचे स्वागत केले आहे. व भरणपोषण केले आहे. हा देश सर्व मानवांचा आहे; तेव्हा तुमचाहि आहे तुम्ही इथे प्रेमानें रहा, काम करा. खूप शिका. या देशात तुम्हाला प्रेम व आत्मीयताच मिळेल असे भारतीय जनतेतर्फें मी तुम्हाला आश्वासन देतो." परस्पर स्नेहभाव वाढण्याकरता परस्परांच्या भाषा शिकणें आवश्यक आहे. विनोबांनी शांतिनिकेतनच्या 'चीना-भवन' च्या एका शिक्षकाच्या मदतीनें चिनी भाषेचा अभ्यास केला व नागरी लिपीद्वारें चिनी भाषा शिकण्याकरता पुस्तकें तयार करण्याचें काम 'चीना-भवन' वर सोंपविलें. चीन व जपानची चित्रलिपी फार कठिण असल्यामुळें त्यांना नवी सोपी व शास्त्रीय दृष्टीनें योग्य अशी लिपी हवी आहे भारताच्या सर्व

आपानी नागरी लीपीचा स्वीकार केला तर पुढेमागे चीन-जपानहि नागरी लिपीचा स्वीकार करतील अशी मला आशा आहे" असे विनोबानी सागितले.

कलकत्यातील नागरिकाना विनोबानी शातिसेनेचे काम हाती घेण्याविषयी सागितले "देशात अशाति राहील, दगेधोपे चालू राहतील तर देशाचे सैन्य सीमारक्षणाऐवजी अतर्गत शाततेच्या कामीच लावावे लागेल तेव्हा देश-रक्षणाकरता सैन्याची आवश्यकता आहे, असे मानणाऱ्यानी देखील अतर्गत शाततेकरता शातिसेनेच्या कामात सहकार्य करायला पाहिजे या कामाला पूर्ण वेळ देणारे शाति-सैनिक व आशिक वेळ देणारे शाति-सेवक प्रत्येक मोहोल्यात असावे, त्यानी रोज तासभर तरी सेवेचे काम करून नागरिकाचा स्नेह व विश्वास सपादन करावा आणि दगा झाल्यास शातिस्थापनेच्या कामाकरता प्राणार्पण करण्याचीहि तयारी ठेवावी" कलकत्यात सुमारे दोनशे व्यक्तीनी शाति-सेवकाच्या प्रतिज्ञा-पत्रकावर सही केली त्यातील बहुतेक सर्व उच्चविद्या-विभूषित होते

बगालच्या मुख्य मत्र्याना ग्रामदानात विशेष आस्था असल्यामुळें त्यानी बरेंच सहकार्य दिले बगाल प्रादेशिक कॉंग्रेस कमीटीने ग्रामदानाविषयी ठराव केला एकदा सरकारी अधिकाऱ्यासमोर बोलताना विनोबा म्हणाले "सर्वोदयवाले म्हणून काही वेगळी जात नाहीं. सगळे लोक माझे कार्यकर्ते आहेत तुम्ही पगार सरकारकडून घ्या व काम बाबाचे करा म्हणजे गरीबाच्या सेवेची दृष्टि राखून काम करा" 'अवघे जन सज झाले लोकपाळ सोईरे सकळ प्राणसखे' अशी विनोबाची स्थिति विकास-खडाच्या अधिकाऱ्याना त्यानी नवी व्याख्या सागितली 'बी डी ओ म्हणजे भूदान डेव्हलपमेंट ऑफिसर नी एस डी ओ म्हणजे सर्वोदय डेव्हलपमेंट ऑफिसर सगळे मिळून गरीबाची गरीबी नी दु खिताचे दु ख दूर करण्याच्या कामाला लागू या"

बगालनतर पुन्हा ओरिसा "आता मला पूर्ण ओरिसाचेच दान हवें आहे, इथें पूर्ण क्राति झाली पाहिजे—" विनोबानी पुढचे पाऊल घेतले ओरिसाच्या कार्यकर्त्यांनी आव्हान स्वीकारले लहान लहान कार्यकर्ते ग्रामदानें मिळवू लागले रमादेवी चौधरीच्या तालमीत तयार झालेल्या ल्हान मुली देखील खेडयापाडयात जात, विनोबा विचार सागत नी ग्रामदान मिळवीत ओरिसा यात्रेच्या व्यवस्थेचेहि काम स्त्रियाकडे होते युग बदलत चालल्याची

लक्षणें प्रकटू लागली कोरापुटमध्यें गेल्या काही वर्षांत चढउतार येऊनहि ग्रामस्वराज्याचे काम मूळ धरू लागले होतें विनोबांनी आपल्याकडे यावें म्हणून कोरापुटचे लोक अधिकाधिक ग्रामदानें करण्याच्या प्रयत्नाला लागले

बलांगीरचे राजेसाहेब स्वतंत्र पक्षाचे एक नेते आहेत ग्रामदानामुळे व्यक्ति-स्वातंत्र्यावर घाला तर नाही ना येणार अशी त्यांच्या मनात शंका होती विनोबांनी शंका निरसन करीत म्हटले, "ग्रामदानात व्यक्ति आपापली शक्ति समाजाला समर्पण करील आणि समाज व्यक्तीचे स्वातंत्र्य अबाधित राखेल ग्रामदानात स्वातंत्र्य आणि समर्पण या दोहोंचा सुंदर संगम होतो"

अजमेरच्या १९५९ च्या फेब्रुवारीतील सर्वोदय-संमेलनानंतर चार वर्षे विनोबा सर्वोदय-संमेलनाला हजर राहिले नव्हते त्याला त्यांनी 'नेतृत्वमोचन प्रक्रिया' असे नाव दिले 'अहिंसेच्या विकासात नेतृत्वाची गरज राहू नये गणसेवकत्वाचा विकास व्हावा.' विनोबा कार्यकर्त्यांना म्हणत की 'माझ्यावाचून काम चालवायला शिका' त्याप्रमाणें नेत्याशिवाय काम चालवण्याचा बराच अभ्यास झाल्यानंतर १९६३ अंती मध्यप्रदेशात रायपूर येथें भरणाऱ्या पंधराव्या सर्वोदय-संमेलनाला हजर राहण्यास विनोबांनी संमति दिली आणि ओरिसातून महासमुन्द तहसिलीतून मध्यप्रदेशात प्रवेश करून नाताळच्या आरंभी ते रायपुरला पोहोचले

गेली चार वर्षे विनोबाचे दर्शनहि न घेता एकलव्याप्रमाणें त्यांचे काम करणारे देशभरचे शेंकडो कार्यकर्ते आणि सर्वोदय-प्रेमी मंडळीचा एक जंगी मेळावा भरल्यामुळे रायपूरच्या संमेलनाला आगळेंच महत्त्व प्राप्त झाले विनोबांनी त्या मेळाव्याला 'वेड्यांचा समाज' (पागलोंकी जमात) असे म्हटले साऱ्या जगात सामाजिक क्रांति करायची अन् ती करुणेच्या मार्गानें, भली मोठी सेना तयार करायची अन् ती शांतीची, जोरदार लढाई लढायची अन् ती हृदयाच्या रणमैदानावर, हाती शक्तिशाली शस्त्रास्त्रें घ्यायची अन् ती विचार व प्रेमाची, विश्वराज्य स्थापायचे अन् तें ग्रामस्वराज्य निर्माण करून, आध्यात्मिक साधना करायची अन् हिमालयाच्या गुहेतल्या एकांतात न जाता, मुक्ति मिळवायची अन् ती स्वतःकरता नव्हे तर सर्वांकरता—हा सारा निव्वळ वेडेपणा, पागलपणाच मानला जाणार पण विनोबा सांगत होते अजून आपण सर्व पूर्ण पागल बनला नाही, ते बनायचे आहे तुकाराम

महाराज सागतात—'आम्ही बिघडलो तुम्ही बिघडाना' आणि मीराबाई म्हणते—'लोग कहे मीरा भई रे बावरी '

रायपूरच्या समेलनानतर विनोबानी आपल्या प्रातात यावें म्हणून प्रत्येकाचा आग्रह होता कोरापुटवाले म्हणत हजार ग्रामदानें देऊ, तुम्ही या, तमिळनाडवाले म्हणत दक्षिण दिशा तुमची वाट पाहते आहे, मध्यप्रदेशवाल्याना वाटे, आताच तर तुम्ही आमच्याकडे आलात, लवकर नाही जाऊ देणार, अन् महाराष्ट्रीय मडळी तर होकाराशिवाय दुसरे उत्तरच ऐकायला तयार नव्हती. बराच खल झाला अन् शेवटी जाहीर झाले की 'सहा एप्रिलला विनोबा सेवाग्रामच्या बापू-कुटीच्या दाराशी उभे राहणार ७ मार्च १९५१ ला त्यानी, सेवाग्राम सोडले तेव्हा आश्रमबालिका भजन गात होत्या 'सुने री मैंने निर्बल के बल राम' विनोबा अनुभवाचे बोल बोलले—'सुनें, नहीं, देखी रे मैंने निर्बल के बल राम'' 'निर्बलाला राम बळ देतो हे मी नुसतें ऐकलेच नाही तर अनुभवले आहे' त्याच बळावर विनोबा चालू लागले रामाच्या वानरसेनेनें बाधलेल्या सेतुपासून तो ब्रह्मविद्येकडे नेणाऱ्या हिमाचलरूपी सेतुपर्यन्त त्याचा अविरत अकुठित, अनिरुद्ध सचार चालला महीने सपले, वर्षे लोटली, बारा वर्षांचे तप सरलें आणि तरीहि सचार चालूच राहिला चरण धरणीवर नी चिंतन विश्वाचे, मार्ग करुणेचा नी कार्य क्रातीचे, पाय फिरते नी प्रज्ञा स्थिर ! 'सात मार्च १९५१ ला सेवाग्राम सोडून, सुमारे नेंचाळीस हजार मैलाची पदयात्रा करून सहा एप्रिलला १९६४ला बारा वर्षे अन् तेरा महिन्यानतर सेवाग्रामला पोहोचण्यात विनोबाच्या जवळजवळ दोन पृथ्वी प्रदक्षिणा पूर्ण होणार !

'काल करे सो आज कर ले, आज करे सो अब
पलमें परलय होता है, बहुरि करोगे कब'

'उद्या करायचे तें आज कर, आज करायचे तें आता कर, क्षणात प्रलय होईल मग तू करायचे तें केव्हा करणार ?' कबीराचा इशारा आठवीत विनोबानी रायपूरच्या सर्वोदय-समेलनात सागितले "१९६९ मध्यें गाधीजींची शतसवत्सरी येणार तोवर त्याचे काम पूर्ण करायचे आहे पाच लाख खेड्यात ग्रामस्वराज्य स्थापायचे, जमीन व सपत्तीची मालकी नाहीशी करून साम्ययोग स्थापायचा आहे त्याकरता ग्रामदान, शातिसेना आणि ग्रामाभिमुख खादीचा त्रिविध कार्यक्रम हाती घ्यायचा आहे सगळे मिळून अनन्यभावानें या त्रिमूर्तीची

उपासना करू लागतील तर १९६९ पूर्वी गांधीविचाराची प्रतिष्ठापना झाल्यावाचून राहणार नाही वेळ फार थोडा उरला आहे एकेक क्षण मोलाचा आहे"

"राम-कृष्ण-हरि माझें नाव मिटो, रामनाम राहो, माझें कांहीच नसो, सारें कृष्णार्पण असो, माझी इच्छा जावो, हरीची इच्छा राहो," हें विनोबाचें जीवनसूत्र,

वेदवेदांतगीतानाम् विनुना सारमुधृत
ब्रह्म सत्यम् जगत् स्फूर्ति जीवनम् सत्य शोधनम्'

'वेदवेदांत आणि गीतेचें 'विनु' नें सार घेतलें आहे ब्रह्म सत्य आहे, जगत् स्फूर्ति आहे आणि जीवन म्हणजे सत्याचा शोध'—हा विनोबाचा जीवन मन्त्र आणि

'वेदांतो विज्ञानम् विश्वासश्चेति शक्तय तिस्त्र
तासाम् स्थैर्ये नित्यम् शांतिसमृद्धिर् भविष्यति जगति'

"वेदांत विज्ञान आणि विश्वास या तीन शक्ति आहेत त्याच्यामध्यें नित्य स्थिर राहिल्यानेंच जगात शांति व समृद्धि नांदेल", हें विनोबाचें जीवनतंत्र

"आस्ते भग आसीनस्य शेते निपद्यमानस्य
उत्तिष्ठन् च तिष्ठति चराति चरतो भग"

'झोंपणाऱ्याचें नशीव झोंपतें, बसणाऱ्याचें नशीव बसतें, उठून उभा राहणाऱ्याचें नशीव उभें राहतें आणि चालणाऱ्याचें नशीवहि चालू लागतें म्हणून संचार कर, संचार कर"

चरैवेति चरैवेति।

